# मंगलकार्यसंग्रह

अथवा

पंधरा संस्कारादि कर्मे

( कादंबरीरूपानें )

हें पुस्तक

केशव भगवंत ताम्हणे, पनवेलकर,

यांनीं

तयार केलें.

गर्भाधानं पुंसवनं सीमन्तो जातकर्म च ।
नामक्रिया निष्क्रमोऽन्न-प्राशनं वपनक्रिया ॥ १ ॥
उपनयनं गोदानं समावर्तननामकम् ।
विवाहः-

—नारायणभट्टी.—

मुंबई.

"इंदुप्रकाश" छापखान्यांत छापिलें.



सन १८८७ शके १८०८

किंमत [illegible] रुपये.

श्री.

## श्रीमंत भास्करराव विठ्ठल फणसे.

( खासगीवाले. )

## श्रीमंत गायकवाड सरकार

यांचे माजी दिवाण

यांस

हें

पुस्तक

ग्रन्थकर्त्यांनें

त्यांच्या परवानगीनें मोठ्या नम्रतेनें

अर्पण केलें

असे.

## या पुस्तकांत जें कुटुंब कल्पिलें आहे,
## त्यांतील व्यक्तींचीं नांवें.



वाजी श्रीधर पोतनीस. .................. मुख्य यजमान.
ावरामभाऊ. .................................. वडील मुलगा.
ामनराव. ...................................... दुसरा मुलगा.
ारायणराव. .................................. तिसरा मुलगा.
ात्माराम. ................. नायक ( शिवरामभाऊंस पुत्र झाला तो. )
ापूजी. ......................................... कारकून.
खाराम. ....................................... गडी.
ाईसाहेब. ..................................... मुख्य यजमानीण.
ीताबाई. ....................................... वडील सून.
ाधाबाई. ....................................... दुसरी सून.
ार्वतीबाई. .................................... तिसरी सून.
ाशीबाई. ...................................... बाईसाहेबांची मुलगी.
ाबाई. ........................................ वामनरावाची मुलगी.
धाबाई. ............................ नायिका ( सीताबाईची सून.)
ा ................................................ मोलकरीण.



# प्रस्तावना.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्णांत प्रत्येक वर्णाच्या अधि- वेद [illegible] कारानुसार, सोळा संस्कार भिन्न भिन्न प्रकारें, शाखाचार, देशाचार व वृद्धाचार, यांस अनुसरून होत असतात. त्यांत ब्राह्मण व क्षत्रिय या दोन जातींत ते सर्व संस्कार सारखेच आहेत, असें म्हटलें असतां चालेल. इतकेंच कीं, कोठें कोठें त्यांत देशाचाराप्रमाणें भिन्नता दिसून येत्ये. आतां त्यांत हा भेद मोठा आहे कीं, क्षत्रियांस ते द्विजांच्या सहाय्यानें करावे लागतात, व ब्राह्मण ते करण्यास अधिकारी आहेत. या दोन्‌वर्णांशिवाय दुसरे जे दोन वर्ण, त्यांच्यांत मात्र फरक फार आहे; परंतु सर्वांचे मूळ प्राह्‌तां एकच दिसून येतें. या सोळा संस्कारांतील शेवटचा खेरीज करून, पंधरा संस्कार, पुत्र अथवा कन्या जन्मल्या दिवसापासून त्या उभयतांच्या निमित्तानें, त्यांस अपत्य आपत्य होण्याचा काल येईपर्यंत, प्रत्येक कुटुंबांत सामर्थ्यानुरूप करावे लागतात. या पंधरा संस्कारांत, व्रतबंध व लग्न आणि तत्संबंधीं दुसरीं लहानमोठीं कार्यें, हीं फार भानगडीचीं व विशेष महत्वाचीं आहेत. तीं कार्यें कशीं करावीं, त्यांत काय काय सामुग्री पाहिजे, कार्याची सिद्धता आपल्या शक्त्यनुसार कोणत्या मानानें करावी, कार्यास आरंभ कसा करावा व इच्छित कार्यें आपल्या शक्तीप्रमाणें म्हणजे फार खर्च न होतां चांगलीं व्हावीं व कार्यांत धांदल न होतां तीं निर्विघ्नपणें शेवटास जावीं, अशी योजना करण्यास अनुभवांशिवाय किंवा वृद्ध माणसांच्या सहायावांचून दुसरें कांहीं साधन नाहीं. परंतु हल्लींच्या मन्वंतराप्रमाणें कुटुंबांतील वृद्ध व अनुभाविक माणसांवर मृत्यूचा घाला अकालीं पडतो व त्यामुळें त्यांच्या पश्चात् बेरमाहितगार व तरुण, अशा मुलांवर लग्नकार्यादि कार्यें करण्याचें ओखम पडतें. अशा वेळीं त्या अननुभवी व तरुण गृहस्थांस कार्य करण्याच्या कामीं, स्नेही, शेजारीपाजारी वगैरे लोकांची सहायता घ्यावी लागते. अनुभव नसल्यामुळें, कार्याची योग्य सिद्धता होत नाहीं व त्यामुळें, कार्यास आरंभ केल्यानंतर, समयास सामानसुमानाची जरूर लागली म्हणजे तशा प्रसंगीं द्रव्य जास्त खर्चावें लागतें; इतकेंच नाहीं, पण विशेष त्रास पडून कार्य यथासांग सिद्धीस जाण्याची मारामार पडत्ये आणि मग एखादें कार्य कसेंबसें

उरकून गेल्यावर, त्याबद्दल मनास हुरहुर लागावी कीं, मनासारखें कार्य झालें नाहीं; खर्चापरी खर्च झाला, परंतु [illegible] नांवलौकिकाप्रमाणें कार्य आपल्या हातून घडलें नाहीं. तरी, असें न होतां इच्छिलेलें कार्य, आपल्या सामर्थ्यानुरूप, योग्य खर्चानें यथासांग व निर्विघ्नपणें शेवटास जाईल, अशी माहिती पुस्तकरूपानें काढिली असतां ती फारच उपयोगी होईल व तिच्या आधारें इच्छित कार्य चांगल्या रीतीनें शेवटास जाईल, असा हेतू मनीं आणून, ती माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला; व जरूर अशी माहिती मिळाल्यावर, त्यांतील भिन्न भिन्न कृत्यांस अंगभूत असलेले जे दुसरे विषय होते, त्याविषयाची माहिती वेगवेगळ्या ग्रन्थांतून घेऊन, ती सर्व एकंदर या पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली आहे.

या पुस्तकाचे एकंदर मुख्य भाग पांच केले आहेत, ते येणें प्रमाणें:—

स्वरूप. १ बाळपण. २ व्रतबंध. ३ लग्नसमारंभ. ४ वर्षांतील कृत्यें. ५ इतर सोहळे. याशिवाय या भागांत आलेल्या विषयांची माहिती निराळी दिली आहे.

१ पहिल्या भागांत जन्मकाळापासून पुत्राचा व्रतबंध, व कन्येचें लग्न होईपर्यंत जीं कृत्यें, कांहीं शास्त्ररीत्या व कांहीं देशाचार व रूढी यांस अनुसरून, करावीं लागतात, तीं सर्व वैदिक कर्मांच्या व व्यवहारिक कृत्यांच्या सर्व प्रकारच्या माहितीसह करून दाखविलीं आहेत. या भागांत संस्कार पांच आले आहेत ते:— १ जातकर्म, २ नामकर्ण, ३ अन्नप्राशन (उष्टावण), ४ चौल व ५ विद्यारंभ.

२ दुसऱ्या भागांत, व्रतबंधाचें कार्य, त्यांतील व्यवहारिक कृत्यें व वैदिक कर्में वगैरेंची माहिती देऊन, यथासांग करून दाखविलें आहे. या भागांत संस्कार सहा आले आहेत ते:—१ उपनयन. २ माहानाम्नीव्रत. ३ महाव्रत. ४ उपनिषद्व्रत. ५ गोदान. व ६ समावर्त्तन.

३. तिसऱ्या भागांत विवाहसंस्कार करून दाखविला आहे. त्या भागाचे त्यांतील विषयांच्या अनुरोधानें पोट भाग पांच केले आहेत ते:— १ वधुवरांची

---

१ या दुसऱ्या संस्कारांत, १ दोलारोहण "पाळण्यांत घालणें." २ सूर्यावलोकन. ३ निष्क्रमण. "मुलाला घरांतून बाहेर काढणें" ४ भूम्युपवेशन "भूमीवर निजविणें" हे चार उपसंस्कार आहेत.

२ या तिसऱ्या संस्कारांत, १ कर्णवेध "कान टोंचणें" २ वर्धापन "वाढदिवस" ३ केशांत, हे तीन उपसंस्कार आहेत.

योजना व कार्याची सिद्धता. २ लग्न व वाङ्निश्चयांतील सोहळे. ३ ज्ञातिभो-जन ४ सोडमुंज व वरातबाग. ५ मंडप ... । भागांत विवाहसंस्कार एकत्र झाला आहे. या सर्व पोट भा... । कार्यें आलीं आहेत तीं येणेंप्रमाणें:—

१ पहिल्या पोटभागांत, प्रथमतः लग्नकार्य करण्याचा निश्चय ठरल्यावर आपल्या नांवलौकिकास योग्य अशा वराची व वधूची योजना कशी करावी, वर कसा असावा व वधू कशी असावी, या विषयीं शास्त्रोक्त श्लोक अर्थासहित दिले आहेत. वधुवरांची योजना झाल्यावर, कार्यास उभयपक्षीं काय सरंजाम व सामुग्री लागते, ती किती पाहिजे, कार्याची सिद्धता कशी करावी कीं जेणेंकरून इच्छित कार्य आपल्या शक्तीप्रमाणें यथासांग शेवटास जाईल, कार्यास आरंभ केल्यावर त्यांत कोणत्याही प्रकारची न्यूनता पडणार नाहीं, अशी योग्य सिद्धता सर्व प्रकारच्या माहितीसह करून दाखविली आहे.

२ दुसऱ्या पोटभागांत, उभयपक्षीं सिद्धता पूर्ण झाल्यावर, विवाह करण्या-च्या दिवस, उभयपक्षास अनुकूल असा उभयपक्षांच्या मतानें ठरवून, त्या पूर्वी विवाहसंबंधीं होणारीं दुसरीं वैदिक व व्यवहारिक कृत्यें ग्रहमख, वरपूजा, सीमांत, मंडपस्थापना, देवकप्रतिष्ठा, वाङ्निश्चय, हीं कधीं करावीं याचा निश्चय, कार्यास घोंटाळा न होतां सुलभ पडेल अशा रीतीनें करून, त्या त्या दिवशीं प्रत्येक कृत्य करून दाखविलें आहे. त्या प्रत्येक कृत्यांत, वरपक्षाकडे काय व्यवस्था करावी लागते, व वधुपक्षाकडे काय लागते, त्यांत उभयपक्षीं काय काय सरंजाम किती व कसा पाहिजे, याची एकंदर सर्व माहिती— ठिकठि-काणीं देशाचाराप्रमाणें जे भिन्न भिन्न प्रकार दिसून आले त्यांच्या माहितीसह,— प्रत्येक कृत्यांच्या वेळीं देऊन, तीं करून दाखविलीं आहेत. हीं कृत्यें उभयपक्षीं आटोपल्यावर विवाहाच्या दिवशीं लग्नसंबंधीं होणारीं लहानमोठीं कृत्यें, त्यांच्या सर्व माहितीसह करून दाखविलीं आहेत. व त्यादिवशीं उभयपक्षीं विवाह संबंधीं व्यवस्था कशी करावी हें सांगून लग्न झाल्यानंतर कन्यादान करण्याच्या वेळीं, तें दान करणाऱ्या मुलीच्या मातापितरादी वडील माणसांचा हेतु काय असतो, त्यावेळचीं तीं वचनें कोणतीं असतात, वधुवरांत देव, अग्नि व द्विज, यांच्या समक्ष होणारे करार काय असतात, त्याबद्दल संस्कृत श्लोक अर्थासहित सांगितले आहेत. हा संस्कार झाल्यावर, गृहप्रवेश ( वरात ) होईपर्यंत होणारीं जीं लहानमोठीं व्यवहारिक कृत्यें, अशीं— वधुवरांचे खेळ, दक्षिणावाटणें, सूनमुख पहाणें वगैरे,— त्यांतील सर्व माहितीसह करून दाखविल्यानंतर

वधुप्रवेश हा समारंभ, उभयपक्षांकडील सर्वप्रकारच्या माहितीसह केला आहे.

३ तिसऱ्या पोट भागांत, शालिभोजन करण्याची सिद्धता कशी करावी, त्यांत शंभर पात्रांच्या मानानें पक्वान्न कोणतें असावें व तें करण्यास जिन्नस लागणारे जिन्नस कोणते असावे, शंभर पात्रांस पक्वान्नावांचून इतर पदार्थ कितीपाहिजेत, या सर्वांची माहिती अजमासानें देऊन, त्याविषयीं आमंत्रण करणें, व भोजनाचा सर्व बेत आपल्या सामर्थ्यानुरूप उतरवणें, याची माहिती देऊन तो समारंभ करून दाखविला आहे.

४ चवथ्या पोटभागांत, सोडमुंजें व रासनहाण, हे समारंभ कसे करावे त्यांत काय सरंजाम लागतो व उभयपक्षीं काय प्रकार होत असतात, त्यांच्या सर्व हकिकतीसह ते समारंभ करून दाखविले आहेत.

५ पांचव्या पोटभागांत, लग्नसंबंधीं कार्यें आटोपल्यावर, गरस्थ आलेल्या व्याहिमंडळास व आपल्या वऱ्हाडीमंडळास एके दिवशीं मेजवानी करून, आपल्या सामर्थ्यानुरूप त्या सर्वांस योग्यतेप्रमाणें पोषाख देऊन त्यांची बोळवणी कशी करावी, याची माहिती देऊन तो समारंभ करून दाखविला आहे.

४ चवथ्या भागांत, लग्नकार्य निर्विघ्नपणें शेवटास गेल्यानंतर उभयपक्षीं एक वर्षपर्यंत, प्रत्येक महिन्यांतील सणांस अनुसरून जीं, हौसेचीं कृत्यें होत असतात, जसें–आषाढपाठी, श्रावणपाटी विजयादशमीचा सण, दिवाळसण, मकरसंक्रांतीचा सण, वगैरे, तीं महिन्याच्या अनुक्रमानें त्यांतील साहित्याच्या माहितीसह करून दाखविलीं आहेत. नववधू सुमुहूर्तानें वरगृहीं आणण्याच्या प्रकार जो " पावण, " ( तो एक वर्षाच्या आंतच करावा लागतो कारण पुढें तीन वर्षें होत नाहीं असा परिपाठ आहे. ) त्यांतील माहितीसह करून दाखविला आहे.

५ वधू वयपरत्वें तारुण्य दशेत येत चालल्यानें तिच्या शारीरिक स्थित्यंतरास अनुसरून तारुण्यावस्थेत, तिचें गर्भाधान होईपर्यंत, जे सोहळे जसे–नूतन पदर धारण करणें, ऋतुप्राप्ती, गर्भाधान वगैरे–होत असतात ते, त्यांतील वैदिक व व्यवहारिक कृत्यांच्या माहितीसह करून दाखविले आहेत. पुढें ती नववधू गरोदर अवस्थेप्रत प्राप्त झाल्यावर त्या अवस्थेत होणारी जीं कृत्यें तींही सर्व माहितीसह करून दाखविलीं आहेत. या भागांत संस्कार तीन आले आहेत ते:–१ गर्भाधान, २ पुंसवन. ३ सिमन्तोन्नयन.

या प्रमाणें अल्पकाळापासून पुत्रास अथवा कन्येस अपत्य होण्याचा काल येईपर्यंत, जीं कृत्यें होत असतात तीं सर्व, वैदिक व व्यवहारिक मिळून एकंदर,

१ इतर माहिती दिली आहे त्यांत पक्वान्नांची माहिती दिली आहे.

या पांच भागांत वाटून टाकलेली आहेत. याशिवाय प्रत्येक भागांतील प्रसंगविशेषीं आलेल्या कृत्यांच्या अंगभूत असलेले कित्येक-विषय, त्यांची माहिती पुस्तकाच्या शेवटीं दिली आहे. ती कोणत्या कल्पांत लावून आहे व त्यांत काय सांगितलें आहे, तें येणेंप्रमाणें:—

१ पहिल्या भागांत, स्त्रियांचा प्रसूति काळ आला आहे. त्यास अनुसरून "औषधसंग्रह" ही माहिती दिली आहे. त्यांत स्त्रियांस प्रसूतीकाळा नंतर त्यांची शरीरप्रकृती निरोगी रहावी म्हणून त्यांस जे काढे, व शक्ति येण्यास आणि त्यांस बाळंतरोग जडूं नये म्हणून प्रथम पासून जे उपचार करण्यांत येतात, ते सर्व चांगले अनुभवास आलेले असे उत्तम ग्रन्थाधारें दिले आहेत. त्याचप्रमाणें लहान मुलांस अनेक रोग उत्पन्न होतात व त्यांची परीक्षा होत नाहीं आणि म्हणून चांगले उपचार होत नाहींत, हें जाणून त्या रोगांची परीक्षा व उपचार दिले आहेत, तद्वतच त्यांची ती कोमळ प्रकृति नेहमी दुरुस्त राहण्यासाठीं त्यांच्या मातेनें कसें वागावें व त्यांचें संगोपन कसें करावें, वगैरे बद्दल माहिती दिली आहे.

२ भाग १,२,३,४,५ या प्रत्येकांत जे संस्कार आले आहेत, त्या प्रत्येकांतील वैदिक कर्मांस जें साहित्य (नारळ, सुपाऱ्या, विड्याचीं पानें, दक्षिणा वगैरे) लागतें तें व वैदिक कर्मांशिवाय त्यांत दुसरीं आलेलीं जीं कर्में, (वरपूजन, वाग्निश्चय, मंगळागौरीव्रत वगैरे) त्यांस जें सामान लागतें तें, त्या त्या कर्मांच्या पोटकल्पांसह नंबर १,२,३,४ या पत्रकांत भागाच्या अनुक्रमानें दिलें आहे. चवथ्या पत्रकांत भाग ४ व ५ यांतील कर्मांचें साहित्य आहे. बाकी प्रत्येक भागाचें पत्रक वेगळें आहे. ह्या पत्रकांच्या पुढें, नंबर ५ चें पत्रक दिलें आहे, त्यांत, नंबर १।२।३।४ या पत्रकांत जीं वैदिक कर्में आहेत त्यांतील पोटकल्पांस जें साहित्य लागतें, त्याशिवाय लागणारें साहित्य (तांदूळ गहू, पंचे, समिधा, होमाचें साहित्य, व दुसरे पदार्थ वगैरे) भागानुक्रमानें, त्यांतील कृत्यांच्या नंबराप्रमाणें दिलें आहे. त्या पत्रकांत दुसऱ्या कोष्टकांत, मुख्य कृत्यांचा अनुक्रम नंबर, या खालीं जे नंबर आले आहेत ते नंबर १।२।३।४ या पत्रकांतील मुख्य कृत्यांचे, नंबर समजावे. ज्या कृत्यांचा नंबर, नंबर ५ च्या पत्रकांत आला नसेल त्या विषयांचें सर्व साहित्य, तें कृत्य ज्या भागांतील असेल त्या भागाच्या पत्रकांत, दिलें आहे, असें समजावें. ही साहित्याची माहिती देण्याचा हेतु इतकाच कीं, कार्य करण्याचे पूर्वी साहित्याची तयारी असली, म्हणजे आयत्यावेळीं धांदल होणार नाहीं. समिधा वगैरे साहित्य प्रसंगीं पाहिजे

तेव्हां मिळत नाहीं, तें पूर्वी मिळवावें लागतें म्हणून ही माहिती तेथेंही असावी म्हणजे मिळविता येईल व प्रसंगीं त्रास पडणार नाहीं.

२ पत्रक अ आणि ब ह्या दोन पत्रकांत जन्मकाळावरून पत्रिका करण्यास जी माहिती लागते, ती सर्व दिली आहे. व त्याच्या पुढें पत्रिका कशी करावी, हें पत्रिका करून, दाखविलें आहे. त्यांत, पत्रिकेचे जे भाग असतात (गुण, नाडी वगैरे काढणें, ग्रहकुंडली व लग्नकुंडली सिद्ध करणें) त्या प्रत्येकाची परिस्फुटता केली आहे. पुढें तयार केलेली जन्मपत्रिका कशी लिहावी, ती लिहून दाखविली आहे. याच्यापुढें वधुवरांच्या जन्मपत्रिकांवरून घटित पाहण्याची माहिती दिली आहे. त्यांत पत्रिकांवरून गुण कसे मिळवावे व ते मिळविण्याचे किती प्रकार आहेत, त्या सर्वांची पूर्ण माहिती दिली आहे, व भाग तिसऱ्याच्या पहिल्या पोटभागांत, वधुवरांची योजना झाली आहे, त्यासमयीं पत्रिकांचे गुण मिळविले आहेत, तेथें एक कोष्टक दिलें आहे, तें याच माहितीपैकीं आहे, असें समजावें. ही माहिती, ज्यांचा ज्योतिष शास्त्रावर पूर्ण भरंवसा आहे, ज्यांस हें शास्त्र खरें वाटत आहे, त्यांच्या साठीं दिली आहे. वधुवरांची योजना होतांना त्यांत मुख्य ही गोष्ट असते कीं, स्थळ कितीही चांगलें असलें, मुलगा उत्तम असून घराणेंही उत्तम असलें, तरी उभयतां वधुवरांचे गुण मिळाल्याशिवाय निश्चित करीत नाहींत. त्या प्रसंगी ज्योतिषी बुवांची जरूर लागते व आपल्या वेळीं ते मिळत नाहींत, त्यांत खेड्या पाड्यांत फारच पंचाईत पडते व त्या साठीं आसपासच्या शहरीं जावें लागतें. अशा कित्येक अडचणी ध्यानीं आणून ही माहिती दिली आहे. पत्रिका करण्याची माहिती दिली आहे, ती फक्त साधारण गण, नाडी, नक्षत्र ग्रह समजण्यापुरतीच आहे. ती देण्याचा हेतु हा आहे कीं, लहानशी पत्रिका केलेली असली म्हणजे ती व्रतबंध, लग्न वगैरे समयीं उपयोगीं पडते व ती योग्य वेळीं ज्योतिषी न मिळाल्यानें झालेली नसली म्हणजे पुढें विस्मरण होऊन, प्रसंगीं जरूर लागल्यावर जुन्या चोपड्या वगैरे शोधून, किंवा मग अदमासानें जन्मकाळ ठरवून तयार करावी लागते. तरी असें न होतां वेळच्या वेळीं ती तयार झालेली असली म्हणजे समयास उपयोगी पडावी. ज्योतिष शास्त्र खरें आहे किंवा खोटें आहे, हें येथें सिद्ध करणें जरूर नाहीं. परंतु ज्यांची त्यावर श्रद्धा आहे, त्यांस प्रसंगीं ज्योतिषी न मिळाल्यामुळें व स्वतःस अनुभव नसल्यानें विशेष अडचण पडते, ती पडूं नये म्हणून ह्या दोन प्रकारची माहिती दिली आहे.

१ पत्रक नंबर तीन मांत, शंभर पात्रांस प्रत्येक पक्वान्न किती लागतें व त्या प्रत्येकास लागणारे पदार्थ ( साखर, तूप, कणीक, केशर वगैरे ) कोणत्या मानानें लागतात, याची माहिती दिली आहे. या पत्रकांत जें मान धरिलें आहे, तें नुसतें एकच पक्वान्न शंभर पात्रांस किती लागतें, त्याचें आहे. पंचपक्वान्नाचें मान प्रत्येक पक्वान्नांच्या मानावरून धरावें. यांत जें मान आहे तें शंभर नाहीं पण सव्वाशें पात्रांचें सांगितलें आहे; कारण शंभर पात्रांचा बेत असला तर वीस पंचवीस पानें सहज ज्यास्त व्हावयाचीं, असा नेम आहे. या पत्रकाशिवाय शंभर पात्रांचें भोजनाचें सामान, ( म्हणजे तांदूळ, डाळ, आमटीस दाणा, मसाला, मीठ वगैरे स्वयंपाकाचे पदार्थ व रांगोळी, गुलाल, पत्रावळी वगैरे दुसरे पदार्थ ) किती लागतें, त्याची एक यादी दिली आहे. या यादींतील मानही पत्रकांतील मानाप्रमाणें समजावें. ही माहिती वाचकांस विशेष उपयोगाची पडेल असें वाटतें; कारण सर्वच ठिकाणीं चांगले हुशार आचारी मिळतात असें नाहीं. व ते मिळाले नाहीं म्हणजे एखादा मोठासा भोजनसमारंभ करण्याचे वेळीं स्त्रियांकडून स्वयंपाक करून घ्यावा लागतो, त्यावेळीं चांगली माहिती नसल्यानें पक्वान्नांचा नाश होतो किंवा अपूर्तता येते, म्हणून अशा वेळीं ही माहिती फार उपयोगाची होईल व पक्वान्नांचा नाश होणार नाहीं व अपुर्तता येणार नाहीं.

ही सर्व माहिती पुस्तकाच्या शेवटीं एकत्र दिली आहे. याशिवाय प्रसंग विशेषीं ठिकठिकाणीं टीपा देऊन माहिती दिली आहे.

येणेंप्रमाणें, या पुस्तकाचें स्वरूप आहे. यांत ज्या ज्या वेळीं जी माहिती जरूरीची वाटली, ती ती सर्व मिळाली तितकी दिली आहे. व हें पुस्तक वाचकांस मनोरंजक व्हावें आणि सर्व माहिती होऊन मुख्य उद्देश पार पडावा आणि वाचतांना कंटाळा येऊं नये म्हणून कादंबरी रूपानें लिहिलें आहे. आणि घोंटाळा न होतां सर्व प्रकार स्पष्ट समजावे म्हणून एक श्रीमान् घराणें कल्पून, त्यांत वर सांगितलेलें सर्व प्रकार करून दाखविले आहेत. आतां, यांत त्या श्रीमान् घराण्याच्या वैभवसंपत्यनुसार मोठी दाखविणें भाग पडलें, त्यावरून असें समजूं नये कीं, सर्वांहीं पुस्तकांत लिहिल्याप्रमाणेंच कृत्यें करावीं. ज्याणीं त्याणीं आपल्या सामर्थ्यानुरूप आपल्या वैभवास साजेल अशा रीतीनें थोडाफार खर्च करून इच्छित कार्यें शेवटास न्यावीं. कार्य करणारे श्रीमंत असले किंवा गरीब असले, तरी त्यांस शास्त्ररीत्या किंवा व्यवहाररीत्या होणारीं कृत्यें तीं सारखींच असावयाचीं. परंतु इतकेंच कीं, त्यांतील थाट माट, हा ज्याच्या त्याच्या वैभवाप्रमाणें असावयाचा. या पुस्तकांत प्रत्येक कृत्याचें सामान दिलें आहे, त्यांतेंही जेथें जोखम दिलें आहे, तें ज्यानें त्यानें आपल्या ऐपतीप्रमाणें आणावें व जें वजनमापानें दर्शित

केलें आहे, तें सामान, श्रीमान् लोकांत कोणत्या मानानें असावें, याचें परिमाण दाखविण्यासाठीं दिलें आहे. हें परिमाण सर्वत्र सारखेंच आहे, असें मी सांगू शकत नाहीं; त्यांत इतकेंच आहे कीं, ज्या वस्तू दिल्या आहेत त्या, त्या प्रसंगीं लागतात, हें समजावें; मग तें थोडें किंवा ज्यास्ती असणें, हें कार्य करणाऱ्यावर अवलंबून आहे. याप्रमाणें जो जो प्रकार करून दाखविला आहे तो जरी श्रीमंतीचा आहे, तरी सर्व लोकांत शक्त्यनुसार होत असतो, त्याप्रमाणें करण्याचा आहे. एकंदर सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, या पुस्तकांत दर्शित केलेल्या सर्व गोष्टी— मग त्या ज्याच्या त्याच्या शक्तीप्रमाणें— कशा होत आहेत व करण्याचा परिपाठ कसा आहे, हें दाखविलें आहे. वैदिक कर्मासंबंधीं जें साहित्य पत्रकांत दिलें आहे, तें शास्त्रास अनुसरून आहे. त्यांत ज्यास्त कमी देणें कार्य करणाऱ्याच्या योग्यतेवर अवलंबून आहे. याप्रमाणें ही सर्व माहिती देऊन, वाचकांस मनोरंजक वाटण्यासाठीं ठिकठिकाणीं वेगवेगळीं वर्णनें देऊन, त्यांत भिन्न भिन्न प्रकारांचें व चालींचें दिग्दर्शन करून, रीतिभातीची माहिती देऊन हा ग्रन्थ पुरा केला आहे. या ग्रन्थांत सोळा संस्कारांपैकीं शेवटचा खेरीज करून जे पंधरा संस्कार आले आहेत, ते सर्व असे आहेत कीं, त्या त्या प्रसंगीं मंगल-दायक कृत्यें होत असतात. म्हणून या पुस्तकाचें नांव "मंगलकार्यसंग्रह" ठेविलें आहे.

विचार. पहिल्या भागांतील कृत्यांच्या संबंधानें पाहतां बहुतेक ठिकाणीं असें दिसून येतें कीं, जातकर्म, नामकर्म, अन्नप्राशन, हे जरी संस्कार आहेत, तरी त्या त्या प्रसंगीं वैदिक कर्मे न होतां व्यवहारिक कृत्यें होत असतात, यांत वैदिक कर्मांचा लोप कां झाला तें कळत नाहीं. कोठें कोठें हींच कर्मे अगदीं शास्त्र रीतीनें होत आहेत त्याप्रमाणें सर्वत्र होतील तर बरें. चौलविधि हा संस्कार, सांप्रत बहुतेक ठिकाणीं तिसऱ्या वर्षीं न करितां, व्रतबंध संस्कारांत उरकून घेतात; परंतु उत्तम मार्ग पाहिला असतां, ज्या समयीं शेंडी ठेवण्याचा समारंभ होतो त्याच समयीं करून घ्यावा, हें बरें.

दुसऱ्या भागांत जे सहा संस्कार आले आहेत, त्यांपैकीं पहिला व सर-शेवटचा, हे दोन संस्कार सांप्रतकालीं उघड रीतीनें होत असतात; व बा-कीचे जे चार, त्याबद्दल ब्राह्मणांस दक्षिणा देऊन उदक सोडून, करण्यांत येतात. ते चार संस्कार ( १ महानाम्नीव्रत २ महाव्रत. ३ उपनिषद्व्रत. ४ गो-दान ) ब्रह्मचर्याश्रमांत होणारे आहेत. प्राचीन कालीं मुलाचें उपनयन झाल्यावर, तो ब्रह्मचर्याश्रम स्वीकारित असे. त्या आश्रमांत एक तप पर्यंत राहून विद्याभ्यास संपल्यावर त्याची सोडमुंज होऊन तदनंतर त्याचा विवाह होत असे. सांप्रत कालीं शास्त्रमार्ग बंद होऊन रूढीचें प्राबल्य झाल्यामुळें उपनयन आणि स-मावर्तन, हे दोन संस्कार एक किंवा चार दिवसांत उरकून घेण्यांत येत असतात.

प्राचीन काळीं मुलाला ब्रह्मचर्याश्रमांत ठेवण्याचा हेतु, निग्रहशक्ति, मेधावृद्धि, तेजस्वीपणा इत्यादि मनुष्यास आवश्यक लागणारे जे गुण ते त्याच्या ठायीं उत्पन्न व्हावे, हाच होता व आपले पूर्वज, हें एक कर्तव्य मानीत होते. सांप्रत काळीं तशा प्रकारच्या अभ्यासक्रमाविषयीं अगदीं दुर्लक्ष झालें आहे व त्यापासून अनेक प्रकारें तोटेही होत आहेत; या गोष्टीकडे आमच्या पुढारी मंडळीचें लक्ष लवकर जाईल तर बरें.

तिसऱ्या भागांतील दोन गोष्टी बऱ्याच वादग्रस्त आहेत. पहिली गोष्ट हुंडा घेण्याची रूढी व दुसरी वधुवरांचें वय. पहिल्या गोष्टीचा विचार करतां, सांप्रत हुंड्याची रकम इतकी वाढत चालली आहे कीं, साधारणपणें कुटुंबाचें पोषण करणाऱ्या गृहस्थांस मुलीचें लग्न करणें म्हणजे एक मोठें संकट आलें आहे, असें वाटतें. हुंडा म्हणजे दक्षिणा या नात्यानें द्यावयाचा, परंतु सांप्रत हुंडा टरविणें म्हणजे मोठें बंड माजत चाललें आहे; ज्यानें त्यानें आपल्या शक्त्यनुसार हुंडा घ्यावा व द्यावा त्याबद्दल कांहीं म्हणणें नाहीं. परंतु आपल्या मुलाचा ज्या वधूबरोबर संबंध करून द्यावयाचा, कीं जो संबंध सर्व आयुष्यपर्यंत तुटणारा नव्हे व ज्या संबंधानें उभयतांचें सौख्य परस्परांवर अवलंबून रहावयाचें असा तो उभयपक्षींही महत्वाचा संबंध करितांना, मुलाच्या बापानें, वधूचें स्वरूप, तिचें वय, तिचे गुण, तिचें कूल, इत्यादि विशेष महत्वाच्या गोष्टींकडे लक्ष न देतां, फक्त हुंड्याची रकम ज्यास्त मिळण्याची आशा धरणें, या सारखें अज्ञानत्व दुसरें कोणतें? दक्षिणा देणें ती देणाऱ्याच्या शक्तीवर व त्याच्या इच्छेवर अवलंबून असली पाहिजे, परंतु या हुंड्याच्या संबंधांत ती घेणाऱ्यांच्या मर्जीस वाटेल तितकी घेण्याची रूढी पडली आहे, हें दक्षिणेच्या नात्यानें अगदीं उलट आहे, असें कोण म्हणणार नाहीं? तेव्हां सांप्रतचा हुंडा, ही वरदक्षिणा नव्हे, पण यास सांप्रत एकाद्या कराप्रमाणेंच रूप येत चाललें आहे, म्हणून ही रीति चांगली नव्हे. मुलीच्या बापानें आपल्या सामर्थ्याप्रमाणें नांवलौकिकास अनुसरून हुंडा द्यावा व मुलाच्या बापानें, त्याबद्दल चढाओढी न करितां फक्त वधू मनाप्रमाणें मिळाल्यावर, तो हुंडा स्वीकारावा व ती रकम मुलीची आहे, असें समजून तिचा योग्य उपयोग करावा, हें सर्वांत बरें दिसतें व याप्रमाणें सुज्ञांकडून होत जाईल तर उभय पक्षांची मोठी सोय होणार आहे.

आतां, दुसरी गोष्ट वधुवरांचें वय. या विषयाची चर्चा सर्वत्र इतकी चालली आहे कीं, त्या संबंधानें येथें विशेष उहापोह करून लिहिण्याची जरूर नाहीं.

तरी, ज्या अर्थी या पुस्तकांत या विषयाचा संबंध आला आहे, त्या अर्थी त्याच्या संबंधानें येथें चार शब्द लिहिले तर ते अप्रशस्त होणार नाहींत.

आजकाल आधुनिक विद्वानांचें असें ठरीव मत झालें आहे कीं, बालविवाहाची रूढी आमच्या देशास फार अहितकारक आहे, व ती बंद झाल्यावांचून आमची सुधारणा व्हावयाची नाहीं. परंतु माझ्या मतें असें आहे कीं, हा जो वयाच्या संबंधानें रूढीवर आरोप आला आहे, तो खोटा आहे. सांप्रत कालीं प्रचारांत असलेल्या विवाहपद्धतीमुळें आमचें जें नुकसान होत आहे, तें कांहीं या वयाच्या रूढी पासून होत नाहीं. तर वधुवरांची योजना जशी व्हावी तशी होत नाहीं व तीं उभयतां पूर्ण तारुण्यावस्थेंत आल्यावांचून त्यांचा संबंध बिलकुल होतां कामाचा नाहीं, असें असतां तो होण्यांत येतो; या दोन गोष्टींमुळें हें नुकसान होत आहे. यास पुष्कळ दाखले आढळतात. जसें:— वधूच्या नवव्या व वराच्या पंधराव्या वर्षीं लग्न झालें, पण वर शरीरानें फार कृश असून वधू सुपिंड व फार उफाड्याची असल्यानें तिला बाराव्या वर्षीं रजोदर्शन झालें. तेव्हां मुलगा सतरा वर्षांचा असून अगदीं कृश होता. आतां अशा स्त्रीपुरुषांचा संबंध झाल्यानें त्यांची उत्पत्ती बलहीन झाली किंवा मुलाला कांहीं रोग झाला, तर हा दोष कोणाचा? वयाच्या संबंधानें कांहीं दोष नाहीं, पण वधुवरांची योजना करण्यांत दूर दृष्टी न दिल्यामुळें हा परिणाम झाला नव्हे काय? अशीं उदाहरणें फार घडून येतात. हाच प्रकार उलट असल्यानेंही वाईट परिणाम होतो. मुलगा तारुण्य भरांत येतो व स्त्री ऋतुमती होण्याला ठिकाण नसतो. मग स्त्रीला रजोदर्शन होण्यापूर्वीं त्यांचा संबंध झाल्यानें किंवा तो न झाल्यामुळें मुलास दुसरे छंद लागल्यानें मोठें नुकसान होतें, तें सुद्धां वयाच्या संबंधानें होत नाहीं. आतां फारच अल्प वयांत विवाह होण्याची चाल मोडिली पाहिजे खरी. तथापि इतर सुधारलेल्या राष्ट्राप्रमाणें स्वेच्छाचारी उल्लूपणाचीं घोडलग्नें होणें अगदीं इष्ट नाहीं. ज्या तरुणांस अथवा तरुणीस या विचित्र जगाचा यत्किंचितही अनुभव नाहीं, त्यांनीं आपल्या जन्माची मैत्रीण किंवा मित्र व ऐहिक सुखाची धनीण किंवा धनी आपणच शोधणें, कांहीं सर्वांशीं हितावह होणार नाहीं. आमच्या पोक्त व जगाचा कांहीं अनुभव मिळविलेल्या मातापितरांनींच आमचें लग्न करणें व प्रौढ होईपर्यंत किंवा त्याच्याही पुढें पुत्राला व स्नुषेला सदाचार व गृहशिक्षण शिकविणें, हेंच समंजस लोकांस पसंत होणार आहे. पण त्यांनीं मुलाचें किंवा मुलीचें लग्न करणें म्हणजे एक ऋणच फेडावयाचें आहे, असें

समजून केवळ वेठ मात्र मागवितां उपयोगाची नाहीं. नाहीं तर मित्रादिकांच्या शिफारसीवरून किंवा पत्रव्यवहारावरून वधू नेमस्त करावी, ती शरीरानें, रूपानें, व गुणानें कशी आहे वगैरे मुलाच्या बापानें कांहींच न पाहतां त्या जोडप्याचें सावधान लावून देऊन ऋणमुक्त व्हावें, मग त्या उभयतांचा अनेक कारणांनीं बेबनाव व्हावा, किंवा मुलगी मुलापेक्षां मोठी व्हावी व त्यामुळें लोकांहीं हंसावें, किंवा मुलगा दुसरी बायको करण्यास निघावा, वगैरे अनेक प्रकार होऊन त्या मातापितरांस पश्चात्ताप व्हावा, असे प्रकार न होण्याकडे उभयपक्षांकडील गृहस्थांहीं, फार जपलें पाहिजे. लग्न म्हणजे कांहीं लहानसहान काम नाहीं. तो जन्मपर्यंतचा संबंध आहे. या गोष्टी सर्वांस समजतात पण प्रसंगीं त्यांच्याकडून भलतेच प्रकार होतात व नंतर पश्चात्ताप होतो. तेव्हां फार सावध रहावें. कोणाच्या विश्वासावर अवलंबून न राहतां स्वत: सर्व प्रकार पाहून वधुवरांची योजना करावी हें बरें.

वधुवरांचीं वयें ठरवितांना शारीरशास्त्राकडे थोडेसें लक्ष दिलें पाहिजे—इंग्लंडसारख्या थंड हवेमध्यें पुरुष १९।२० वे वर्षीं वयांत येतो व त्यावेळेसच प्रीतीचा व कामाचा अंकूर त्याचे अंगीं उद्भवतो. तेथील स्त्रिया १५।१६ वर्षांत वयांत येतात. उष्ण हवेंत स्त्रिया एक दोन वर्षें अगोदरच वयांत येतात. म्हणजे हिन्दुस्थानांत बहुतेक स्त्रियांस १३।१५ वर्षांचे आंतच ऋतु प्राप्त होतो. ऋतुदर्शन झाल्यावर मुलीचें लग्न करणें कोणास आवडत असेल तें असो; पण तें शास्त्रविरुद्ध आहे इतकेंच नाहीं परंतु त्यापासून विपरीत परिणाम होण्याची भीति आहे. म्हणून ऋतुदर्शन झाल्यावर लग्न करणें हित-कारक नाहीं. यावरून स्त्रियांचीं लग्नें १२ वर्षांचेपुढें व पुरुषांचीं २० वर्षांचे पुढें करणें हें या काळीं तरी अगदीं श्रेयस्कर नाहीं. वधुवरांस एकमेकांच्या संबंधाचें योग्य ज्ञान होण्यास व परस्परांविषयीं प्रेमभाव उत्पन्न होण्यास त्यांचा बराच काळ सहवास व्हावयास पाहिजे, हें उघड आहे. व अशा प्रकारचा सहवास वधूचें लग्न ९।१० व्या वर्षीं केल्यानें सहजगत्या होऊन तिला एकाप्रकारचें मोठें हितकारक वळण लागतें; व त्यापासून सहसा दुष्परिणाम उद्भवण्याची भीति नसते. यासाठीं फार तर १२ वर्षांचे आंतच मुलींचीं लग्नें करणें हितावह आहे. म्हणून ९ वर्षांपासून १२ वर्षांपर्यंत मुलींचीं लग्नें करण्याची इच्छा ठेविली असतां बरें. या पुस्तकांत या नियमास अनुसरून ९ व्या वर्षींच लग्न करून दाखविलें आहे.

अल्पवयस्क मुलींचे पती दैववशात् मेल्यावर, त्यांस अल्पवयांत वैधव्य येतें व त्यांस आपलें सर्व आयुष्य वैधव्यदशेंत घालावें लागतें, म्हणून बालविवाह

करूं नये, असें कित्येकांचें ह्मणणें आहे. हें मी कबूल करितों कीं, तरुण मुलींस अगदीं तारुण्याच्या बहारांत वैधव्यदशेंत ठेवावें व त्यांस त्या स्थितींत होणारें असह्य दुःख सहन करण्यास भाग पाडावें, हें सांप्रतच्या समंजस समाजास युक्त तर नव्हेच. परंतु यासाठीं बालविवाहाची मोठी हितकर रूढी मोडून वधुवरें वयांत आल्यावर लग्न करण्याची रूढी पाडण्याचें कांहीं कारण नाहीं. व तसें केलें म्हणजे तरी लग्न झाल्यापासून एकदोन वर्षांत वैधव्य येण्याचा संभव राहत नाहीं, असेंही नाहीं. आतां मुलींवर अल्पवयींच कोसळणाऱ्या वैधव्याचा परिहार तरी सर्वस्वी आपणावरच अवलंबून आहे. मग उगीच हट्ट धरून भलत्याच कारणासाठीं बालविवाहाची रूढी, जीपासून वधुवरांची योग्य योजना झाली तर तोट्यापेक्षां फायदेच ज्यास्त आहेत—ती काढून टाकण्याविषयींची काथ्याकूट करण्यांत व्यर्थ कालक्षेप कां करावा नकळे ?

असो. वर आह्मी विवाहयोग्य वयाची एक साधारण इयत्ता वाचकांस कळविलीच आहे. व ही इयत्ता ठरविण्याचीं कारणेंही थोडक्यांत दाखविलीं आहेत. मुलाचें लग्न केवळ १०।१२ वर्षांचें वय असतांना करणें हें खरोखर रास्त नाहीं. कारण त्या सुमारास त्याचें भावी व कायमचें स्वरूप समजण्यास थोडाच मार्ग असतो. तो १६।१७ वर्षांचा झाला म्हणजे त्याचा पुढील होणारा स्वभाव, विद्या ह्यांचें पुष्कळ अनुमान करितां येतें. मुलगा लहान असतां लग्न केल्यानें मुलीच्या जीवित्वाचें कर्तें मातेरें होतें, याचा अनुभव पुष्कळांस आहे. जावई नाटक तमाशामध्यें गुंग होतात, किंवा अक्षरशत्रू बनतात, तेणेंकरून मुली अन्नासही महाग होतात. म्हणून मुलाचें लग्न १६।१७ वर्षांचे आंत त्याची योग्यता बधितल्याशिवाय करूं नये हें बरें. तसेंच मुलाचें लग्न २० वर्षांचें सुमारास न केलें व त्याला पुढें जर स्त्रीसुखाचा लाभ मिळाला नाहीं तरीही तें बरें नाहीं. ह्याचा अनुभव पुष्कळांस येत आहे. तेव्हां मुलाचें लग्न १६ पुढें व २० वर्षांचें आंत करावें, हेंच पुष्कळ अंशीं बरें दिसतें.

इतर भागांविषयींचे विचार त्या त्या भागांत दर्शित केले आहेत. तेव्हां त्या संबंधानें येथें कांहीं लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

या पुस्तकांतील सर्व कृत्यांचें अवलोकन केल्यानें असें दिसून येतें कीं ज्या त्या भागांत धर्माचें अंग घुसडलें आहे. आमच्या नवीन मंडळीला हे सर्व प्रकार उगीच ढोंगाचे आहेत, असें वाटतें. परंतु या मायावी जगांत मानवी प्राण्यास कोणत्याही स्थितींत खरें सौख्य म्हणून मिळत नाहीं; संसार हा फार दुःखमय आहे; त्यांत मायेच्या पाशानें मोहित होऊन मनुष्य ऐहिक सुखांत मग्न न होतां परमार्थसाधनाचा कांहीं तरी अंश त्याच्या हातून घडला पाहिजे, म्हणून आमच्या शास्त्रकारांनीं संसारांतील प्रत्येक गोष्ट करितानां सहजरीत्या परमार्थ

व परोपकार घडावा, अशी योजना सर्वत्र केली आहे. हें आमच्या शास्त्रकारांचें विलक्षण योजनाचातुर्य होय. लग्नसमारंभादि कार्यांत व्यवहारिक गोष्टी कराव्या लागतातच; त्यामध्येंच शास्त्रास अनुसरून चालण्यास कांहीं हरकत आहे, असें नाहीं. सांप्रतच्या मन्वंतराप्रमाणें, हें पुस्तक कित्येकास आवडणार नाहीं, हें उघडच आहे. परंतु हा प्रयत्न ज्यांची श्रद्धा आमच्या जुन्या वैदिक धर्मावर आहे, त्यांस तरी रुचणार नाहीं असें संभवत नाहीं. हें पुस्तक दोषानें परिपूर्ण तर आहेच. परंतु वाचकांस इतकीच विनंति आहे कीं जें मी सादर केलें आहे तें मान्य करून त्यांतील दोष सुधारण्याचा मार्ग दाखविण्याची ते मेहेरबानी करितील तर ते पुढल्या खेपेस मी फार कृतज्ञतेनें सुधारीन. हा प्रयत्न पहिलाच व दोष-परिपूर्ण आहे तरी देखील लोकांनीं यास उदार आश्रय दिला या बद्दल त्यांचे मी फार आभार मानितों. व अशी आशा करितों कीं, उत्तरोत्तर असाच आश्रय मिळून पुढें सेवा करण्यास मला उत्तेजन मिळत जाईल.

या पुस्तकाच्या कामीं माझ्या पुष्कळ मित्रांनीं मला अनेक प्रकारचें सहाय केलें आहे त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. त्यांतूनही माझ्या दोन मित्रांनीं (त्यांचीं नांवें प्रसिद्ध न करण्याविषयीं त्यांच्या आग्रहापुढें माझा इलाज नाहीं.) या पुस्तका बद्दल स्नेहभावानें जे श्रम घेऊन मला अनेक रीतीनें सहाय केलें आहे त्याबद्दल मी त्यांचा अतिशयच, आभारी आहें. व हें मी शुद्ध अंतःकरणानें कबूल करितों. आतां सरशेवटीं, ज्याच्या कृपाप्रसादानें, हें काम शेवटास गेलें त्या मंगलमय जगदीश्वराचे अनंत उपकार अनन्यभावें मानून ही प्रस्तावना पुरी करितों.

पुस्तक कर्ता

मुंबई गिरगांव.
ता॰ ५ मार्च स. १८८७
मि. फाल्गुन शुद्ध १० शके १८०८

*       *       *       *       *       *       *       *

या ग्रंथास आरंभ केल्यापासून मजवर एकामागून एक अशीं अनेक संकटें आलीं. तीं सांगत बसून वाचकांस शीण देण्याचा माझा इरादा नाहीं. तथापि माझे दुःखोद्गार मीं त्यांच्या परवानगीनें पुढील पत्रावर देत आहें त्याबद्दल त्यांनीं मला क्षमा करावी.

# बाबा! आपणाला दोन शब्द.



बाबा! आपण जमवून ठेविलेली सामग्री एकत्र ग्रथित करून मी आपल्या इच्छेप्रमाणें हें पुस्तक तयार केलें आहे. आतां हें किंवपत चांगलें असणार आहे, हें माझ्या ज्ञानावरून मला माहित आहेच; तथापि, त्याविषयींचें कौतुक करणारीं प्रेमळ माणसें मला कोणी न उरावीं, हें माझें मोठें दुर्भाग्य होय, त्यास इलाज नाहीं. या पुस्तकाच्या कामास आरंभ झाला नाहीं तोंच आपण आपला येथील नश्वर व्यवहार आटोपून परलोकवासी झालां, व आपल्या मागून लवकरच माझ्या प्रिय जननीनेंही आपली सेवा करण्यासाठीं आपल्याकडे प्रयाण केलें! हा मजवर जो प्रसंग गुजरला त्याची केव्हांही आठवण झाली ह्मणजे आपणां उभयतांच्या मूर्त्ति माझ्या डोळ्यांसमोर उभ्या राहून, चित्त अत्यंत भांबाऊन जातें! आपल्या सहवासानें अल्पवयांतही संकटें निमुटपणें सोसण्याविषयीं मी तयार तर झालोंच आहें. तथापि, आपण ज्या दिवशीं या अनाथास या भयाण जगतावर सोडून गेलां, त्यादिवशीं माझें धैर्य थोडें खचून मी शोकविव्हल झालों, याबद्दल आपण मला क्षमा करा. आपण व मातोश्रीनीं मला सदाचरणाविषयीं केलेला उपदेश नेहमीं माझे अंतःकरणांत ठसलेला आहे; व आपल्या अनुज्ञे बाहेर वागण्याची दुर्बुद्धि मला परमेश्वर कधींही न देवो, अशी त्याजजवळ माझी निरंतर प्रार्थना आहे. आपणां उभयतांचें उपकार अंशतःही फेडण्याचें या अभागी पुत्राचे नशिबीं नाहीं, त्यास इलाज नाहीं; तथापि, आपल्या आशीर्वादानें मजकडून आपल्या इच्छेनुरूप वर्तन घडलें म्हणजे मी आपणास कृतकृत्य समजेन. बाबा! —आई!—या वेळीं देखील हो, माझा कंठ अगदीं दाटून आला आहे,—माझे डोळे पाण्यानें भरून गेले आहेत,—मला कांहीं दिसेनासें झालें आहे—छे—नाहीं आतां माझ्यानें कांहीं लिहिवत.—



# शुद्धिपत्र.

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| २ | ९ | भागास. | पुस्तकास. |
| ३ | १७ | भागाच्या आरंभी. | पुस्तकाच्या शेवटी. |
| ३ | २३ | पाप्रमा- | पाप्रमाणे. |
| ४ | ८ | भारल्या. | भारल्या. |
| ५ | टी. ३ | भागारंभी. | पुस्तकाच्या शेवटी. |
| ६ | २७ | त्याला. | त्या. |
| ८ | १० | स्थानं. | स्थानी. |
| १९ | २ | वैदिकी. | वैदिक. |
| २० | ६ | अहे. | आहे. |
| ,, | २५ | यांकडीलही. | यांजकडीलही. |
| ,, | नोट | मुहूर्तराजपत्रक. | मुहूर्तराजपुस्तक. |
| २३ | २४ | पाजप. | पाजून. |
| ,, | २५ | चंबरीसारखन. | चंबरीसारख्या. |
| २४ | ६ | बाबासाहेबांची. | बाबासाहेबांची. |
| २६ | १० | पोटभाग २ रा. | पोटभाग १ ला. |
| ,, | १५ | ,, | ,, |
| २९ | १२ | पोटभाग ३ रा. | पोटभाग २ रा. |
| ३० | टी. १ | ,, | ,, |
| ,, | १९ | त्रयोदशगुणी | त्रयोदशगुणी |
| ३२ | २४ | पोटभाग ४ था. | पोटभाग ३ रा. |
| ३९ | ५ | लग्ने. | लग्ने. |
| ४१ | ५ | विवार्जिता. | विवर्जिता. |
| ,, | १७ | कुलामिछंति. | कुलमिछंति. |
| ४९ | १९ | पडे. | पडे. |
| ५१ | १ | मुलांचे. | मुलाच्या. |
| ,, | २ | आडविज्ञन्यास. | आकर्षणान्यास. |
| ,, | ६ | पोची. | पोची. |
| ,, | २१ | छेत्रा. | छत्री. |
| ,, | २३ | तांडधुण्याचा. | तांडधुण्याची. |
| ५३ | ९ | साखर, लिंबे. | साखरलिंबे. |
| ५५ | १ | तसेच. | तसेच. |
| ५८ | १ | प्रातःकाळ. | प्रातःकाळची. |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | टीप | प्रथम मुलाचें. | प्रथम मुलीचें. |
| ६० | २ | आलो. | आले. |
| ६२ | २० | लाऊन. | ( हा शब्द नको. ) |
| ,, | ,, | फुलांच. | फुलांचे. |
| ६४ | १ | चालवें होवीं. | चलित होवीं. |
| ६५ | २ | उजड. | उजेड. |
| ६६ | ५ | स्त्रियास. | स्त्रियांस. |
| ,, | १७ | पाचरण्यास. | पाचारणास. |
| ६९ | २३ | आबासाहेब. | आपासाहेब. |
| ७७ | ४ | बरोबर. | बराबर. |
| ,, | नोट. ६ | त्याल. | त्याला. |
| ८२ | २३ | धर्मे च्या र्थेच. | धर्मे चार्थे च. |
| ८३ | १ | दान. | कन्यादान. |
| ,, | ३ | पाणिग्रहणाविधि. | पाणिग्रहणविधि. |
| ८५ | २६ | घातला. | घातले. |
| ८६ | ५ | मुलाची. | मुलाचा. |
| ८८ | २० | विहिणास. | विहिणींस. |
| ८९ | १३ | मंढळी. | मंडळी. |
| ९५ | १७ | भोजन. | भोजन. |
| १०१ | २६ | वगैरे सामान. | ( हे शब्द नको. ) |
| १०२ | १४ | पुणे. | पुणेकर. |
| १०३ | २१ | पांढरे. | बाढन्या. |
| १०५ | १५ | अबदागि. | अबदागिर. |
| १०६ | १२ | गार व झुळूक. | गार झुळूक. |
| १०८ | १ | बसाविलें. | बसविलें. |
| ११० | १४ | सामामावर. | सामानावर. |
| ११३ | २ | अंगची. | अंगाची. |
| ११७ | १० | रवरी. | कोपडी. |
| १२१ | ३ | आवरणें. | आवरणें. |
| १२२ | ८ | विजय दशमीचा. | विजयादशमीचा. |
| १२४ | २२ | साहेल्यांत. | सोप्यांत. |
| १३१ | १८ | वागत. | वागत. |
| १३२ | १४ | उलनानें. | उल्लंघनानें. |

# अनुक्रमणिका.

# मंगलकार्यसंग्रह.

## भाग १ ला.

### बा ळ प ण.

—oOo—

#### जन्मकाळ.

आश्विनाचा महिना निघाला. शरदृतूचा अंमल बसत चालला. जिकडे तिकडे हिरवें चार दिसूं लागलें. शेतांतील भातांस लोंबी येऊन तें वाऱ्यानें डोलूं लागलें. तीळ व करडई पेरलेलीं शेतें पिंवळ्या व तांबुस वर्णाच्या फुलांनीं शोभायमान दिसूं लागलीं. पंचपंच उषःकाळ झाला. गार वाऱ्याची झुळूक सुटली. ती आंगास झोंबूं लागली, स्वच्छ उदकानें तुडूंब भरलेल्या सरोवरांतील तांबडीं, पिंवळीं, निळीं व पांढरीं वगैरे निरनिराळ्या रंगांचीं कमळें विकसित होऊं लागलीं. कावळे कावकाव करूं लागले. पाकोळ्या आकाशांत उडून गायन करूं लागल्या. अग्निहोत्री धाबळ्या पांघरून नदीवर कार्तिक स्नानास निघाले. विद्यार्थी वेदघोष व शास्त्राभ्यास करीत बसले. रविप्रभा पडून दशदिशा उजळल्या. भ्रमर कमलिनीपासून मुक्त होऊन गुंजारव करूं लागले. घरोघर स्त्रियांनीं सडासंमार्जन करून चित्रविचित्र रांगोळ्या घातल्या. वेणीफणी करून, आंगें धुऊन, स्त्रिया आपापल्या गृहकृत्यास लागल्या.

सूर्यबिंब दृष्टिगोचर होतांच अग्निहोत्र्यांनीं होमशाळेंत अग्नीचें उद्धरण करून होमकुंडांत गोळा अर्पण केला. अंबिकेच्या देवालयांत जाऊन स्त्रियांनीं श्री देवीस पूजासंभार अर्पण करून, ऐकमेकींस हळदकुंकू देऊन, त्या आपापल्या घरीं गेल्या.

असें होतां होतां प्रहर दिवस चढला. बाबासाहेबांच्या वाड्यांत ताशे, वाजंत्री व चौघडे वाजूं लागले. बंदुकींचे आवाज निघाले. भिक्षुक मंडळी जमूं लागली. सर्वांचीं मुखकमलें प्रफुल्लीत होऊन चोहोंकडे आनंदमुद्रा चमकूं लागली.

असें होण्याचें कारण बाबासाहेब यांचे जे वडील चिरंजीव शिवरामभाऊ त्यांस पुत्र[१] झाला, हें होय. अगोदर बाबासाहेब संपत्तिवान् अब्रुदार व कुलीन घराण्यांतील गृहस्थ, त्यांस प्रथमच नातू झाला, मग त्यांचा हर्ष काय सांगावा ? असो.

---

१ पुत्र झाल्यावर पित्यानें हौदांत किंवा विहिरींत उडी टाकून स्नान करावें. कारण उडीपासून पाणी जितकें उंच उडेल तितकें उंच स्वर्गी पितर चढतील, अशी वृद्धांची समज आहे. उडी न टाकिली तर दगड टाकितात.

नंतर पुत्रावण करण्याकारतां उपाध्यास बोलावणें पाठविलें. व पानसुपारीचें आमंत्रण केलें. नंतर मंडळी व उपाध्ये आल्यावर पुत्रावणाचा प्रकार सुरू झाला.

**या कृत्यास आधार.**

जाते पुत्रेपिताकुर्यान्नांदीश्राद्धंविधानतः ॥
जातकर्मततःकुर्यादन्यैरालंभनात्पुरा ॥ १ ॥

**अर्थ**--पुत्र जनन झाल्यावर तात्कालिक पित्यानें नांदिश्राद्धोत्तर विधिपूर्वक शिशूस अन्यांनीं स्पर्श केल्याचे पूर्वी जातकर्म संस्कार करावा.

या कृत्यास लागणारें साहित्याबद्दल यादी या भागास जोडलेल्या पत्रकांत आहे.

प्रथम उपाध्यांनीं शिवरामभाऊंकडून पुण्याहवाचन व नांदीश्राद्ध करवून नंतर मुलाच्या मुखांत मध घातली.

पुत्रावणाचा प्रकार आटोपल्यावर भिक्षुकमंडळीस दक्षिणा वाटिली. व सर्व मंडळीस पानसुपारी अत्तर गुलाब, व हारगजरे दिले.

**बाबासा०**--( बापुजीस. ) बाळंतिणीस द्यावयाचीं औषधें व काढे यांची यादी माझ्या रुमालांत आहे ती काढून आणून त्याप्रमाणें औषधें आणून द्या. ( ही यादी या भागाच्या आरंभीं दिली आहे, ती पहावी. )

**चौथे दिवशीं नाहणीपूजनाचा प्रकार.**

सुइणीकडून न्हाणी सारविली. नंतर पांच सुवासिनी मिळून बाळंतिणीस मुलासह न्हाणीवर उभी करून तिच्या पायांवर पाणी ओतिलें, आणि स्त्रियांस हळदकुंकू देऊन ( विड्याच्या पानावर हळद, कुंकू, भिजलेले हरभरे घालून ) वायनें वाटलीं. ( याप्रमाणें चौथे दिवशीं करावें. )

**पांचवे दिवशीं पंचमीपूजन करण्याचा प्रकार.**

पांचवे दिवशीं प्रातःकाळीं सडासारवण पडलें. वाद्यें वाजूं लागलीं. बाळंतिणीची शेकशेगडी करून सुइण बाळंत्यांची मोट घेऊन नदीवर धुण्यास गेली. वैद्य येऊन बाळबाळंतिणीचा समाचार घेऊन गेले. अशा वेळीं बाबासाहेब मुख-

१ ही पूजा भिंतीवर देवीचें चित्र काढून त्याची. व खालीं पाट मांडून त्यावर नागवेलीच्या व हळदीच्या पानांवर चित्राची आकृति काढून त्याची करण्याचा परिपाठ आहे. व त्या पाटाजवळ दऊत, लेखणी, कोरा कागद व शस्त्र ठेवितात. कायस्थ प्रभू ज्ञातींत त्या पाटावर देवीची सुवर्ण प्रतिमा चांदीचे तोडे, व वीळे ठेवितात. कोठें कोठें या दिवशीं मध्यरात्री पर्यंत जागरण करण्याचा परिपाठ दिसून येतो.

मार्जन करून शालजोडी पांघरून लोडाशीं टेंकून बसले आहेत इतक्यांत नरहरपंत उपाध्ये तेथें आले.

**बाबासा०**—या उपाध्ये महाराज, असे इकडे या.

**उपाध्ये०**—आतां बसण्याची वेळ नाहीं. नदीवर स्नानास जावयाचें आहे. पण ह्मटलें आज पंचमीपूजन आहे, ह्मणून आलों होतों. त्यास लागणाऱ्या साहित्याची याद बापूजीस दिलीच आहे, त्याप्रमाणें तजवीज होईलच. आपण काय पोक्त आहां, आपल्यास सांगावयास पाहिजे असें नाहीं, परंतु आह्मास कोठें चैन पडतें आल्यावांचून! बरें जातों आतां. संध्याकाळीं लवकर ह्मणजे पांच एक वाजतां येईन.

**बाबा०**—लवकरच येऊन पूजा आटपून जा, ह्मणजे झालें. फार वेळ नका लावूं.

**नरहर०**—फार उत्तम आहे. माझें हो काय? मी आपला चार वाजताच येईन. ( असें बोलून घरीं गेले. )

सायंकाळीं उपाध्ये आल्यावर त्यांनीं पूजनाचें साहित्य मागून घेऊन तयारी केली. नंतर शिवरामभाऊंनीं स्नान केल्यावर पंचमीपूजनास[1] आरंभ झाला. चौघडा व वाजंत्रीं वाजूं लागलीं. व इष्टमित्रांसह यथासांग पूजनें[2] आटो पल्यावर बोलाविलेल्या मंडळीस आमंत्रण जाऊन मंडळी आल्यावर सर्वांचें भोजन झालें. नंतर पानसुपारी, अत्तरगुलाब दिल्यावर कांहीं मंडळी घरीं गेली, व कांहीं जाग्रण करण्यास तेथेंच राहिली. ( ह्याप्रमाणें पांचव्या दिवशीं करावें. )

दुसऱ्या दिवशीं ह्मणजे सहावे दिवशीं पंचमीपूजनाप्रमाणें पूजा व जाग्रण केलें.

आठवे दिवशीं रात्रौ जाग्रणा[3]करितां मंडळी आली. तो त्यावेळेचा थाट काय सांगावा! सर्व दिवाणखाना गच्च भरला होता. कांहीं मंडळी सोंगट्या खेळत होती. कोणी बुदबळांचा डाव मांडला होता. कोणी गंजिफा खेळत होते. याप्रमा- मध्यरात्रपर्यंत खेळ झाल्यावर मंडळी चहा कॉफी घेऊन आपापल्या घरीं गेली.

## बालकशुद्धि.

आकरावे दिवशीं प्रातःकाळीं बाळंतिणीस व मुलास स्नान घालण्याकरितां स्वच्छ व ताजें पाणी तापवून दोघांस स्नानें घातलीं. नंतर मुलास पाटावर निजवून त्याचें पोटावर दूर्वा व सरकीचा कापूस टाकून त्यास उचाललें.

---

१ पंचमीपूजनाप्रमाणें एकविसावे दिवशींही पूजा करण्याचा कोठें कोठें प्रचार आहे.

२ पूजा आटोपल्यावर ब्राह्मणाकडून रामरक्षास्तोत्र वाचवावें.

३ पांचवे सहावे व आठवे दिवशीं रात्रौ जाग्रण करण्याचा परिपाठ आहे.

बाळंतविड्याची सर्व तयारी झालीच होती. डिंकाचे, मेथ्याचे, सुंठीचे, आळिवांचे वगैरे लाडू, तिखटी सुपारी, ओंवा, लसूण, बाळंतिणीस लुगडें व खण, मुलासबाळंत्यास फडकीं, कुंची व टोपरें. हें सामान परातींतून भरून ठेविलें होतें. हळदकुंकवाची तयारी करून निमंत्रित स्त्रिया जमल्यावर बाळंतिणीचे खोलींत चौपाट काढून, त्यावर चौरंग मांडून बाळंतिणीस मुलासह त्यावर बसविलें. नंतर तिस हळदकुंकू देऊन, बाळं- तविडा हातीं लावून, ओटी भरून लुगडें व खण दिला. मुलास टोपरें व कुंची घातली. नंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकूं देऊन ओट्या भारल्या. ( ह्या प्रमाणें अकरावे दिवशीं करावें. )

**बारसें.**[1]

बारावे दिवशीं प्रातःकाळीं सर्व वाड्यांत तोरणें बांधिलीं. चौघडे झडूं लागले. ताशे खणाणूं लागले. सनयांचे मधुर स्वर निघूं लागले. असा तो वाडा वाद्यांनीं गजबजून गेल्यामुळें मंगळदायक दिसूं लागला.

पूर्व दिवशीं सर्व प्रकारची तयारी झाली होती. स्त्रियांस हळदिकुंकवाचें बोलावणें केलें होतें. त्याप्रमाणें स्त्रिया येऊं लागल्या. नंतर माजघरांत पाळणा बांधिला होता, त्यांत मुलास निजण्यास लहान लहान गाद्या घालून पाळण्यावर छत बांधून झालरी लाविल्या. त्याच्या सभोंवतीं निर्गुडीचे टहाळ बांधले. पाळण्याचे खालीं चौपाट काढून त्यावर चौरंग मांडून मश्रूचा रुमाल घातला. नंतर स्त्रिया जमल्यावर मुलास बाळंतिणीजवळ देऊन, जिवत्या उखळून मुलास सूर्यदर्शन करण्यास पुढील चौकांत नेलें. सूर्यदर्शन करून घरांत आल्यावर मुलासह बाळंतिणीस चौरंगावर बसविलें. तिस हळकुंकूं देऊन, ओटी भरून रेशीमकाठीं पातळें[2] व खण दिला. मुलास कुंची व टोपरें घालून मश्रूच्या बाळंत्यानीं गुंडाळून[3] त्यास पाळण्यांत घातलें. मुलाचें नांव **आत्माराम** ठेविलें.( ह्यास **नामकर्ण** ह्मणतात. या कृत्यासंबंधीं वैदिककर्म करावयाचें तें पत्रकांत पहा. )

हें कृत्य आटोपल्यावर गांवांतील स्त्रियांनीं आपापल्या सामर्थ्यानरूप आण- लेला बाळंतविडा[4] बाळंतिणीचे हातीं लावून ओटी भरली.

---

१ मुलाचें बारसें १२ व्या दिवशीं व मुलीचें १३ व्या दिवशीं करितात.

२ ह्या पातळास पिवळा रंग द्यावा.

३ हा व पुढील कान टोंचण्याचा प्रकार भोजन झाल्यावर सायंकाळीं करण्याचा प्रघात कोठें कोठें आहे.

४ नारळ, तांदूळ, पानसुपारी, लवंगा, वेलदोडे, जायफळ, मुलास कुंची टोपरें, बाळंतिणीस लुगडें व खण. ह्यास कोणी आवळी ह्मणतात.

सर्वांनीं ह्याप्रमाणें केल्यावर त्यांस हळदकुंकू देऊन त्यांच्या नारळांनीं ओट्या भरल्या व साखर वांटली.

हें सर्व कृत्य आटोपल्यावर इष्टमित्र व सोयरेधायरे यांजसह पंचपक्वान्नाचें भोजन झालें. भोजन झाल्यावर मंडळीस पानसुपारी, अत्तरगुलाब, हारगजरे देऊन नारळ व साखर वांटली. नंतर गांवांत साखर वाटण्याकरितां बापूजीस व सखारामास पाठविलें, व सर्व गांवभर मोठ्या आनंदानें साखर वाटली.[2]

सायंकाळीं सोनार आल्यावर चौपाट काढून समोरासमोर दोन चौरंग मांडिले. एकावर सोनारास व एकावर बाळंतिणीस मुलासह बसविलें. दिवा लाविला, नंतर बाळंतिणीस, मुलास व सोनारास कुंकूं लावून दिवा ओंवाळिला.

बाळंतिणीची ओटी भरली. नंतर सोनारानें मुलाचे कान टोंचले.[1] यास **कर्णवेध** ह्मणतात.

कान टोंचल्यावर सोनारास शेलोंपागोटें, दिलें.

रात्रौ जोशीबुवानीं मुलाची पत्रिका[3] वर्तवून आणिली ती सर्व मंडळीस वाचून दाखविली.

## महिन्याचा वाढदिवस.[4]

एके दिवशीं प्रातःकाळीं बाबा साहेब मुखमार्जन करून वर्तमानपत्रें वाचीत बसले होते, इतक्यांत नारायणराव तेथें आले.

**नारायण०**—बाबासाहेब! कालचें पत्र बापूजींनीं कुठें ठेविलें कोणास ठाऊक! त्यामध्यें काय त्या रा. ब. संबंधानें पत्रव्यवहार होता तो मला वाचावयाचा होता. आणि शिवाय ते आपले नरहरपंतही तें पत्र मागण्यास आले होते. त्यांत म्हणतात कायशी त्या रा. ब. यांविषयीं फारच लिहिलें आहे मी काल केवढा वेळ तें शोधित होतों, पण तें कांहीं मला मिळालें नाहीं.

**बाबा०**—अरे नानासाहेब! तुम्हाला मुलानां पत्रें वाचण्याचा नाद कांहीं चांगला नाहीं. या असल्या कामांत तुम्ही आपली वेळ अगदीं दवडूं नये. तुम्हाला

---

१ कान टोंचतानां सोनाऱ्याच्या संबंध वाट्या मोडण्याची चाल आहे. व तें सोंवरें मुलास देतात. ही चाल कां पडली असावी व याचें कारण काय हें समजत नाहीं. कान टोंचण्य करितां सोन्याचीं सुकळीं असावीं.

२ दौभाग्य देणें श्रीमंत लोकांचें काम आहे. गरिबांनीं नारळ व शिधा द्यावा.

३ पत्रिका आधारार्थ दिली आहे ती पहा. करण्याची रीतीहि दिली आहे.

४ ह्याप्रमाणें मुलीनाही वाढदिवस करावा. मुलास जन्मून एक वर्ष झालें ह्मणजे असाच वाढदिवस करितात त्यास वर्षाचा वाढदिवस असें ह्मणतात.

या पेक्षां फार महत्वाचीं कामें या कवळ्या वयांत करावयाचीं आहेत. या खटप-टी पाहिजेत कशाला तुम्हाला ?

नाथ०—खटपटी असें नाहीं. पण येवढें त्या पत्रांत रा. ब. यांच्या संबंधानें लिहिलें आहे तरी काय, तें पहाण्याची मला आपली उत्कंठा झाली. दुसरें कांहीं नाहीं. आपण सांगितल्यापासून मी हा नाद सोडून दिला आहे. नाहीं का बाबासाहेब ?

बाबा०—तें माझ्या लक्षांत आहे. बरें मग तुला तें कालचें पत्र पाहिजे ना? तें माझ्या आंगरख्याच्या खिशांत आहे. तें घे आणि वाचून झाल्याबरोबर येथें आणून टेव. (नारायण तसें करितो व जावयास लागतो.) अरे नानासाहेब! खालीं बापूजी आले असतील तर त्यानां वर लावून दे. उद्या कायसा आपल्या आत्मारामाचा महिन्याचा वाढदिवस आहे. बापूजींना मी आज सकाळीं लवकर बलाविलें, पण माणसापुढें कांहीं बाबा अगदीं इलाज नाहीं. सात वाजायाला आले तरी अजून त्यांचा ठिकाण नाहीं.

नाना०—( दुरून बापूजीच येत आहेत हें पाहून ) हे पहा आलेच ते.

बाबा०—यावें बापूजी! उद्याची आठवण आहे ना?

बापू०— हो, हो, हें काय विचारावें ? थोडासा यावयाला विलंब लागला. आपल्याकडे यावयाला निघालों तों तें कृष्णाजीपंत आले. तेव्हां जरा त्यांच्याशीं बोलत बसावें लागलें.

बाबा०—सबबी पुरे हो, मी कुठें तुम्हाला विचारतो आहे ? बरें काल सां-गितल्या प्रमाणें उद्याची बिनचूक तयारी करा. बोलावण्याची याद तुमच्या जवळ कालच दिली आहे. बोलावयाला नानासाहेबानां बरोबर घेऊन जा.

बापूजी०--ठीक आहे. मग उगीच आतां उशीर उपयोगी नाहीं. मी जातों तर. हो, बरें पण तें देशमुखांच्या घराविषयीं काय झालें तिकडे बलावणें करावयाचें कीं, काय?

बाबा०—त्याचा आम्हीं विचार केला. बोलावणं करावं हें बरं, समजलां ?

बापू०—हो तें उत्तमच. मी येतों तर.

बाबा०—ठीक आहे. मला ही त्याला तात्यासाहेबांकडे जावयाचें आहे. ( जातात ).

पूर्व प्रवेशीं सांगितल्याप्रमाणें दुसरे दिवशीं बाबासाहेबांचे घरीं वाढदिवसाची अगदीं गर्दी उडाली होती. प्रातःकाळींच त्यांचा वाडा कर्णमधूर वाद्यांच्या ध्वनींनें दुमदुमून गेला होता. श्रीमंत लोकांच्या

सांप्रदायाप्रमाणें नाना वाद्यांचा गजर चालला आहे. अशावेळीं इंदुकले-प्रमाणें वृद्धिंगत होणाऱ्या त्या बालकास मंगलस्नान घातलें. दुपारीं निमंत्रित वेळीं इष्ट मित्रांची गर्दी व्हावयास लागली व तो वाडा एकाद्या विवाहमंडपाप्रमाणें शोभिवंत दिसूं लागला. सर्व मंडळी जमल्यानंतर मंडळी भोजनास बसली. बाबा साहेबांच्या येथील भोजनाचा थाट! तो काय विचारावयाचा आहे! ईश्वर कृपेनें संपत्तीची अनुकूलता व एकादें कृत्य थाटानें करण्याची हौस हीं एकवट-ल्यावर मग त्या बेतांत कसर कोठून रहाणार! असो. याप्रमाणें आत्मारामाचा महिन्याचा बाळदिवस मोठ्या थाटानें केला.

### शिंतळ* शिमगा.

एके दिवशीं सायंकाळचे प्रहरीं माडीवरील दिवाणखान्यांत खुर्चीवर बसून बाबासाहेब रस्त्यावरील शोभा अवलोकन करित होते. त्यांच्या घरापुढें एक रमणीय बगीच्या होता. त्यांत सुवासिक व चित्र विचित्र रंगांचीं फुललेलीं लहान लहान झाडें ज्यांत आहेत अशा कुंडया हारीनें टेविल्या होत्या.. मधून मधून चिंचोळे रस्ते होते. त्यांच्या दुतर्फा हिरव्याचार गवतानें शोभायमान दिसत होत्या. मध्यभागीं एक कारंजें होतें तें थुई थुई उडत होतें. त्याचे ते स्वच्छोदकाचे तुषार कारंज्याच्या सभोंवतीं जाई, जुई, चमेली अशा कृशांगी वेली एकत्र गुरफटून गेल्या होत्या त्यांजवर पडत, तेव्हां त्यांजवरील सकुमार फुलें जणूं माना डोलावून कोणास बोलावित आहेत असें वाटे! बाबा साहेबांनीं एक मोर पाळला होता. तो तेथें आपला पिसारा वर करून मोठ्या डौलानें नाचत होता. अशी ही शोभा अवलोकन करून दुःखीकष्टी प्राण्याचेंही मन शांत व्हावयाचें, मग बाबा साहेबांसारख्या सुखी मनुष्याच्या अंतःकरणांत किती उल्हास व्हावा? अशा उल्हा-सानें भरलेल्या बाबा साहेबांच्या अंतःकरणांत जगन्नियंता जगपालक जो परमेश्वर ज्यानें अशा रमणीय वस्तु निर्माण केल्या त्याच्या अगाध लीला येऊं लागल्या आणि त्यांचें मन त्याचे आभार मानूं लागलें. असें त्यांचें मन अगदीं गर्क झालें आहे, इतक्यांत बाईसाहेब तेथें येऊन उभ्या राहिल्या. पुढें त्या उभयतां मध्यें जो संवाद झाला तो येणें प्रमाणें:—

**बाईसा०**—ऐकलंका, रंगपंचमीला किती दिवस आहेत म्हटलं!

**बाबासा०**—आहेत चार दिवस. बरें पुढें आपल्या काय मनांत आहे?

**बाईसा०**—माझ्या मेलं मनांत तें काय असाचं! दरसालसारखं हळदकुंकू

---

* हें कृत्य फाल्गुन वद्य ५. म्हणजे रंगपंचमीचे दिवशीं करितात. यास कायस्थ प्रभू ज्ञातींत शिमगा पोटाळणें असें म्हणतात.

करायचंच, पण यंदां आत्मारामाचा शितळ शिमगा नाहीं कां करायचा ?

**बाबासा०**—हो करावयाचा, आमची काय ना आहे ! पण आणखी कांहीं कमजास्त करावयाचें आहे असें दिसतें.

**बाईसा०**—मनांत मेलं पुष्कळ येतं, पण उपयोग काय !

**बाबासा०**—तुमची जेव्हां पहावी तेव्हां कुरकूर आहेच. कधीं असें सांगितलेलें आठवत नाहीं कीं, मला अमुक एक पाहिजे आहे. आढे वेढे घेऊन थोडीशी कुरकूर फुरफुर केल्या शिवाय सांगतांच येत नाही. तरी पण बरें आहे. जें जें मागतां तें तें मिळत आहे. बरें आतां येऊं द्या तोंडांतून एकदां.

**बाईसा०**—( हास्यमुखकरून ) असं मनांत आहे कीं, कांहीं बायकांना नाहा-यला घालावं, व त्यानं लुगडीं आणि पातळें द्यावीं. आणखी मुलांनां झबलीं आणि गाठ्या द्याव्या. दुसरं तें काय असणार ?

**बाबासा०**—तुमच्या बायकानां तेवढें द्या ह्मणून सांगायाला तयार ! कांहीं पुरुषानां पागोटीं द्या असें नाहीं सांगितलें तें? बरोबरच आहे, तुह्मांस जें पाहिजे तें कुरकूर करून जरासा राग आणून मागून घेतां येतें. आह्मी कोणांजवळ जावें ?

**बाईसा०**—मला वाटलंच होतं कीं, आतां कांहीं तरी कडी होणार ! पुरुषांस पागोटीं द्यायचीं असलीं तर द्यावीं बापडीं ! माझं काय जातं आहे त्यांत! बरं तसं नाहीं ना करायचं ?

**बाबासा०**—आह्मी कोठें नाहीं ह्मणून ह्मणतां. दहा दहा लुगडीं व पातळें पुरीं होतील कां ?

**बाईसा०**—दहा लुगडीं आणि दहा पातळें मिळून एकंदर किती वीस झालीं ना? पुरेत, पुष्कळ झालीं. पण तितकेच खण व दहा झबलीं पाहिजेत.

**बाबासा०**—बापूजी, दुर्गाशेटकडे जाऊन १० लुगडीं व १० रेशिमकाठीं पातळें घेऊन या. तसेंच खण २० चांगले नागपुरी आणा व शिंप्यास मुलांचीं झबलीं १० शिवून रंगवून आणण्यास सांगा. (बाईसाहेबाकडे पाहून) बापूजी, पांच पांच सहासहा रुपयांचीं लुगडीं आणा ह्मणजे झालें.

**बाईसा०**—तीं काय मोलकरणींना द्यायचीं असतील वाटतें? तें कांहीं नाहीं, दहा दहा रुपयांहून कमी किमतीचीं लुगडीं मुळींच कामाला पडावयाचीं नाहींत. बापूजी, समजलांत कां एक एक रुपयाचा खण आणा हो. तुह्मी मागं एक खणाळं आणलं होतं त्या तऱ्हेचेच आणा ह्मणजे झालं.

**बाबासा०**—बरें आहे तुमच्या मर्जीप्रमाणें होऊं द्या.

बापूजी बाजारांत जाऊन लुगडीं, पातळें व खण आणून बाईसाहेबांस दाखवून त्यांच्या पसंतीप्रमाणे खरेदी करितात.

**बाईसा०**—सखाराम. अरे इकडे ये, ती साळू कासारीण तुला माहित-आहेना? तिला रंगपंचमीच्या दिवशीं सकाळीं चांगल्या बांगड्या घेऊन यायला सांगून ये. जा आतां कसा पाहूं!

( सखाराम जातो. )

पूर्व संकेताप्रमाणें रंगपंचमीच्या अदले दिवशीं सर्व तयारी होऊं लागली. दुपारचें जेवण झाल्यावर सायंकाळच्या सुमारास बाईसाहेब पार्वतीस हांक मारून ह्मणाल्या, अग, तुला तें वाईकरांचं घर माहित आहे कां ?

( रमा जवळ उभी होती ती पुढें येऊन )

**रमा०**—पार्वतीबाईला आहे तर खरं ठावक. मीनीबि तें बागितलं ह्यायें.

**बाईसा०**—बरं तर, तुह्मी दोघीजणीं त्यांचे घरीं व दुसरे कोणाकडे जायचं तें मी पार्वतीला सांगितलें आहे, त्या सगळ्या घरीं जाऊन मुलींबाळींसुद्धां उद्या नहायला व जेवायला येण्याचं कुंकू लावून या. ( सखारामास हांक मारून ) अरे तूं कुठें गेला होतास. संध्याकाळ होत आली, मखराची तयारी केलीस का? केळींचे खांब बागेंत जाऊन घेऊन ये, ह्मणून तुला सकाळींच सांगितलं आहेना !

**सखारा०**—आपण चौकांत येऊन तर जा ह्मणजे आपल्याला सर्व समजेल. मखर केव्हांच पुरें करून ठेविलें आहे.

**बाई०**—अग आई ! होय का ? तूं हुशारच आहेस रे बाबा ! बरं, एक काम तर आटोपलं. आतां चौघडेवाले, ताशेवाले व वाजंत्रीवाले यांस सांगून ये. अगदीं सकाळीं या ह्मणून सांग हो.

रात्रीं खोबऱ्याचीं दुधें काढलीं. सुगंधिक उटणीं तयार करून ठेविलीं. वेलबुट्टी काढून चमत्कारिक रंगानें रंगविलेल्या बिलोरी कांचेच्या कुप्या नानाप्रकारच्या सुवासिक अत्तरांनीं भरून ठेविल्या. लुगडीं, पातळें व खण यांचा बस्ता बांधून ठेविला.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं मागील चौकांत स्नानास पाणी तापत ठेविलें. स्त्रियांस बोलावणीं गेलीं. कासारीण तऱ्हेतऱ्हेचें सामान आणून मागील चौकांत बसली. पुढील मंडपांत वाद्यांचा गजर होऊं लागला. स्त्रिया कोणी गाडींत व कोणी पायींच येऊं लागल्या.

स्त्रियांस बसण्यास माजघरांतील दिवाणखान्यांत बैठक घातली होती तेथें बाईसाहेब स्त्रियांस बसवीत होत्या. स्त्रिया आल्यावर नहाणास सुरुवात झाली.

मागील चौकांत चौपाट काढून चौरंग मांडिला होता त्यावर प्रत्येकीस बसवीत, नंतर प्रत्येकीस मर्जी प्रमाणें बांगड्या भरल्यावर खोलींत नेऊन तेथें मांडलेल्या चौरंगावर बसवीत. त्या ठिकाणीं न्हाणाचें सर्व सामान होतें. अंगास लावण्याकरितां मोलकरणी तत्पर होत्या. तेथें चौरंगावर बसल्यावर कोणी वेणीचे केंस मोकळे करून दूध लावी, कोणी उटणीं अंगास लावी, व कोणी तेलें लावी; याप्रमाणें तेथें मर्जीनुरूप अंगास लावल्यावर त्यांस स्नानाच्या ठिकाणीं नेऊन केळीच्या मखरांत बसवीत. तेथें बसतांच उष्णोदकानें भरलेलीं घंगाळें आणून ठेवीत. नंतर कोणी केस साफ करून विंचरीत, कोणी हात व पाय चोळीत. याप्रमाणें स्नान आटपल्यावर आंग पुसल्यानंतर कोणास लुगडें व कोणांस पातळ नेसावयास देत.

अशा रीतीनें सर्वांचीं स्नानें झाल्यावर सुंदर मिष्टान्नभोजन झालें.

सायंकाळीं स्त्रियांस हळदकुंकूवाचें आमंत्रण गेलें. माडीवर बैठक घातली. त्याचें मध्यभागीं चौरंग मांडून त्यावर मश्रु घातला. त्या चौरंगाचे समोर तांब्याची घागर[1] उदकानें भरून त्यावर आम्रपल्लव व नारळ ठेवून मांडिली. स्त्रिया जमल्यावर लहान मुलासह त्याचे आईस चौरंगावर बसविली. नंतर तिस हळद कुंकूं देऊन ओटी भरली व तिला खण आणि पातळ दिलें. मुलास कुंकूं लाऊन दिवा उतरल्या नंतर त्याचें पोट त्या घागरीस तीन वेळां लाविलें. त्याच्या गळ्यांत निरनिराळ्या गाठ्या घालून अंगांत झबलें घातलें.

हें[2] कृत्य आटोपल्यावर सर्व स्त्रियांस हळदकुंकूं व कोणास पैतळ व कोणास लुगडें आणि खण देऊन ओट्या भरल्या. मुलांस झबलीं देऊन गळ्यांत गाठ्या घातल्या. नंतर पानसुपारी, हार गजरे, अत्तर गुलाब देऊन केशराचा रंग उडविला.

**उष्टावण[3].**

एके दिवशीं बाईसाहेब माडीवरील खोलींत बसल्या होत्या, जवळ दोघी सुना व काशीबाई कांहीं शिवणकाम करीत बसल्या होत्या, इतक्यांत वडील सुन सीताबाई आत्मारामास कडेवर घेऊन तेथें आली.

**सिता,**—( बाई साहेबांस ) आतां ह्याचं उष्टावण करण्यास कोणती हरकत आहे?

---

१ घागरीच्या खालीं भाताचे दाणें घालून घागरीस कुंकुवाच्या गंधाचीं बोटें ओढावीं. घागर नवी असावी न मिळाल्यास जुनी घ्यावी. असें केलें म्हणजे मुलास उन्हाळा बाधत नाहीं. असा समज आहे.

२ याप्रमाणें आपल्या सामर्थ्यानुरूप करावें. मीं सांगितला हा प्रकार श्रीमंत लोकांचा आहे. परंतु गरिबांनीं नुसतें हळद कुंकूं द्यावें. याप्रमाणें मुलीचेंही करावें. असा प्रकार तीन वर्षें पर्यंत करण्याचा परिपाठ आहे.

३ उष्टावण म्हणजे मुलास प्रथम अन्न खावयास घालणें हा प्रकार सातव्या महिन्यांत करावा असा कुळाचार आहे. उष्टावण करण्यास मुलाचा मामा असावा असा परिपाठ आहे.

बाईसा.—हरकत ती कसली आहे! पण तुझा भाऊ आला पाहिजेना! त्याला सध्यां रजा मिळत नाहीं म्हणून त्याचं पत्र आलं आहे. हा सातवा महिना नुकतांच लागला आहे. बांतच केव्हां तरी करून टाकूं म्हणजे झालं.

काशी.—अग बाई? हा सातवा महिना का. पण कायग वहिनी तुझी इतकी घाई ग कशाला पाहिजे! लहान मुलानीं जेवावं हें काय मेलं चांगलं का दिसतं!

बाईसा.—अग तसं नाहीं. सातव्याच महिन्यांत तें करावं असं आहे, म्हणून मेली घाई. हो बरी बाई आठवण झाली, आतां जवळच गुढीपाडवा आला आहे, त्याच दिवशीं उरकून घेऊं म्हणजे झालं. पुढें तुला पण सासरचं बलावणं लवकरच येईल, आणि आत्मारामचा मामा दिखील गुढीपाडव्याला येईल.

काशी—हें ग काय असं आई! तुझं मेलं नाहीं तेंच म्हणणं! इश्य मेलं! असं कां पण भिकारड्या सारखं! तुम्हाला कांहीं एकादं कार्य एकांतएक करून घ्यावयाला नको. आणि त्यांतून मेलं सणावारीं कोण बसलं आहे तुमच्याकडे यायला! किती झाला तरी तो वर्षाचा दिवस. ते कांहीं उपयोगी नाहीं. तुम्हालां करायचंच असलं तर एकादा गडे चांगलासा दिवस पहा आणि त्या दिवशीं करा.

बाईसा.—मला वाटलंच होतं, आमच्या काशी बाईनं कुठला माझा विचार मानायला! बरं बाइ तूं म्हणतेस तसंच करूं हो.

पुढें कांहीं दिवसानंतर शुभ दिवस पाहून उष्टावण करण्याचा निश्चय केला

अदले दिवशीं सर्व तयारी होऊं लागली. श्रीमंत लोकांकडील थाट काय विचारतां? आचारी पंचपक्वान्नें करीत आहेत, स्त्रिया त्यांजवळ बसून त्यास सांगताहेत, बाईसाहेब उदइक लागणाऱ्या साहित्याची तयारी करीत आहेत, या प्रमाणें चोहोंकडे गडबड झाली होती. सायंकाळच्या सुमारास बाईसाहेब राधाबाईस हाकमारून म्हणतात.

बाई—तूं सितारामपंत वकील व बापूजी देशपांडे यांच्या घरीं जाऊन त्यांजकडील सर्वांस उद्या जेवण्यास येण्याचं कुंकू लाऊन ये.

काशी.—अग, आई ती नाशिककरांकडे कोणी एक बडोद्याची पाहूणी आली आहे. ती वहिनीची कोणशी नातलग आहे, तिला पण बलावलं पाहिजे. नाहीं कां?

बाई.—मग गडे तूंच जा. आणि राधेलापण बरोबर ने. ( तिघी जातात. )

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं वाजंत्री व चौघडा वाजूं लागला. ताशे खणाणूं लागले. आत्मारामास वाजत गाजत मंगलस्नान घातलें.

---

१ मुहूर्त कसा असावा हें मुहूर्तराज ग्रंथ पहा.

जेवण्याच्या वेळेस माजघरांत मोठ मोठें शिसवी पाट मांडिलें. लाल भडक गुलालावर लखलखणाऱ्या रांगोळीचा कणा काढला. वेलबुट्टीदार महिरापी काढून हिरवीं चार विस्तीर्ण केळपात्रें मांडिलीं. उदबत्त्यांचीं झाडें ठेविलीं. चांदीचीं ताटें व वाटया मांडून, त्या पांढऱ्या शुभ्र ताटांत पिवळे जरद पदार्थ वाढिले. क्षिरीनें वाटया भरून ठेविल्या. नाना प्रकारचीं लोणचीं व कोशिंबिरी वाढिल्यामुळें पानें भरून गेलीं.

एका पाटाखालीं चौपाट काढिला. आडणीवर चांदीचें मोठें ताट मांडिलें. त्या सभोंवतीं वेलबुट्टीचा कणा व महिरापी काढिल्या. जवळ समया लावून अगर-बत्त्यांची व उदबत्त्यांचीं झाडें पेटवून ठेविलीं.

मंडळी आल्यावर त्यांस पाय धुण्यास ऊन पाणी दिलें. सर्व पितांबर नेसू-न पाटावर बसले.

चौपाट काढिलेल्या पाटावर मुलाच्या मामास बसवून मुलास त्याचे मांडीवर दिलें. नंतर कुंकूं लाऊन दिवा ओंवाळिला. मामानें सुवर्णाच्या आंगठीनें मुलाच्या मुखांत खीर घातली.[१] नंतर सर्व मंडळी जेऊं लागली.

याप्रमाणें मोठया थाटानें पंच पक्वान्नाचें भोजन झाल्यावर मंडळीस पान सुपारी, अत्तर, गुलाब, हार, गजरे दिल्यानंतर मंडळी उठून गेली. नंतर स्त्रियांचें भोजन याच थाटानें झालें.

## करगोटे वाटणें.

आत्माराम सात महिन्याचा झाल्यावर चांगला दिवस पाहून ८ करगोटे रेशमी व ७ पितळेच्या लहान वाटया आणिल्या. मुंज न झालेल्या सात मुलांस व स्त्रियांस हळदकुंकुवास बोलावल्या. मुलगे आल्यावर प्रत्येकास वाटींत एक करगोटा, कुंकूं, बदाम व खारीक घालून ती वाटी दिली नंतर आत्मारामाच्या कमरेस एक करगोटा बांधिला. नंतर स्त्रियांस हळदकुंकूं देऊन साखर वाटिली.

( जर हा प्रकार नवव्या महिन्यांत केला तर ९ करगोटे वाटावे. गरिबांनीं पितळी वाटयांच्या ऐवजीं खोबऱ्याच्या आणाव्या. )

## जावळ

( हा प्रकार आकराव्या महिन्यांत करावा. जर त्या महिन्यांत झाला नाहीं, तर पुढें तीन वर्षेपर्यंत होत नाहीं. )

ग्रंथाचा कथानायक आत्माराम आतां आकराव्या महिन्यांत चालूं लागला. दोन अक्षरी शब्द त्याच्या तोंडांतून येऊं लागले. असा तो दिवसानुदिवस

---

१ ही आंगठी मुलास मामानें द्यावी. या प्रमाणें मुलीचेंही उष्टावण करावें.

लहानाचा मोठा, व त्याला अगदीं समजत नव्हतें तो कांहींसा समजदार होत चालला.

हा अकरावा महिना चालला असतां एके दिवशीं बाबासाहेब व शिवराम भाऊ कांहीं बोलत बसले आहेत इतक्यांत बाईसाहेब तेथें आल्या.

**बाईसा०**—आपल्या आत्मारामास हा आकरावा महिना चालला आहे, तर ह्या महिन्यांत त्याचें जायवळ केलें पाहिजे.

**शिवराम०**—हो, ह्या महिन्यांत केलें तर बरें. पुढें तीन वर्षें होणार नाहीं.

**बाबासा०**—जायवळास मुख्य मुलाची आत्या असली पाहिजे. कारण, हा सर्व मानपान तिचा असतो. ती आपल्या घरीं आहे.

**बाईसा०**—तिच्या 'वांचून जायवळ कसें करावें? तिला बलावणें पाठवावें ह्मणजे ती येईल.

**शिवराम०**—पत्र पाठवून तिच्या नवऱ्यालाच घेऊन येण्याविषयीं लिहावें ह्मणजे दोघेंही बरोबर येतील.

**बाबा०**—आज त्यांना एक पत्र लिहा, व त्यांत जायवळ करण्याचा विचार ठरला आहे, हें दर्शित करा ह्मणजे ते तयारीनें येतील.

पुढें याप्रमाणें शिवरामभाऊंनीं आपल्या मेहुण्यास पत्र धाडलें व पत्र पावतांच मंडळी आली. काशीबाई आल्यावर दुसऱ्याच दिवशीं जायवळ करण्याचा बेत ठरल्यावरून बाबासाहेब त्याच्या तयारीस लागले.

**बाबासा०**—( शिवराम भाऊस ) उद्या चार मंडळी भोजनास बोलविली पाहिजे.

**शिवराम०**—कोणास बोलवावें तें सांगा, ह्मणजे त्याप्रमाणें तजवीज करण्यास ठीक पडेल.

नंतर बाबासाहेबानीं कोण कोण मंडळी भोजनास बोलवावी व कोणता बेत करावा, हें सांगितलें.

**बाबासा०**—( सखारामास ) अरे, उद्या आत्मारामाचें जायवळ करावयाचें आहे ह्मणून धोंडया न्हाव्यास सकाळीं आठ वाजण्याचें आंत येण्यास सांग-व ताशे आणि वाजंत्रीवाल्यांस सकाळीं येण्याविषयीं ताकीद दे.

दुसरेदिवशीं प्रातःकाळ झाली, पाकोळ्यांचे थवे आकाशमंडळांत घिरट्या घालूं लागले. अंगास झोंबणारा गार वारा वाहूं लागला. पूर्वेस शुक्राची चांदणी चमकूं

लागली. ब्राह्मणांचा वेदघोष सुरू झाला. शिवालयांत " हरोम् हरोम् " असे शब्द होऊं लागले.

नभोमंडळ लाल दिसूं लागलें. सडासारवण करून, रांगोळ्या घालून, भांगे धुऊन, स्त्रिया दधिमंथनास लागल्या.

बाबासाहेबांच्या वाड्यांत सडा सारवण पडलें, बैठकी घातल्या, व वाद्यांचा गजर सुरू झाला.

न्हावी आल्यावर पुढील चौकांतील ओसरीवर समोरा समोर चौपाट काढून चौरंग मांडिले. एकावर आत्मारामास मांडीवर घेऊन नारायणरावास बसविलें, व दुसऱ्यावर न्हाव्यास बसविलें. नंतर मुलाच्या आतेनें ( काशीबाईनें ) चांदीची वाटी, सोन्याची कातर व रेशमी रुमाल, असें सामान तेथें आणून ठेविलें. न्हाव्यास व मुलास कुंकू लाऊन दिवा ओंवाळिला. नंतर जायवळास सुरुवात झाली.

जायवळ आटोपल्यावर न्हाव्यास चांदीची वाटी, सोन्याची कातर व रेशमी रुमाल असें सामान दिलें. या शिवाय ढोलापागोटें दिलें. नंतर मुलाच्या अंगास तेलें व उटणीं लावून त्यास अभ्यंग स्नान घातलें.

बोलाविलेल्या मंडळीस पंचपक्वान्नांचें भोजन घातल्यावर मंडळी मोठ्या आनंदानें आपआपल्या घरीं निघून गेली.

ह्याचप्रमाणें स्त्रियांचें भोजन झाल्यावर बाइसाहेबांनीं रमेस गावांत स्त्रियांस हळद कुंकवाचें आमंत्रण करावयास पाठविलें.

नंतर माडीवरील दिवाणखान्यांत बैठक घातली. तेथें चौपाट काढून चौरंग मांडिला. हळदीकुंकवाचें सामान तयार करून ठेविलें. स्त्रिया जमल्यावर प्रथम मुलाच्या आतेस चौरंगावर बसविलें. तिला मुलाच्या आईनें हळदकुंकू देऊन ओटी भरली. ( ह्या वेळेस जायवळाचे केंस चांदीच्या वाटींत घालून ती वाटी आतेच्या ओटींत घालावी. ) आणि तीस लुगडें व खण दिला. नंतर मुलाच्या केंसाचें भारोभार सोनें मुलाच्या आतेस दिलें.

हें कृत्य आटोपल्यावर मुलासह मुलाच्या आईस चौरंगावर बसविली तिस हळदकुंकू दिलें. मुलास कुंकू लावून दिवा ओंवाळिला. आईची ओटी भरली. नंतर मुलाचे डोक्यावर एका स्त्रीनें परात धरली. त्यांत दुसरीनें बुंदीचे लाडू, पेढे व बत्तासे ओतले.

हें कृत्य आटोपल्यावर सर्व स्त्रियांस हळदकुंकू, अत्तरगुलाब व हारगजरे देऊन त्यांच्या नारळांनीं ओट्या भरल्या व सर्वांस पेढे वाटले.

( हा प्रकार श्रीमंत लोकांचा झाला. गरीबांनीं आपल्या सामर्थ्याप्रमाणें करावें. नापितास देण्याचें सामान मुलाच्या आतेकडून आलें पाहिजे. न आलें तर, घरचें करावें. पोशाख घरचा असावा. जर मुलाच्या आतेनें नाव्हास वाटी, कातर व रुमाल ह्या तीन वस्तु दिल्या तर त्यांबद्दल जायवळाच्या केसां भारंभार सोनें देण्याची चाल पडली आहे. श्रीमंत लोकांस असें करण्यास कांहीं हरकत नाहीं. गरीबांनीं असें केलेंच पाहिजे असें नाहीं. आत्या गरीब असली तर, ती चांदीची वाटी न आणता पितळेचीच आणते व कातरही लोखंडीच आणिते. तिला त्याचप्रमाणें सोनें किंवा रुपें द्यावें. माझ्या लिहिल्याप्रमाणें सर्व कृत्य करावें असें माझें म्हणणें नाहीं. ज्या चाली चालू आहेत, व ज्याप्रमाणें प्रकार होत आहेत, त्याप्रमाणें मला लिहिलें पाहिजे, व लिहिण्याचा प्रयत्नही केला आहे. )

**वर्षाचा वाढदिवस.**

मागें महिन्याचा वाढदिवस करून दाखविला आहे त्याचप्रमाणें मोठ्या थाटानें बाबासाहेबांनीं हा वाढदिवस केला.

**देवी काढणें.**

एके दिवशीं बाबासाहेब व शिवरामभाऊ माडीवर दिवाणखान्यांत बोलत बसले असतां तेथील देवीडाक्टर रामसिंग जयसिंग हे बाबासाहेबांचे भेटीस आले.

**बाबासा०**—( रामराम करून ) या डाक्तर साहेब; आज आपली स्वारी इकडे कोणीकडे ?

**रामसिं०**—आपल्या भेटीस बरेच दिवस झाले म्हणून आपल्या दर्शनास आलों. आपला नातू खुशाल आहेना ? तो आतां एक वर्षाचा झाला असेल ?

**बाबा०**—खुशाल आहे. त्याला नुकतेंच वर्ष झालें.

**रामसिं०**—तर मग त्याला छापला पाहिजे. आपला विचार कसा काय आहे ?

**बाबा०**—आमचे येथें अद्याप कोणासही छापिलें नाहीं. सर्वांस आंगच्याच देवी आल्या. व आंजपर्यंत त्यांपासून कोणास इजाही झाली नाहीं. म्हणून ती चाल अद्याप चालत आली. अलिकडे छापण्याचा प्रकार निघाला आहे. आतां कोणत्या मार्गास अनुसरावें. याचा विचारच आहे.

**रामसिं०**—विचार कशाचा त्यांत ! त्याचा असा प्रकार आहे कीं, मनुष्याला आंगच्या देवी येतात. परंतु त्यापासून इजा होत नाहीं, असें जरी आपलें म्हणणें आहे, तरी रंगांत रूपांत फरक पडतो, व त्यास फार दुःखें सहन करावीं लागतात. ते पूर्वींचे दिवस गेले. आतां कलियुगाचा महिमा आहे. कशाचा भरंवसा नाहीं. मागील

चाली सोडिल्या पाहिजेत. गुदस्तसालीं आपल्याच शेजारीं विष्णुपंत मामा यांचे नातवास आंगच्या देवी आल्या. त्यापासून त्याचा कसा परिणाम झाला? किती हाल सोसावे लागले? शिवाय ऊद कापूर किती खर्च झाला! ज्यांचे अंगीं देवी खेळतात अशा बाया त्यांचे घरीं रात्रन्दिवस घुमत होत्या. अखेर मुलाचे डोळ्यांत फूल पडलें, व एक हात वांकडा झाला. नंतर मुलाचे आईनें सितलादेवीची सेवा केली. परंतु इतका खर्च व इतकी मेहनत करून काय झालें? मुलगा तर निवर्तला! याकरितां हल्लीच्या मन्वंतराप्रमाणें आपल्या घरची चाल शिवरामभाऊंचे व आमचे पसंतीस येणार नाहीं. व या कामांत आह्मीं आपले कांहींएक न ऐकतां एके दिवशीं चांगलें बीं आणून छोकऱ्याला छापून टांकूं! मग आपल्याला राग येईल तर येवो.

( इतक्यांत काशिनाथ जोशी वैद्य येतात. परस्परांचे नमस्कार झाल्यावर. )

**बाबा**०—यावें वैद्यराजः फार दिवसांनीं दर्शन झालें. स्वारी कोठें बाहेर गांवीं गेली होती वाटतें ?

**वैद्य**०—हो, पंढरपुरापर्यंत गेलों होतों. यात्रा फार जमली होती; पण हवा थंड असून एकाकीं देवीची सात फारच पसरली. त्यापासून बरींच मुलें दगावलीं. पण इंग्रज सरकारची बुवा कमाल आहे! अहो सात उठली असें कळतांच देवी दाक्तरांनीं भरलेले डबेचेडबे पुण्याहून आले. आणि यात्रेंत चोहींकडे छापूं लागले. मोटमोठ्या स्त्रीपुरुषांनां किहो धरधरून छापीत! असें केलें ह्मणूनच सर्व लोक बचावले. पण चमत्कार काय? कीं छापण्याचा प्रकार सुरु झाल्या बरोबर आठ दिवसांत सातीनें कोठें पलायन केलें तें केलेंच !

**रामसिं**०—अहो वैद्यराज, अशा प्रसंगीं तर आपली चंगळ झाली असेल. का कांहीं रसायनें, मात्रा, व भस्में बिस्में नेलीं होतीं कीं नाहीं ?

**वैद्य**०—सगळें नेलें होतें, परंतु तें आमच्या बटव्यांतच. त्या दाक्तरांच्या शस्त्रांस व डब्यांस रसायनें वगैरे भिऊन बसलीं, तेथें त्यांचा हो काय पाड! स्वतः मलाच छापून घेण्याचा प्रसंग आला होता. पण बरा निभावलों. त्या लाल भडक तोंडाच्या टोपीवाल्यास शिवून त्याजजवळून अंगाला शस्त्र लावून कोणी घ्यावें. परंतु आपली तर आतां खातरीच झाली कीं, छापविण्याची रीति फार चांगली. अहो एकदां छापविलें ह्मणजे औषध कां पाण्याची जरूरच नाहीं. मग तुमचा ऊद, कापूर, गुलाल, फुलें यांची काय गरज? पूर्वापार चालत आलेली चाल चालवावयाची इतकेंच.

**रामसिं**०—कां वैद्यराज, आपल्या सारख्यांनीं छापण्याची रीति पसंत

करावीना? आतां आपण एकदां आपल्या घरांतील मुलांबाळांस टाका छापवून! आह्मीं आजपर्यंत सांगत होतों तें व्यर्थ. असो; आतां तर स्वतांचीच खातरी झालीना? ( बाबासाहेबांस ) कां? आतां आपले वैद्यराजही माझ्या बोलण्यास कबूल झाले. आतां आपला ग्रह कसा काय आहे?

**बाबा०**—वैद्यराज, आह्मीं नातवास छापवावें किंवा आंगच्याच देवी येऊं द्याव्या, याबद्दल विचार करीत होतों. इतक्यांत आपण आलां व आपला सर्व बोलण्याचा ओघ त्याच विषयाकडे वळला. असो. कसें काय वैद्यराज मग काय करावें?

**वैद्य०**—मी तर बोलूनच चुकलों आहे कीं, कोणीही देवी छापविण्यास कोणत्याही प्रकारची अडचण मनांत न आणितां हयगय करूं नये. सोपा मार्ग उपलब्ध झाला असून आतां धर्मभोळेपणाचें पटल डोळ्यांवर आणून ज्या मार्गानें गेलें असतां वाईट परिणाम होतात हें आपण पहातों त्या मार्गानें जाणें ह्मणजे आपल्याच हातीं आपण आपल्या पायांवर कुऱ्हाड मारून घेण्यासारखें आहे.

**बाबा०**—आतां आपलें मत असें पाहून माझ्यानें आग्रह धरवत नाहीं. परंतु बायकांची समजूत पडणें कठीण.

**वैद्य०**—अहो शिवरामभाऊ, मातोश्रीस बोलावून आणा पाहूं.

( बाईसाहेब येतात. )

**वैद्य०**—( बाई साहेबास ) कसें काय? नातवास छापवावयाचा किंवा आंगच्या देवी येण्याची वाट पहावयाची? छापावें हें फार चांगलें.

**बाई०**—आह्मां बायका मनुष्यास काय समजतें? आपल्या विचारास येईल तें खरें. फार दिवस चाल चालत आली ह्मणून मेला जीव भितो.

**वैद्य०**—ते पूर्वींचे दिवस गेले. आंगच्या देवी आल्यानें कशी मुलाची खराबी होते व किती हाल होतात हें आपण कधीं पाहिलें नाहीं का?

**रामसिं०**—बाईसाहेब, आपण मनांत कांहींएक धास्ती बाळगूं नये. आह्मीं चांगलें बी आणून आपल्या नातवास छापवूं. गांवांत देवीची साथ आहे करितां छापण्यास विलंब करतां कामास नये.

**बाबासा०**—बरें तर, लवकरच बी आणा. ( असें संभाषण झाल्यावर दाक्तर व वैद्य जातात. )

**बाबा०**—( बाईसाहेबास उद्देशून. ) छापण्यांत तुमच्या कडून कांहीं हरकत नाहीं ना?

बाई०—प्रथम चाल मोडावयास भिती वाटते. परंतु गोपिकाबाई असेंच ह्मणत होती. त्यांनीं आपल्या नातीस शिक्केच दिले. आतां चोहोंकडे चाल पडली आहे. ह्मणून कांहीं धास्ती धरावयास नको.

बाबा०—बरें तर, दाक्तर बी घेऊन येतील तेव्हां छापवूं. पण तुम्ही आपली तयारी ठेवा.

पुढें एके दिवशीं दाक्तर घरीं येऊन आत्मारामास देवी छापल्या.

छापल्यावर ताप येऊन ते फोड दिसूं लागल्यावर नांव ठेवितात. व नऊ दिवस ज्याप्रमाणें आंगच्या देवी आल्यावर उत्सव करावा लागतो त्याच-प्रमाणें छापल्यावर करावा. तो सर्व प्रकार बहुधा सर्वांस विदितच आहे. व तो सर्वसारखा नाहीं. भिन्न भिन्न प्रकार दिसोन येतात, करितां त्याची माहिती दे-ण्याची जरूर आहे असें वाटत नाहीं.

अशाच कांजण्या, वगैरे साती येतात त्यांबद्दल रूढी प्रमाणें करावें. गोंवर आल्यास फार सितोपचार करावे. न केल्यास त्या मुलाचे आंगीं उष्णता राहते. व पुढें शरीराची खराबी होते. इकडे सर्वांनीं लक्ष द्यावें.

## चौलविधि.

एके दिवशीं बाबासाहेब दिवाणखान्यांत बसले होते जवळ उपाध्ये कांहीं गोष्टी बोलत होते इतक्यांत शिवरामभाऊ तेथें येऊन ह्मणतात.

शिवराम०—अहो, आत्मारामास हें तिसरें वर्ष चाललें आहे. आतां त्याची शेंडी[1] ठेवावयास कांहीं हरकत नाहीं ना ?

उपाध्ये.—शास्त्राधाराप्रमाणें पहातां आतां चौलविधि करण्यास कांहीं हरकत नाहीं. व आतां केल्यावर पुनः व्रतबंधांत करण्याची जरूर नाहीं. खरा शास्त्राधार हाच आहे.

बाबा०— केव्हां तरी एकवेळ करावयास लागणार. परंतु कोणतेंही कृत्य शास्त्राधाराप्रमाणें करावें हें फार उत्तम.

शिवराम०—खरेंच उगीच शास्त्रविरुद्ध कां जावें पण ?

नंतर उपाध्याकडून दिवस चांगला पाहून त्या दिवशीं चौलविधि करण्याचा निश्चय केला.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं वाद्यें वाजूं लागलीं. कांहीं मंडळीस भोजनाचें आमंत्रण करावयास वामनराव गेले. उपाध्ये स्नान करून भस्माचे पट्टे ओढून गंध

---

१ यास शेंडी ठेवणें असें ह्मणतात.

लावून अंगावर शालजोडी व हातांत पळीपंचपात्री घेऊन आले. नापित घेऊन बसला. नंतर वैदिक कल्यास प्रारंभ झाला. ( या संस्काराचे संबंधाचे वैदिकी कर्मासंबंधाची माहिती पत्रकांत पहा.)

चौलविधि होऊन होम वगैरे वैदिक आटोपल्यावर ब्राह्मणभोजन झालें. नंतर सर्वांचें भोजन झालें.

### विद्या शिकविण्यास प्रारंभ.

( हा प्रकार मुलास पांचवें वर्ष लागलें म्हणजे करावा. )

आश्विनाचा महिना निघाला. नदीनाले पाण्यानें तुडुंब भरून वहात असतां कोठें "घों घों" व कोठें "झुळझुळ" असे मिश्रित आवाज निघत आहेत, डोंगर हिरवे गार दिसत आहेत, त्यावरून लहान लहान ओढे खालीं पडताहेत, त्यांचें निर्मळ पाणी सूर्याचे आरक्त किरण त्यांजवर पसरल्यामुळें चकाकत आहे, मोठमोठीं कृष्णमुखीं वानरें एका झाडावरून दुसऱ्यावर टणाटण् उड्या मारीत आहेत, त्यांचें ओरडणें चाललें आहे, तें ऐकून लहान श्वापदें भयानें कोणी झुडपांत, कोणी झाडाच्या ढोलींत व कोणी भगदडांत लपत आहेत. गोंवारी पोंवारीच्या मंजूळ नादानें गायास रंजवीत आहेत, त्या हिरवें चार गवत व झाडांचीं पानें खात आहेत. शेतकरी डोक्यावर घोंगडी, कमरेस कोयता व हातांत कुदळी घेऊन शेतांत फिरताहेत, आणि पक्षांचे कळप डोंगरावरून खालीं नदीवर पाणी पिण्यास येत आहेत.

सूर्य अस्तास गेला. अंधःकार पसरत चालला. शहरांतील राजरस्ते मनुष्यांच्या गर्दीनें भरून गेले. बाजारपेठेंत अगरबत्यांचा व उदाचा घमघमाट सुटला. अंबिकेच्या देवालयांत घटस्थापना झाल्यामुळें चौघडे वाजूं लागले. फुलांचा, व कापूर, उदबत्त्या वगैरेंचा घमघम सुवास सुटला. बाबासाहेब देवदर्शन करून घरीं आले. सर्व विचारपूस झाल्यावर व फराळ आटोपल्यावर, बाबासाहेब शालजोडी पांघरून डोक्यास रुमाल गुंडाळून दिवाणखान्यांत लोडाला टेकून बसले आहेत जवळ आत्माराम बसला आहे. नातवाच्या व आज्याच्या कांहीं गोष्टी चालल्या आहेत, इतक्यांत शिवरामभाऊ तेथें आले.

शिवराम०—( कांहीं बोलणें झाल्या नंतर. ) आतां आत्मारामास शाळेंत घालावा. त्याला हें पांचवें वर्ष लागलें व बरेंच समजूही लागलें आहे.

बाबा०—कायरे आत्माराम, शाळेंत रोज जाशील, किंवा हट्ट घेऊन घरींच बसशील ?

आत्मा०—छे ! मी कधी नाहीं हट्ट करावयाचा. मी आपला रोजच्या रोज शाळेंत जात जाईन.

शिवराम०—बरें तर तुला शाळेंत लवकरच पाठवितों.

बाबा०—लांब नकोच, उद्या दसरा आहे; उद्याच मुहूर्त करावा. बापूजी ! अहो बाजारांत जाऊन एक पाटी, लेखणी, व रेशमीरुमाल घेऊन या. व सखारामपंत पंतोजी यांस मी बोलाविलें आहे म्हणून सांगा.

बाबासाहेबांच्या आज्ञेप्रमाणें बापूजींनीं ताबडतोब सर्व सामान घेतलें आणि येतानां सखारामपंत पंतोजी यांजकडे जाऊन त्यांस घेऊन आले.

बाबा०—( पंतोजी आलेसे पाहून. त्यास ) या गुरुजी बसा. आपली शाळा बरी चालली आहे असें एकेतों. परवां ते देशमुख मजकडे येऊन सांगत होते कीं, मुलांस बसण्यास जागा पुरत नाहीं म्हणून एक शाळागृह नवीनच बांधावें असा त्यांचा विचार आहे.

पंता०—आपल्या सारख्यांची कृपा असली म्हणजे आम्हांस काय कमी आहे? मुलांची संख्या दीडश्यांवर झाली आहे. बसण्यास जागा अगदीं पुरत नाहीं. लवकर तजवीज होईल तर बरें.

बाबा०—आह्मीं त्या तजविजींत आहों. हो, बरी आठवण झाली. ते त्यादिवशीं येथें डेप्युटी आले होते त्यांस तुमची शाळा रजिस्टर करण्याविषयीं सांगितलें आहे. पहावें आतां काय होतें तें. पण तुह्मीं मुलांची चांगली तयारी कराहो; ते परीक्षा घेण्यास लवकरच येतील असें वाटतें.

पंतोजी०—बरें आहे. मी आपल्याकडून तयारी करवितों; परंतु आपला आधार असला म्हणजे झालें.

बाबा०—त्याबद्दल तुह्मी स्वस्थ असा तें काम माझें. बरें पण उद्यां दसरा आहे; त्या मुहूर्तानें आमच्या आत्मारामास आपल्या स्वाधीन करावें असा विचार आहे. ह्मणून आपल्याला आतां बलावलें.

पंतोजी०—रावसाहेब यांकडीलही अमंत्रण आलें आहे. प्रथमतःमी आपल्या कडे येईन. सर्व तयारी करून ठेवावी. बरें येतों तर आतां.

बाबा०—ठीक आहे. यावें.

नंतर दुसऱ्या दिवसाकरितां कांहीं मंडळीस पानसुपारीचें आमंत्रण केलें.

---

[illegible] मुहूर्तराजपत्रक पहावें. 

ताशेवाले, सनईवाले आणि चौघडेवाले यांस प्रातःकाळीं येण्याविषयीं ताकीद करविली.

प्रातःकाळ झाला. सूर्यबिंब दृष्टिगोचर होऊन आरक्त किरण पसरले. दिवाणखान्यांत बिछाईत घातली. वाद्यें वाजूं लागलीं. आत्मारामास मंगलस्नान घातलें. पानसुपारीनें तबकें भरून ठेविलीं. सुवासिक फुलांच्या हारगजऱ्यांनीं चांदीचीं ताटें भरिलीं. गुरुजी आल्यावर त्यांनीं पाटीवर गुलाल घालून त्यावर "श्रीगणेशायनमः" इतकीं अक्षरें काढिलीं. नंतर आत्मारामाकडून त्यांची पूजा करविली. व त्याचा हात धरून अक्षरें लिहविलीं. कांहीं वेळ असें केल्यावर आत्मारामानें गुरुची पूजा करून त्यांस पोषाख ( शेला व पागोटें ) दिला. आणि दक्षणा दिली. नंतर जमलेल्या मंडळीस पानसुपारी, अत्तरगुलाब, व हारगजरे वाटले. नंतर मंडळी आपापल्या घरीं गेली.

## इतर कृत्यें

श्रावण शुद्धसप्तमी म्हणजे (सितलासप्तमी) या दिवशीं पंचपक्वान्नें करून त्याचीं वायनें वाटण्याचा परिपाठ आहे. या कृत्याबद्दल माहिती सर्वांस असते म्हणून देत नाहीं.

फक्त मुलीच्या संबंधानें कांहीं जास्त कृत्यें करावीं लागतात तीं येणें प्रमाणें:—

मुलगी तीन वर्षांची झाली म्हणजे तिला एकादा चांगला दिवस पाहून परकर नेसवितात व बांगड्या भरितात. परकर व बांगड्या हिरव्या रंगाच्या असाव्या असा वृद्धाचार आहे. तिसऱ्या वर्षांतच हें कृत्य करावें.

मुलीस तिसऱ्या वर्षी हरितालिकाव्रत द्यावें. तिसऱ्या वर्षी न दिलें तर पांचव्या वर्षी देण्याचा परिपाठ पडला आहे. परंतु पांचव्या वर्षी द्यावें हें फार चांगलें कारण तिसऱ्या वर्षी मुलगी फारच लहान असते.

तिसऱ्या वर्षांत मुलीचें नाक सुमुहूर्तानें टोंचितात. पांचव्या वर्षी टोंचण्याचा. ही कोठें कोठें परिपाठ आहे.

ह्या भागांत जीं जीं कृत्यें करून दाखविलीं आहेत किंवा कशीं करावीं हें सांगितलें आहे, तीं सर्व कृत्यें सांप्रत सर्वत्र चालू आहेत. परंतु खालीं लिहिलेलीं कांहीं कृत्येंही कोठें कोठें आढळण्यांत येतात.

---

[1] इतर कृत्यें व वैदिक कर्मांचें साहित्यप्रकरण दिलें आहे. हीं कृत्यें कशीं करावीं, हें लिहिण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण बहुतेकांस तीं माहित असतात.

१. मुल उपडें होऊं लागलें म्हणजे करंज्या ( ज्यास कान्हवले म्हणतात ) करून कांहीं मित्र वगैरे मंडळीस भोजनास बोलवितात.

२. मुल हात नाचवूं लागलें म्हणजे लाडू ( कोणतेही ) करितात.

३. मुल चालूं लागलें म्हणजे पुरणपोळ्या करून त्यावरून मुलास चालवितात

ह्या ठिकाणीं हा भाग पुरा झाला. आतां ह्याच्या पुढील लहानसा पण सुरस कथाभाग पुढील भागांत देऊं.

---

# भाग २ रा.

## व्रतबंध.

सहस्रांशु हा जाय अस्तासि आतां । दिसे फार आरक्त ऐसा पहातां ॥
जणो भागला व्यावयाला विसावा । निघाला घरीं आवयाला असावा ॥ १ ॥
दिशा व्यापिल्या सर्वही अंधकारें । चकाकूं नभीं लागले फार तारे ॥
गुरें गोप आले घरीं तुष्ट भारी । दिवे लाविती लोक नानाप्रकारीं ॥ २ ॥
सडोतापडी आणखी हे प्रवासी । कसे धर्मशाळांत राहावयासी ॥
थकोनी श्रमोनी बहु प्राप्त झाले । क्षण स्वस्थ बैसोनि चित्तीं निवाले ॥ ३ ॥

( बाळबोध. )

मार्गशीर्षाचा महिना निघाला. हेमंतऋतूचा कडक अंमल बसत चालला. गुलाबी थंडी पडूं लागली. सायंकाळचा गार वारा सुटला. सूर्य अस्तास चालला नगरवासी स्त्रिया कमरेवर घागरी घेऊन नदीवर पाण्यास निघाल्या. नदीवर गच्च आंबराई होती. त्यावर पाचेसारिखे हिरवेगार राघू चिवचिव करीत होते व इतर पक्ष्यांचा किलकिल शब्दही मधूनमधून चालला होता. त्या आंबराईच्या सभोंवतीं कळकांचीं दाट बेटें होतीं. त्यांमधून वारा खेळत होता. आसपासची सर्व जमीन हिरव्या रंगानें फारच मनोहर दिसत होती. कांहीं अंतरावर उंच डोंगर होता. त्याजवरचीं झाडें, झुडपें व वनस्पति तऱ्हेतऱ्हेच्या रंगांच्या फुलांनीं गच्च फुललीं होतीं. त्यांजवरून शीतल वायु शहराकडे झुळूझुळू वाहत येई. आंबराईत मधून मधून बगीचे केले होते. त्यांत नदीच्या स्फटिकमय निर्मळ पाण्याचे पाट खेळविले होते. गुलाब, जाईजुई, वगैरे सुवासिक फुलांनीं पुष्पवटिका शोभायमान दिसत होत्या. त्यांजवरून मंद, सुगंध व सुशील वायु वाहत होता. डोंगरावरून पक्ष्यांच्या झुंडी नदीवर पाणी पिण्यास येत होत्या. त्यांतील नर मादीचे जोडे जलक्रीडा करीत होते. नदीच्या घाटावर सायंस्नानसंध्येस अग्निहोत्र्यांची गर्दि झाली होती. गुराख्यांचीं पोरें आपल्या गुरांस पाणी पाजून शहराकडे हांकीत चाललीं होतीं, वासरांच्या ओढीनें शेपटया चंवरीसारख्या वर धरून चौखुरी उड्या टाकीत गाई गांवाकडे धांवत चालल्या होत्या.

अंधःकार पसरत चालला. आकाशांत तारे चमकूं लागले. शहरांत चोहोंकडे दिवे लागले. बाबासाहेब देवदर्शन करून घरीं परत आले. नंतर फराळ

झाल्यावर माडीवरील दिवाणखान्यांत बसले होते, अवळ शिवरामभाऊ व बाबन-राव हे दोघे कांहीं लिहित होते, इतक्यांत चिंतामण जोशी येतात.

बाबा०—( नमस्कार करून ) यावें जोशी महाराज, आज इकडे कोणी कडे निघालां ?

जोशी०—आपलें दर्शन फार दिवसांत झालें नाहीं, ह्मणून आज मनांत आलें कीं बाबासाहेबांची भेट घ्यावी.

बाबा०—आजपर्यंत जसा लोभ ठेवीत आलां तसाच निरंतर असला पाहिजे. असो, सालमजकुरीं आत्मारामास आठवें वर्ष सुरू आहे. त्याचा व्रतबंध करून घ्यावा असा मनोदय आहे. आपलें कसें काय ह्मणणें आहे?

जोशी०—व्रतबंधास मुख्य गुरुबळ चांगलें असलें पाहिजे.

बाबा०—( पेटींतून पत्रिका काढून ) ही पत्रिका घ्या. सालमजकुरीं गुरु कितवा आहे ? अनुकूल असल्यास टाकूं उरकून.

जोशी०—( पत्रिका पाहून ) गुरु वृषभेचा. आत्मारामाची कर्क रास आहे, त्यास ११ वा येतो, हा व्रतबंधास फारच उत्तम मानिला आहे. पेस्तर १२ वा येईल, तो *अगदीं उपयोगीं नाहीं.*

बाबा०-असें आहे तर सालमजकुरीं व्रतबंध केला पाहिजे. मार्गशीर्ष तर संपत आला, पौष[1] महिन्यांत कार्य होणें नाहीं. तेव्हां माघ महिनाच योजावा. बरें, मुहूर्त कोणते लाभतात तें पहा !

जोशी०—( पंचांग पाहून ) माघ शुक्ल ५ गुरुवारचा मुहूर्त फारच उत्तम लाभतो. मुलास चंद्र १० वा येतो. असा दुसरा मुहूर्त मिळणार नाहीं.

बाबा०—ठिक आहे. हाच मुहूर्त योजूं. मुंजीचें कृत्य कांहीं लग्नासारखें मोठें नाहीं. सुमुहूर्त असेल तोच साधावा.

जोशी०—आपल्या सारख्या श्रीमंताचें काय हो? मनांत आणण्याची खोटी. हो पण किती घटकांचा मुहूर्त लाभतो तो पाहिला पाहिजे. ( पंचांग पाहून ) ९ घटकेचा मुहूर्त फारच चांगला आहे. तोच कायम करावा.

बाबा०—बरें आहे तोच योजूं.

(जोशी पानसुपारी घेऊन घरीं जातात.)

दुसऱ्या दिवशीं बाबासाहेब, शिवरामभाऊ व बाईसाहेब एके ठिकाणीं बसलीं असतां त्यांचें झालेलें संभाषण —

बाबा०—काल चिंतामण जोशी आले होते. त्यानीं आत्मारामाची मुंज

---

१ पौष महिन्यांत व्रतबंध व लग्न करीत नाहींत.

पंदाच करून घ्या असे सांगितलें आहे. पेस्तर गुरू प्रतिकूल होईल, तेव्हां करणें नाहीं.

शिवराम०—पंदा कार्य करण्यास कांहीं हरकत नाहीं. महर्गता आहे असेंही नाहीं. व पेस्तर गुरू प्रतिकुळ असल्यामुळें सालमजकुरीं करून घेतलेंच पाहिजे.

बाबा०—( बाईसाहेबांकडे पाहून ) तुमची कांहीं हरकत नाहींना. ह्मणजे सिताबाई गरोदर आहे, तिला दिवस कधीं होतील, तें मुख्य पाहिलें पाहिजे. मुली बाई, मुलाची आई माहेरीं गेली आहे, तिला येण्यास कांहीं हरकत नाहीना? हा सर्व विचार पाहून सांगा ह्मणजे ठीक पडेल.

बाई०—आमची हरकत ती कसली असायची. मुलीस बाळंत झाल्यास आतां तीन महिने होतील. तिला बोलावणं पाठवावं. सिताबाईस फाल्गुन महिन्यांत पुरे दिवस होतील, त्याचीही कांहीं अडचण नाहीं.

बाबा०—मार्गशीर्षाचे पांच दिवस राहिले करितां तुह्मीं सामान करण्यास आरंभ करा. सामान दोन तीन दिवसांत सर्व आणून देऊं.

दुसऱ्या दिवशीं बाबासाहेब व शिवरामभाऊ यांनीं मुंजीस लागणाऱ्या सरंजामाच्या व सामानाच्या यादी केल्या त्या.—

यादी चिरंजीव आत्मारामाच्या व्रतबंधा संबंधी.

शके. संवत. महिना.

( मुलाकरितां अलंकार. )

सोन्याचे हातांतील कडीं तोडे. कंठी व गोफ. चौकडा व भिकबाळी. जोडवीं व आंगठ्या. सोन्याचं जानवं.

२ वस्त्रें.

पागोटं, शालजोडी, धोतरं, पायजमा, झगा भरगच्चीचा.

३ भांडीं चांदीचीं.

तांब्या, जांब, तम्हन, पळी, ववकडी, गंधास साखळी, ताट व वाट्या.

इतर कापड.

उपाध्यास द्यावयास—पागोटें शालजोडी. अंतरपाटास कोरा शेला. मुलाच्या लंगोट्यांस व देवांस पिवळ्या रंगाचा ताप्ता. मांजरपाटी पंचे व रुमाल. रेशिम काटी हलके खण. मुलाच्या आईस रेशिमकाटी पातळ पैठणी. आप्तसगे, सोयरे-धायरे, मित्रमंडळी व वऱ्हाडी जमतील, त्या सर्वांस आहेर करावयाचा त्यास-पागोटीं, शालजोड्या, लुगडीं व खण वगैरे.

१ ह्या पातळास पिंवळा रंग द्यावा.

गडी, दासदास्या, पाणके, वाजंत्री, व चौघडेवाले, यांस द्यावयास-पागोटीं, शेले, लुगडीं, खण.

या कृत्यांत लागणारे शृंगारिक व भक्षणीय पदार्थ यांची यादी लग्नसमारंभ भाग ३ रा याच्या पोटभाग २ रा " कार्याची सिद्धता " यांत दिली आहे, त्याप्रमाणें सर्व सामान आणावें. तसेंच बैठकीचा सरंजाम व इतर सरंजाम त्याच यादींत दिला आहे त्याप्रमाणें व्यवस्था ठेवावी.

घरास रंगदेणें, जमीनी करणें, मंडप कापडून तयार करणें, व दुसरे मंडप घालून त्यांत स्वयंपाकाची व स्नानाची व्यवस्था करणें, गडी, दास्या, व मोलकरणी ठेवणें, ताशेवाले, वाजंत्रीवाले, चौघडेवाले, बाजेवाले, पाणके, आचारी आणि जरूर असल्यास कारकून ठेवणें, या सर्व व्यवस्थेविषयीं भाग ३ रा याचा पोटभाग २ रा यांत सांगितलें आहे, त्याप्रमाणें सर्व व्यवस्था करावी.

आप्तसगे, सोयरेधायरे व इष्टमित्र यांस कुंकूमपत्रें पाठवावीं व कोणास आणावयास पाठविणें असेल तर त्याप्रमाणें व्यवस्था करावी. पाठविणें याबद्दलची माहिती त्याच भागांत सांगितली आहे व्रतबंधासंबंधी कुंकूमपत्र लिहिणें त्याचा मसुदा भाग ३ रा लग्नसमारंभ पोट भाग २ रा यांत दिली आहे, त्याला अनुसरून असावा.

### केळवण करण्याचा प्रकार.

बाबासाहेबांच्या नातवाची मुंज माघ शुक्ल ५ ची आहे. असें गांवांत व्याही, आप्त सगे व मित्रमंडळी यांस कळतांच बाबासाहेबांचे व्याही ( नारायणरावाचे सासरे ) यानीं एके दिवशीं केळवण करण्याचा बेत केला तो येणें प्रमाणें.

आदल्या दिवशीं रावसाहेब व त्यांची स्त्री बाबासाहेबांच्या घरीं येऊन पहिपाहूण्यासह स्त्रीपुरुषांस भोजनाचें आमंत्रण देऊन गेली. दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं महादेवराव बाबासाहेबांकडे वाजंत्री, ताशे, वगैरे वाद्यांसहीत, व घोडा आणि म्याना घेऊन आले. नंतर आत्मारामास पोषाख घालून घोड्यावर बसवून व त्याच्या आईस म्यान्यांत बसवून, वाजत गाजत आपल्या घरीं घेऊन गेले. तेथें गेल्यावर दोघांस मंगळस्नान घातलें. नंतर भोजनसमयीं चौपाट काढून त्यावर मोठा पाट मांडिला. पुढें आडणीवर चांदिचें ताट पंचपक्वान्नांनीं भरून ठेविलें. त्याचप्रमाणें सर्वांचीं पानें मांडिलीं. आत्मारामास चौपाट काढिलेल्या पाटावर बसवून त्यास कुंकू लाऊन दिवा ओंवाळिला. नंतर सर्वांचें भोजन झालें.

---

१ याला मराठीत असेंही म्हणतात.

भोजन आटोपल्यावर सर्वांस पानसुपारी,[१] अत्तरगुलाब, हारतुरे देऊन नारळ वाटले. आत्मारामास व शिवरामभाऊंस पापोटें व शालजोडी दिली. नंतर स्त्रियांचें भोजन झाल्यावर चौपाट काढून, चौरंग मांडून त्यावर आत्मारामाच्या आईस बसविलें. तिस हळदकुंकूं देऊन ओटी भरिली, आणि लुगडें व खण दिला. याप्रमाणें सर्व आटोपल्यावर सर्वांस वाजत गाजत घरीं पोंचविलें.

पौष महिना निघून गेला. माडीवरील दिवाणखान्यास तजेलदार रोगण करून भिंतींवर नानाप्रकारचीं सुरेख चित्रें व वेलबूट काढिले. निरनिराळ्या रंगांच्या हांड्या व झुंबरें टांगिलीं. पुढील चौकांत सभामंडप तयार झाला. सुरूचे मोठमोठे खांब उभे करून त्यांजवर मेहरपदार कमानी केल्या. सर्व मंडपास पांढऱ्या शुभ्र कापडाचें छत लाऊन, लाल, हिरव्या व पिंवळ्या रंगाच्या कापडाच्या झालरी लाविल्या. हिरव्या, अस्मानी, केशरी, जांभळ्या, तांबड्या व पांढऱ्या रंगाच्या हांड्या व झुंबरें छतास टांगिलीं. त्यांत पाऊण पाऊणशें मेणबत्त्या लावण्यासारखें एकेक बिलोरी झाड होतें.

मागील चौकांतील मंडपांत स्वयंपाकाकरितां मोठमोठे हाळ खणून ते विटांनीं बांधिले. स्नानाकरितां हौदावर दोन[२] मंडप तयार केले. सर्व सामानानीं कोठी भरून गेली. वऱ्हाड बरेंच जमलें. सर्व वाडा मनुष्यांनीं भरलेला दिसूं लागला.

## नवग्रहशांति.

पूर्वेस शुक्राची चांदणी चमकूं लागली. अंगास झोंबणारा गार वारा वाहूं लागला. तडी, तापडी, वाटसरू, यात्रेकरू 'प्रातःस्मरामि' ह्मणत मार्ग क्रमूं लागले. पक्षांचें मंजूल गायन सुरूं झालें. मुखमार्जन करून, धावळ्या पांघरून हातांत कंदील व गडवे घेऊन अग्निहोत्री नदीवर माघस्नानास निघाले. जात्यांची घरघर व त्यांजवरच्यीं स्त्रियांचीं गाणीं कानीं येऊं लागलीं. इकडे आमचे बाबासाहेबांचे वाड्यांत गड्यांनीं मंडप सारवून ब्राह्मणांनीं स्नानाचें पाणी तापत ठेविलें.

आभाळ पांढरें फटफटित झालें. माणसाला माणूस दिसूं लागलें. स्त्रिया मुखमार्जन करून, वेणीफणी घालून हौदावर स्नानास चालल्या. पुरूष मंडळी उठली. बाबासाहेब स्नान करून देवखोलींत पूजा करावयास बसले.

सूर्यबिंब दृष्टिगोचर झालें. वाद्यांचा बाजा सुरूं झाला. मंडपांत आम्रपल्ल-

१ याचप्रमाणें घरचे केळवण करितात.

२ एक पुरूष मंडळीस व दुसरा स्त्रियांस.

यांनीं तोरणें बांधिलीं. दिवाणखान्यांत हिरवे, लाल, वगैरे रंगांचे इराणी गालीचे पसरून बिछाईत पडली.

एक प्रहर दिवस चढला. उपाध्ये व इतर भिक्षुक स्नान करून, भस्माचे पट्टे ओढून, गंध लाऊन अंगावर शालजोडी पांघरून, एके हातांत पळी पंचपात्री, व दुसऱ्या हातांत दर्भांची जुडी घेऊन आले.

**व्यंकटभ०**—पाहिलेंतना रामभटजी, कशी तयारी आहे ती? ( मंडपांत साहित्य ठेविलें होतें तें दाखवून. ) ह्या पहा समिधा, कशा बांधून ठेविल्या आहेत!

**रामभ०**—अहो, तें काय विचारितां! तुह्मी आह्मी चुकूं. पण बाबासाहेब कसले चुकतात! फारच दक्ष बुवा. इतकें मोठें वैभव असतां लहानसहान कामांत किती दक्षता! या पहा, सर्व वस्तु अगदीं तयार आहेत. कार्य करावें तर यांनींच. नाहीं तर ते रामराव देशमुख! अहो त्यांजकडे थोड्या दिवसांमागें सोहळा झाला, त्या वेळीं मीच गेलों होतों. बेटे दहा वाजून गेले पण कशास कांहीं पत्ताच नव्हता!

**व्यंकटभट०**—अहो, आतांची नवीन शिकलेली मंडळी या कल्यांकडे पहातच नाहीं. हे आमचे शिवराममाऊ काय थोडें शिकले आहेत? पण त्यांचें लक्ष अगदीं बाबासाहेबांप्रमाणें आहे.

**रामभ०**—अहो व्यंकटभट, आतां बोलण्याची वेळ नाहीं. ते पहा बाबासाहेब इकडे येत आहेत.

**बाबा०**—काय व्यंकटभटजी, सर्व साहित्य ठीक आहेना? कांहीं पाहिजे असलें तर तें मागून घ्या. बरें, आतां विलंब कां? करा आरंभ.

**व्यंकट०**—शिवराम भाऊ कोठें आहेत?

**बाबा०**—ते देवखोलींत संध्या करीत आहेत त्यांस घेऊन या.

नंतर व्यंकटभटजी घरांत जाऊन शिवरामभाऊ, त्यांची पत्नी व आत्माराम यांजकडून कुलदेवतेपुढें नारळ, विडा व सुपारी ठेववून कुलस्वामीस, मातापितरांस व वाडवडिलांस नमस्कार करवून त्यांस मंडपांत घेऊन आले. नंतर मंडपांत नवग्रहशांतीचें[१] वैदिक कर्म सुरूं झालें. ( माहिती साहित्यपत्रकांत पहा. )

**मंडपस्थापना.**

माघ महिना असल्यामुळें कडक थंडी पडली. पूर्वेस दिशा फांकल्या. चिमण्या, राघू, वगैरे पाखरें चिवचिव करूं लागलीं. विद्यार्थी पोथ्या सोडून वेद-

१ कार्यास आरंभ होण्याचे पूर्वी ग्रहांची शांति करावी, हा उत्तम मार्ग. कोठें कोठें प्रथम उदक सोडून, ती कार्य झाल्यावर करितात. त्याचप्रमाणें मंडपप्रतिष्ठा व व्रतबंध एकाच दिवशीं करण्यास कांहीं हरकत नाहीं. परंतु तसें केल्यानें फार श्रम होतात. करितां वेगवेगळ्या दिवशीं तीं कृत्यें करावीं.

घोष व शास्त्राभ्यास करीत बसले. स्त्रिया अंगें धुऊन आपापल्या उद्योगास लागल्या. नित्याप्रमाणें घरोघर सडासंमार्जन होऊन त्यावर मुलींनीं चित्रविचित्र रांगोळ्या घातल्या.

बालार्काचे आरक्त किरण मंडपांत पसरले. वाद्यांचे गोड व मंजुळ ध्वनि ऐकूं येऊं लागले. स्त्रिया अंगें धुऊन, तुळशीची पूजा करून एकमेकीस हळद-कुंकूं देऊं लागल्या. पुरुष मंडळी स्नानें करून माडीवर गंजिफाचे डाव झोडीत बसली. आचाऱ्यांनीं चुलींत पेटवणें घातलीं. उपाध्ये स्नान करून तेथें आले. नंतर मंडपप्रतिष्ठा होण्यास सुरुवात झाली. ( याची माहिती व साहित्य पत्रकांत पहा. )

वैदिक कर्म आटोपल्यावर सर्वांचें भोजन झालें. नंतर मुंजीचें पाचारण करण्यास निघण्याची तयारी चालली. ( याबद्दलची माहिती भाग ३ रा लग्न समारंभ. याचा पोट भाग ३ रा यांत पहावी ).

पाचारण करण्यास स्त्रिया व पुरुष मंडळी गेल्यावर बाबासाहेबांनीं सखारामास गंवड्याला बोलावून आणण्यास पाठविलें. गंवडी आल्यावर बहुलें[1] घालण्याचें काम सुरू झालें.

सायंकाळ होऊन चोहोंकडे दिवे लागले. वाड्यांत चौघडा झडूं लागला ताशे खणाणूं लागले व वाद्यांचे गोड शब्द निघूं लागले. दिवाणखान्यांत कोणी गंजिफाचे, व कोणी बुद्धिबळांचें डाव खेळत होते; कोणी सुपारी फोडीत होते, कोणी चांदीच्या ताटांत व तबकांत पानसुपारी भरीत होते. स्त्रिया कोणी भाज्या चिरीत होत्या, कोणी निरनिराळीं पक्वान्नें करण्यांत गुंतल्या होत्या, कोणी आपल्या लहान मुलांस जेवूं घालीत होत्या व कोणी इकडून तिकडे फिरत होत्या. मुलांचा एकच गोंगाट चालला होता. कांहीं रडत होतीं, कित्येक खेळत होतीं, कोणी एकमेकांस ठोकीत होतीं. याप्रमाणें तो सर्व वाडा मनुष्यांच्या गलबल्यानें गजबजून गेला होता.

असें होतां होतां प्रहर रात्र निघून गेली. सर्वांचे फराळ झाले. नंतर कांहीं वेळानें चहूंकडे सामसूम झालें.

**मौंजीबंधन.**

तों पूर्वेस उदेला अंशुमाळी । तेणें नाशिली तिमिरावळी ।
विहंगम कूजती वृक्षडहाळीं । धेनू वाहती वत्सांतें ॥ १ ॥

श्रीधर.

---

१ बहुलें मुंज्या मुलाच्या पांच हात ठाव, व चार हात रुंद असावें. आणि तें पूर्वाभिमुख असावें.

पूर्व दिशा प्रकाशित होऊन अंधःकाराचा लोप झाला. तट्टी, तापडी खांद्यावर पडद्या टाकून मार्ग क्रमूं लागले. फिरें झाडींतून पुढें सरसावलेल्या पायवाटा प्रकाशित झाल्या. देवालयांच्या गगनचुंबित सुवर्णमय शिखरांवर बालार्काचे आरक्त किरण पडून तीं चकाकूं लागलीं. इकडे मंडपांत वाद्यें वाजूं लागलीं. जोश्यांनीं अंगावरील लव दिसूं लागतांच घटका घातली. स्वयंपाक तयार झाला. मंडपांत बैठकी पडल्या. स्त्रीपुरुषांचीं स्नानें झालीं.

नंतर पांच सुवासिनींनीं देवकासमोर चौपाट काढून, पाट मांडून, त्यावर आत्मारामास पागोटें घालून व मुंढावळ बांधून बसविलें; आणि प्रथम उदकामुहूर्त व मागाहून तेलवण असे दोन मुहूर्त केले.[1]

हे दोन प्रकार आटोपल्यावर आत्मारामास मंगलस्नान घालूं लागले. इकडे मातृभोजनाची तयारी चालली.

माजघरांत कणारांगोळी काढून मोठमोठें पाट मांडिले. केळीचीं पानें मांडून उदबत्त्यांचीं झाडें ठेविलीं. एके ठिकाणीं दोन चौरंग मांडून, मेहरपदार कमानी काढून, रांगोळी घातली. अडणीवर चांदीचें ताट मांडून जवळ चांदीच्या समया लाविल्या. नंतर स्त्रिया हातांत निरनिराळे पदार्थ आणून ते सर्व पानांवर वाढूं लागल्या. नंतर सर्व पदार्थ वाढून झाल्यावर आत्मारामास त्याच्या आईच्या पुढ्यांत बसविलें. पंगतीस कांहीं स्त्रिया व बटु[3] बसले. आई मुलास निरनिराळे पदार्थ भरवीत जेवूं लागली.[2]

सर्वांचें भोजन आटोपल्यावर मुलाचे मुख प्रक्षालून त्रयोदशगुणी[4] विडा दिला.

मातृभोजन आटोपल्यावर वपनविधि झाला. नंतर आत्मारामास स्नान घालून, रुईच्या फुलांची मुंढावळ बांधून, लाल बोटें ओढून, अंगावर शालजोडी दिली. व हातांत नारळ दिला. या प्रमाणें त्याला तयार केल्यावर जोशीबुवांनीं

---

१ हे दोन मुहूर्त कसे करितात याची माहिती भाग ३ रा याचा पोट भाग ३ रा यांत दिली आहे.

२ कायस्थ प्रभु ज्ञातींत वडाच्या पानांची मोठी पत्रावळ मांडून तीवर सर्व स्त्रिया एकत्र बसतात. व मुलाची आई आणि दुसऱ्या स्त्रिया मुलास भरवितात. ही पत्रावळ ज्ञानरी केळीची असते.

३ ब्रह्मचारी ( अहवर्गे )

४ त्रयोदश गुणी विडा म्हणजे, जो तेरा जिनसांचा असतो. ते जिन्नस:-पानें, सुपारी, चुना, कात, लवंगा, वेलदोडे, जायफळ, जायपत्री, केशर, बदाम, कंकोळ, कापूर खोबरें.

शिवरामभाऊंकडून पत्रिकापूजन करविलें. नंतर अक्षता नेमिले. शिवरामभाऊंस बहुल्यावर पाट मांडून त्यावर बसविलें. मध्यें अंतरपाट धरून आत्मारामास पश्चिमाभिमुख बहुल्यावर उभें केलें. स्त्रिया करा दिवा घेऊन मुलाच्या मागें उभ्या राहिल्या. स्त्रीपुरुषांचा जोडा बहुल्यामागें उभा केला. भिक्षुक व ब्राह्मण मंगलाष्टकें ह्मणूं लागले. मुलाच्या मस्तकावर चोहोंकडून अक्षता पडूं लागल्या.

मंडळींनीं मंडप भरून गेला होता. बाबासाहेब सर्वांस वैभवाप्रमाणें बसवीत होते. वाद्यें वाजविणारे आपापलीं वाद्यें सज्ज करून तयार होते. दिवाणखान्यांत स्त्रिया जमल्या होत्या. चोहोंकडून अक्षता पडत होत्या. मंगलाष्टकांचे लांब व मंजुळ स्वर कानांस गोड लागत होते.

मंगलाष्टकें पुरीं होऊन " शुभमंगल सावधान " असे शब्द व टाळ्या कानीं पडतांच अंतरपाट सोडिला. मुलानें शिवरामभाऊंच्या गळ्यांत माळ घातली. त्याला बापाच्या मांडीवर बसविलें, वाद्यें वाजूं लागलीं, बंदुकीचे बार निघाले, व कलावंतीण नाचूं लागली.

मंडळी सर्व जमली. आतां कोणी यावयाचें नाहीं, असें पाहून पानसुपारी वाटूं लागले. प्रथम वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण, भिक्षुक वगैरे मंडळीस दक्षणा व पानसुपारी देऊन, नंतर सरकारी कामदार, शेट सावकार वगैरे सभ्य गृहस्थांस पानसुपारी देत चालले. कोणी लंवग, वेलची व कोणी अत्तर देऊं लागले. कोणी गळ्यांत फुलांचे हार घालून तुरे वाटूं लागले. कोणी नारळ देत चालले. कित्येक हातांत गुलाबदाण्या घेऊन गुलाबपाणी उडवीत चालले.

इकडे दिवाणखाण्यांत सर्व स्त्रिया जमल्यावर त्यांस हळदकुंकूं देऊन पानसुपारी, अत्तरगुलाब व हारतुरे वाटून त्यांच्या नारळांनीं ओट्या भरिल्या.

मुंज लागल्यावर मुलास बापाच्या मांडीवर बसविलें, असें मागें सांगितलें आहे. त्यानंतर उपाध्यांनीं वैदिक कर्म चालूं केलें. ( याची माहिती व साहित्य पत्रकांत पहा. )

वैदिक कर्म आटोपल्यावर भिक्षावळीचा प्रकार चालला तोः—

मुलाची आई व दुसऱ्या वऱ्हाडणी भिक्षावळ घालण्याकरितां मंडपांत आल्या. आत्मारामास बहुल्यावर बसविलें. त्याजवळ उपाध्यांनीं खादीची झोळी

१ कायस्थ प्रभु मंडळींत मुलाचे मस्तकावर शस्त्र धरितात.

२ पानसुपारी वाटण्याचें पूर्वी उपाध्याकडून दक्षिणेचें व पानसुपारीचें वचक सुटल्यावर व कामास आरंभ करावा.

दिली. प्रथम त्याच्या आईनें हातांत स्वयंपाकाची पितळेची पळी घेऊन तींत पेढे व बत्तासे टेऊन, मुलगा 'भवति भिक्षां देहि' असे शब्द म्हणतांच झोळींत ती पळी ओतिली. त्याचप्रमाणें पांच प्रकारचे लाडू घातले. नंतर हातांत सुवर्णाची आंगठी घातली. याप्रमाणें इतर स्त्रियांनीं भिक्षावळ घातली.

हें कृत्य आटोपल्यावर बोलाविलेल्या मंडळीस आमंत्रण गेलें. मंडळी जमल्यावर सर्वांचें भोजन झालें.

## भिक्षावळ मिरविणें

सायंकाळचे सुमारास गड्यांस गणपतीच्या देवालयांत बैठक घालण्यास पाठविलें. देवालयांत हांड्या व झुंबरें लावून चकचकाट केला. गावांत कांहीं स्त्रियांस हळदकुंकवाचें आमंत्रण केलें. त्याप्रमाणें तयारी चालली.

इकडे उपाध्यानीं बहुल्यावर अग्नि तयार करून होम[२] केला. व मुलास संध्या सांगितली.

नंतर रात्र पडल्यावर मशाली पेटविल्या. वाद्यें वाजूं लागलीं. स्त्रिया अलंकार घालून तयार झाल्या. एका कोऱ्या रोवळींत लाडू[३] घेऊन त्यांवर आत्मारामाचें पागोटें मुंडावळ बांधून ठेविलें. बरोबर हळदकुंकू, अत्तरगुलाब, हारतुरे, पान सुपारी व ओटयांचें सामान घेतलें. ती रोंवळी एका स्त्रिनें हातीं घेतली. बाकीचें सामान गड्याजवळ दिलें. नंतर पुरुष व स्त्रिया मिळून मंडळी देवालयांत जावयास निघाली ती ठिकाठिकाणीं दारूकाम लावीत वाजतगाजत मोठ्या थाटानें देवालयांत पोंचली. तेथें गेल्यावर गणपतीची पूजा केली. नंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकू, पानसुपारी, अत्तर-गुलाब व हारतुरे देऊन नारळांनीं ओटया भरिल्या. पुरुष मंडळीस पानसुपारी अत्तर गुलाब, हारतुरे दिले. हें आटोपल्यावर सर्व मंडळी वाजतगाजत घरीं परत आली.

दुसऱ्या दिवशीं ब्राह्मणभोजन[४] व ज्ञातीभोजन या कृत्यासंबंधीं तयारी चालली. व तिसऱ्या दिवशीं भोजनसमारंभ झाला.—( या कृत्याची सर्व प्रकारची माहिती भाग २ रा यांतील पोट भाग ४ था यांत दिली आहे, त्याप्रमाणें करावें.)

---

१ या पळीस काळी पोत सुवर्णमण्यासहित बांधितात.

२ सोडमुंज होईपर्यंत हा होम सकाळसंध्याकाळ करावा लागतो. यास शूद्रांचा स्पर्श होऊं देऊं नये.

३. मुंजीचें वैदिक कर्म आटोपल्यावर जी भिक्षावळ घालतात त्यावेळचे लाडू व इतर पदार्थ यावेळीं घ्यावे.

४. या कार्यांत ब्राह्मणभोजन निदान १०० ब्राह्मणांचें झालें पाहिजे. तथापि ज्यानें त्यानें तें आपल्या सावकाशानुसार करावें.

## सोडमुंज.

चौथ्या दिवशीं प्रातःकाळीं उपाध्ये स्नान करून अंगावर शालजोडी पांघरून मंडपांत आले. नंतर सोडमुंज करण्याचें वैदिक कर्म सुरू झालें. ( याची माहिती पत्रकांत पहा. )

वैदिक कर्म आटोपल्यावर मुलगा काशीस जावयास निघाला तो प्रकारः—

मुलास जरिकांठी धोतर नेसवून, डोक्यास पागोटें घालून, झगा व पायजमा घातला. अंगावर शालजोडी दिली. उपाध्यानीं शिधासामुग्री एका पंच्यांत बांधून तो खांद्यावर दिला. हातांत पळसदंड देऊन पायांत चर्मजोडा घातला. याप्रमाणें मुलगा तयार झाला. पुरुष मंडळी पोषाख करून तयार झाली. नंतर वाद्यें वाजविणारे पुढें चालूं लागले. मागाहून सर्व मंडळी मुलासह चालूं लागली. घरापासून कांहीं अंतरावर गेल्यावर मुलाचा मामा आडवा येऊन मुलास म्हणाला, 'आह्मी आपली मुलगी तुह्मांस देऊं तुह्मी काशीयात्रेस जाऊं नका. गृहस्थाश्रम ( संसारप्रपंच ) करावा'. असें म्हणून मुलास मागें फिरविलें. नंतर देवालयांत जाऊन देवाचें दर्शन घेऊन वाजत गाजत मंडळी घरीं आली.

सोडमुंजीचें सर्व कृत्य आटोपल्यावर सर्वांचें भोजन झालें.

सोडमुंज आटोपल्यावर व्रतबंध पुरा झाला असें समजलें पाहिजे. हा आजचा दिवस गेल्यावर दुसऱ्या दिवशीं गांवांतील आप्तसगे, सोयरेधायरे व मित्रमंडळी या सर्वांस भोजनास बोलावून, पंचपक्वान्नांचें भोजन आटोपल्यावर त्यांस व आपल्याकडे जमलेल्या वऱ्हाड्यांस आहेर देण्याचा समारंभ झाला. ( याची माहिती भाग ३ रा याचा पोटभाग ५ वा याच्या शेवटीं दिली आहे. त्याप्रमाणें हा प्रकार करावा. )

याप्रमाणें बाबासाहेबांनीं व्रतबंधाचा समारंभ केला.

आतां या पुढील सर्वांत मोठा व मनोरंजक कथाभाग पुढील भागांत देऊं.

---

१ साहित्याची यादी-अलाहिदा आहे. २ हा सर्व पोषाख जावरा असतो.

# भाग ३ रा.

## विवाहसमारंभ.

### पोटभाग १.

### ( वधुवरांची योजना. )

कार्तिकाचा महिना निघाला. शरदृतुचा कडक अंमल बसला. चोहों-कडे आनंदमय दिसूं लागलें. रात्रौ दिपोत्सव चालू होते, कारण दिपवाळी अद्याप पुरी झाली नव्हती. ठिकठिकाणीं गगनचुंबित आकाशकंदे पाहून असा भास होत असे कीं, सृष्टीवरील शोभा पहावयास आकाशांतील तारे खालीं उतरत आहेत किंवा गंधर्वांची विमानेंच फिरावयास निघालीं आहेत कीं काय? शहरांतून जिकडे तिकडे दीप लागले आहेत. स्त्रीपुरुषें कोणी आनंदामध्यें बसलीं आहेत, व कोणी गृहसंबंधीं व्यवसायांत गुंतलीं आहेत. लहान मुलें निरनिरा-ळ्या प्रकारचें दारूकाम लावीत आहेत. कित्येक त्याची अपूर्व शोभा पाहून आनंदाच्या भरांत नाचत आहेत.

इकडे बाबासाहेबांच्या चौसोपी वाड्यांत चोहोंकडे दीप लागले आहेत. माडीवरील दिवाणखान्यांत आरास केली आहे. बैठक मांडून त्यावर कोठें खुर्च्या, कोठें टेबलें व कोठें कोचें नीट व्यवस्थेनें लाविलीं आहेत. मुलें दारूकाम लावीत समोरील चौकांत इकडून तिकडे व तिकडून इकडे नाचत आहेत. बाईसाहेब व काशीबाई गच्चींत उभ्या राहून खालच्या रस्त्यावरील लोकांच्या गर्दीची व शह-राची मजा पहात आहेत. इतक्यांत घोड्याच्या दोन गाड्या वाड्यांत येऊन उभ्या राहिल्या.

वाचकहो, यांत कोण होते ह्मणाल, तर बाबासाहेब व त्यांचे पुत्र, यांच्या स्वान्या बडे लोकांस, व मित्र वगैरे मंडळीस भेटण्यास गेल्या होत्या त्या परत आल्या.

सर्वजण गाडींतून उतरून माडीवरील दिवाणखान्यांत गेले. तेथें पोषाख उतरून ठेवीत आहेत, इतक्यांत बाईसाहेब व काशीबाई आल्या. बाबासाहेब कोचावर पडले होते व शिवरामभाऊ आणि वामनराव खिडकींत उभे होते. बा-ईसाहेब खुर्चीवर बसल्या. अशीं सर्व बसलेलीं पाहून काशीबाई घरांत गेली व तिनें लवकरच एका हातांत कांहीं फळफळावळ व फराळाचे पदार्थ आणिले, व ते सर्वांस दिले.

वाचकहो, पहा, कुटुंबांतील सर्व माणसें कशीं एकमतानें चालत होतीं! त्या वृद्ध मातापितरांस आपलीं मुलें एकच विचारानें चालत आहेत, असें पाहून किती आनंद वाटला असेल! त्याचप्रमाणें मातापितरांसह व भावंडांसह अनेक सुखांचा उपभोग घेणें करून मुलांस किती आनंददायक व भूषणास्पद आहे! असो, त्या सर्वांचा फराळ झाल्यावर त्यांजमध्यें झालेला संवाद येणेंप्रमाणें:—

बाबा०—चंद्राबाईस हें नववें वर्ष लागलें, बरीच मोठी दिसते; सालमजकुरीं हिचें लग्न करावें असा हेतु आहे.

शिवराम०—हो, पुढल्या वर्षी तिला दहावें वर्ष लागेल, त्यापेक्षां यंदाच उरकून घ्यावें हें बरें.

बाईसा०—माझ्या मनांत गेलेच वर्षी करावं असं होतं, परंतु तिला कायसं तें वरीस लाभत नव्हतं म्हणून यंदावर आलं. आतां यंदा उरकून घेतलंच पाहिजे.

बाबा०—तर मग, आतांपासून मुलाची योजना करावयास लागलें पाहिजे.

शिवराम०—आतांपासून शोध करूं लागलों तर माघमासापर्यंत एकादे ठिकाणीं जमून येऊन लग्नाचें जुळेल. नाहीं तर वैशाखमासीं लग्न करूं गेलों, तर पाण्याचा दुष्काळ, उन्हाचा कडक तडाका, भाजीपाला मिळत नाहीं, अशा अनेक अडचणी येतात, व त्यामुळें कार्यास फार घाई होते, आणि त्रास पडतो. तो महिना अगदीं उपयोगीं नाहीं.

बाबा०—छे, छे, ह्या काशीचें लग्न त्याच महिन्यांत केलेंना! किती त्रास पडला! उन्हाळ्याच्या कडाक्यानें कशी स्थिति झाली? हें सर्व तुम्हांस ठाऊक आहेच. तो महिना आपल्याला अगदीं पसंत नाहीं. माघ महिन्यापर्यंत उरकून घेतलेंच पाहिजे.

बाई०—आत्मारामाचंही जमून आल्यास एकांत एक उरकून घ्यावं असं मला वाटतं.

बाबा०—कुटुंबवत्सलांनीं कार्याची योजना अगोदरपासून करून ठेवावी. लग्नाचें कार्य म्हणजे फार महत्वाचें व त्यांत अनेक अडचणी येणारें, असें असतें. आत्मारामास हें पंधरावें वर्ष सुरू आहे. जमून आलें तर एकांत एक उरकून घेऊं. सालमजकुरीं एक, व पुढल्या वर्षी एक, अशीं निरनिराळीं कार्यें करणें ठीक नाहीं. श्रीमंती किती दिवस टिकणारी आहे! पृथक् पृथक् दोन लग्नें करणें म्हणजे विनाकारण हजार दोन हजार रुपयांचें नुकसान करून घेण्या-

तारिखेस आहे. चांगली मनाजोगती मुलगी नवून आल्यास येथे करण्यात कांहीं हरकत नाहीं.

बाई०—आतां कोठें गोष्ट काढितां येत नाहीं. अजून तुळशीचीं लग्नें व्हाव-चीं आहेत. तीं झाल्यावर लोक जागे होतील.

शिवराम०—हो, तें तर खरें. पण तुळशीचीं लग्नें झाल्यावर मुलाच्या शोधास लागलें पाहिजे.

तुळशीचीं लग्नें झाल्यानंतर, एके दिवशीं बाबासाहेबांच्या घरीं बापूजी देशमुख व नारायणराव सोलापुरकर असे दोघे गृहस्थ कांहीं कामाकरितां गेले होते, त्या वेळीं वधूवरांच्या यात्रेनेंसंबंधी झालेलें संभाषणः—

बाबा०—(बापूजीस) अहो, सालमजकुरीं आपल्याकडे एखादें कार्य प्रयोजन असेल? नाहीं कां?

बापुजी०—बाबासाहेब, तें विचारूं नका. माझ्या पाठीस जे कांहीं ग्रह लागले आहेत, ते असे कीं, आज चार वर्षें एक सारखा प्रयोजनांचा तडाका चालला आहे. तीं तरी मुलांचीं!—सर्व मुलींचीं—करावें तरी काय! दरसाल एक कार्य प्रयोजन आहेच! मुलास १५०० रुपये हुंडा द्यावा, बरें, आतां हुंड्याप्रमाणें प्रयोजन थाटमाटानें केलेंच पाहिजे. व त्यामुळें जो खर्च होतो, त्याचा विचारही करितां येत नाहीं.

बाबा०—अहो, तुमच्या आमच्या सारख्या लोकांची कांहीं बरी स्थिती आहे. दरसाल हजार दोन हजार रुपये खर्च जाऊन शिल्लक रहात आहेत. व चार वर्षांनीं एखादें कार्य प्रयोजन करावें लागतें, एकूण सर्व बरोबरी. परंतु जे लोक, कीं ज्यांस सालीना आपल्या कुटुंबाचा उदरनिर्वाह करून निदान शेंदोनशें रुपये बाकी राहण्याची पंचाईत, अशा लोकांस प्रयोजन करण्याचें आलें म्हणजे किती अवघड! त्यांत मुलीचें लग्न म्हणजे मोठें कड ओझेंच उचलावयाचें आहे असें त्यांस वाटतें. मुलीचें लग्न करून; तिस सौभाग्य देऊन, तिला पतीच्या स्वाधीन करून, त्या स्त्रीपुरुषांस व्यवहारसुखाचा उपभोग घेण्यास लावावें असें मुलीच्या बापास वाटत नाहीं काय? वाटतें, परंतु करतो काय! मुलगा पहावयास निघाला, कीं, प्रथम मुलाचा बाप विचारितो, हुंडा काय द्याल? अमुक रुपये द्याल तर बोलावयास या. ही त्याची हुंड्याची रक्कम पाहून तो निमूटपणें चालता होतो. अशी तऱ्हा जिकडे जावें तिकडे आहे. परंतु मुलाचे

१ तुळशीचीं लग्नें झाल्याशिवाय वराच्या शोधनेस लागत नाहींत, असा प्रघात आहे.

बाप, मग ते तीस रुपयांचे नोकर किंवा आठ वर्षांचे कोण मरी, असले तरी आम्हांस ५०० रुपये हुंडा पाहिजेच, असें मुलीच्या बापास सांगतात. अशा धनाढ्यास एकादा भाळलेला मुलीचा बाप मुलाच्या गुणाकडे पाहून कित्येकदा हुंडा देण्यास तयार होतो. मग काय विचारतां! माझ्या मुलास ५०० रुपये हुंडा आला, असा यत्किंचित मानानें चढून त्या हुंड्यामध्यें कोंदोनशें रुपये पदरचे घालून लग्न करितात. बहुतेक खर्च इतर गोष्टीकडे करून, त्या मुलीच्या अंगावर हुंड्या इतक्याही किंमतीचे दागिने घालित नाहींत! मुलीचा बाप जे रुपये हुंड्याच्या रूपानें मुलास देतो, त्यांचा खरा उपयोग फक्त मुलीकडेसच व्हावा व ते रुपये मुलीसच उपयोगीं पडावे, हा त्याचा हेतू असावा. असें असताही हे श्रीमंत त्याही हा हुंडा मुलास आला, व तो मुलाचाच आहे असें मानून त्याचा खरा उपयोग करीत नाहींत; याप्रमाणें अवाच्या सवा हुंडा घेऊन श्रीमंती दाखविण्यापेक्षां ते आपल्या सामर्थ्याप्रमाणें हुंडा घेऊन त्याचा योग्य उपयोग करतील, तर फार चांगलें होईल.

नारायण.—आपण बोलतां तें सर्व खरें आहे. परंतु हा असा हुंडा घेण्याचा प्रचार प्रथम श्रीमंत लोकांनीं पाडला व त्यांचें पाहून इतर लोकांत पडला असावा असें वाटतें. आतां श्रीमंत लोकांत हा प्रचार पडला आहे व ते तसा हुंडाही देतात, आणि त्यांस तसें करण्यास सामर्थ्यही असतें. परंतु तो हुंड्याचा पैसा मुलीच्या उपयोगास न लावितां घरखर्चाकडे लावितात हें करणें ठीक नाहीं. बरें त्यांचें म्हणजे केवळ त्याच रुपयांवर अवलंबून असतें असेंही नाहीं. असें असताही हुंड्याचा योग्य उपयोग व्हावा अशी तजवीज होत नाहीं, हें त्यांच्या श्रीमंतपणास भूषण आणणारें आहे, असें नाहीं.

बाबा०—असो; आपण तरी तसें करतां कामा नये. सामर्थ्याप्रमाणें हुंडा द्यावा, व घ्यावा, आणि त्याचा चांगला उपयोग करावा, हें आपलें कर्तव्य आहे. असो. तूर्त चंद्राबाईचें लग्न करावें असा आमच्याकडील सर्वांचा विचार ठरला आहे, तर एकादा चांगला मुलगा पाहून द्या.

बापूजी—आपल्यास कमी हुंड्याचा मुलगा पाहिजे असें नाहीं. आपण काय! जहागीरदार! आपल्याला काय उणीव आहे! आपल्या सारख्याचा शरीरसंबंध होणें म्हणजे तसेंच मोठें पाहिजे.

बाबा०—( जरा हांसून ) बापूजी, शरीरसंबंध आपल्यासारख्या मोठ्या गृहस्थाशींच करावा, पण तो मुलगा जरी 'ढ' असला तरी आपली मुलगी त्याच्या

पदरांत घालून हजारों रुपये खर्च करून, मोठ्या डौलानें लग्न करावें. नंतर त्या स्त्रीपुरुषांची दशा कांहीं का होईना! जे लोक केवळ धनावर नजर देऊनच कार्ये करितात, त्यांची ही चूक आहे. आह्माला तसें करावयाचें नाहीं. चांगला मुलगा असेल तोंच मुलगी द्यावी. मग तो गरीब का असेना! आपण त्यास श्रीमंत करूं.

नारायण०—अहो, पण आजच श्रीमंत लोकांचे मुलगे सगळेच 'ढ' झाले कि काय? नाहीं, परंतु मध्यम प्रतीच्या लोकांत जितके 'ढ' निघतील त्याहून श्रीमंत लोकांत बरेच जास्त निघतील; यांत कांहींएक संशय नाहीं. असो; आपणाला मुलगा हवा तसा उत्तम असून आपली बरोबरी करणारा असला तर आपण कबूल कराल काय?

बाबा०—अहो मग कबूल कराल काय, असा प्रश्न विचारूंच नका. नुसतें कबूल तर काय? पण जो हुंडा मागतील तो देऊन लगेच जमवूनही टाकूं.

बापूजी०—असें जर आहे, तर कोणता मुलगा आपण शोधून काढिला तें सांगा पाहूं!

नाराय०—सीतारामपंत वकील यांचा धाकटा मुलगा, गोविंदा हो! मुलगा काय आहे पण चिमखडा अगदीं!

बाबा०—आहे खरा मुलगा अगदीं जसा पाहिजे तसा आहे. शिवाय घराणेंही कुलीन आहे. परंतु ते मजसारख्याशीं शरीरसंबंध कसे करतील? ते आज वकील आहेत. व त्यांचे वडील बंधू मामलेदार आहेत. त्यांस पैशाचा काय तोटा? धार लागली आहे! खेरीज १० गांवांचें उत्पन्न आहे व वकीलीचा जो भरभराट आहे, त्यास तर पारच नाहीं. आह्मी काय, नांवाचे जहागीरदार!

नाराय०—बाबासाहेब, सरकारी नोकरी ह्मणजे आळवावरचें पाणी. जोंपर्यंत चालेल तोंपर्यंत लाट असतो. आपण कसें ह्मणाल, तर झांकलेलें माणीक! आपल्या बरोबर वकील शरीरसंबंध करणार नाहींत, हें असंभवनीय आहे.

बापूजी०—अहो नारायणराव, सांप्रत सरकारी नोकरास जो मान आहे तो जहागीरदारांस आहे काय? सरकारी नोकर जरासे अधिकारी व शें दोनशें रुपयांचे पगारदार झाले ह्मणजे त्यांजसारखा कोणीच नाहीं, असें लोक समजतात. परंतु हें तुह्मी पक्कें ध्यानांत ठेवा कीं, ज्यांस नोकरी नाहीं परंतु जे जहागिरदार, किंवा ज्यांचेकडे दरसाल १००–२०० शें खंडी धान्य पिकत आहे, त्यांची बरोबरी सरकारी नोकराच्यानें करवणार नाहीं, मग तो कितीही मोठा पगारदार असेना!

नाराय०—बापूजी, सीतारामपंत फार साधे मनुष्य आहेत. बाबासाहेबांशीं शरीरसंबंध करण्यास ते फार खुषी असले पाहिजेत व असतीलच.

बाबा०—तर मग, गांवोगांवीं मुलगा शोधित फिरण्याचें कांहीं कारण नाहीं. गांवांतले गांवांत जमेल तर फार उत्तम!

बापू०—तुळशीचीं लग्नें झालीं, आतां गोष्ट काढण्यास कांहीं हरकत नाहीं. प्रथम मुलाची पत्रिका आणिली पाहिजे.

नारायण०—तें काम माझें. त्या पत्रिकेची एक नक्कल सहज आपली अशीच मजकडे राहिली आहे. तीच मी उद्यां सकाळीं आपल्याकडे घेऊन येतों ह्मणजे झालें. अहो, आह्मांला काय! आपल्या सारख्या बड्या लोकांकडे प्रयोजनें होऊन पंचपक्वान्नाचा लाड मिळाला म्हणजे झालें.

बाबा०—वा! तुह्मी पण पक्वान्नावर हात मारणारे दिसतां. असो; प्रथम जमून तर द्या, मग सर्व गोष्टी.

इतकें भाषण झाल्यानंतर मंडळी घरोघर निघून गेलीं. नारायणरावांनीं कबूल केल्याप्रमाणें मुलाची पत्रिका आणून दुसरे दिवशीं बाबासाहेबांचे घरीं आले. बाबासाहेबांची स्वारी नुकतीच मुखमार्जन करून बसली होती. नारायणराव आपल्या वचनाप्रमाणें आले असें पाहून बाबासाहेब विनोदानें ह्मणतात.

बाबा०—कां नारायणराव, पत्रिका आणिली, किंवा रिकामेच आलां?

नाराय०—( पत्रिका पुढें करून ) ही पहा, आपल्या मुलीची कोठें आहे?

बाबा०—मुलीची पत्रिका आहे, परंतु रामशास्त्रीबुवांस बोलाविलें पाहिजे.

( नारायणराव सखारामास हांक मारून शास्त्रीबुवांस बोलावून आणण्यास सांगतात.)

( शास्त्री बुवा आल्यावर सर्व नमस्कार करितात. )

बाबा०—कां, शास्त्री महाराज, आजपर्यंत किती लग्नें जमविलीं?

शास्त्री०—अहो, अद्याप कार्तिक महिना संपला नाहीं. मार्गशीर्ष महिन्यांत लग्नें करण्यास कोणीही तयार नाहीं, मग उगीच ग्राहे कोण करितो! सर्व स्वस्थ आहेत. चार पांच जमलीं आहेत, परंतु तीं आपलीं अशींच आहेत.

नाराय०—तें सर्व असो. ह्या दोन पत्रिका पहा, एकमेकांशीं जमतात, किंवा कांहीं भानगड येते?

शास्त्री०—(दोन्ही पत्रिका फारवेळ पाहून.) पत्रिका फार चांगल्या आहेत. जोडा फार उत्तम जमेल. उभयतांना ग्रह काय नामी पडले आहेत हो!

बाबा०—माझ्या मनांत मोठी धास्ती होती, कीं कांहीं तरी अडचण येईल. असो; ईश्वरीसूत्राप्रमाणें जो जोडा असेल तो जमेल. आतां शास्त्री महाराज, जमऊन नक्की करणें आपल्याकडे आहे.

शास्त्री०—हें जमविण्यास कांहीं वेळ लागणार नाहीं. कारण, मुलगी आपल्याकडील व मुलगा वकीलाकडील. पहावयासच नको! दोन्ही स्थळें जब्बर आहेत.

बापु०—शास्त्री महाराज, आपल्याला संपत्तीवर लक्ष द्यावयाचें नाहीं. घराणें कुलीन, व मुलगा चांगला हुशार, या मुख्य दोन गोष्टी असल्या म्हणजे झालें.

शास्त्री०—दोन गोष्टींनीं काय होणार आहे? मुलीस देण्यास स्थळ कसें असावें, व वर कसा असावा, याबद्दल शुक्रनीतींत फार चांगलें सांगितलें आहे:—

दृष्ट्वाधनंकुलंशीलं रूपंविद्यांबलं वयः ॥
कन्यांदद्यादुत्तमंचेन्मैत्रींकुर्यादथात्मनः ॥ १ ॥

अर्थ.—धन, कुल, शील, रूप, विद्या, बल व वय या गुणांची परीक्षा करण्याकरितां प्रथम त्या ठिकाणीं मैत्री करावी. आणि हे सप्त गुण उत्तम दिसून आल्यावर त्या ठिकाणीं मुलगी देऊन संबंध जोडावा.

भार्यार्थिनंवयोविद्या रूपिणंनिर्धनंत्वपि ॥
नकेवलेनरूपेण वयसा न धनेनच ॥ २ ॥

अर्थ.—भार्येच्छू वयानें योग्य आणि विद्यावन्त व रूपवन्त असून यद्यपि निर्धन असला तरी त्याला कन्या द्यावी. केवळ रूपवान्, धनवान् व वयानें योग्य, असा पाहूं नये. तर;—

आदौकुलंपरीक्ष्येत ततोविद्यांततोवयः ॥
शीलंधनंततोरूपं देशंपश्चाद्विवाहयेत् ॥ ३ ॥

अर्थ.—प्रथम कुलाची परीक्षा करावी. नंतर विद्या, वय, आचरण, धन, व रूप या गोष्टींकडे लक्ष देऊन कोणत्या देशांत वास्तव्य आहे याची चौकशी करून नंतर त्या ठिकाणीं मुलगी द्यावी.

कुलंचशीलंचसनाथताच विद्याच वित्तंचवपुर्वयश्च ॥
एतान्गुणान् सप्त निरीक्ष्य देया ततःपरंभाग्यवशा हि कन्या ॥ १ ॥

अर्थ.—कुल, शील, सनाथता (धुरेकर अथवा मुलाचा बाप.) विद्या

धन, रूप व वय, हे सात गुण पाहून मुलगी द्यावी असें पाहून द्यावें. असून जर कदाचित् कांहीं विपरीत झालें तर त्या मुलीचें भाग्य!

शास्त्री.–याप्रमाणें वधु कशी असावी या बद्दलही असें सांगितलें आहे:–

भार्यार्थंवरयेत्कन्यामसमानर्षिगोत्रजां ॥
भ्रातृमतींसुकुलांच योनिदोषविवर्जितां ॥ १ ॥
क्षणशःकणशश्चैव विद्यामर्थंचसाधयेत् ॥

अर्थः–जी भिन्न गोत्रांत उत्पन्न झालेली, जिला बंधु आहेत, निरोगी व सदोदीत पतिसेवेंत तत्पर राहील अशी आणि विद्या[1] व अर्थ यांचें रक्षण करण्यांत अत्यंत दक्ष, अशी कन्या गृहस्थाश्रम साधण्याकरितां वरावी.

कशी पहा आमच्या पूर्वजांनीं आपली नामी सोय करून ठेविली आहे.!

या श्लोकांत किती अर्थगांभिर्य आहे ! कन्येचे सर्वगुण शेवटील चरणांत गर्भित दिसून येतात.

बाबा.–अहो, पण ह्या सर्व गोष्टींकडे लक्ष देऊन चालणारे फारच क्वचित् जो तो आपापल्या तत्वाकडे पहात असतो. शुक्र नीतींत याबद्दल एक असा श्लोक आहे.–

कन्या वरयते रूपं माता वित्तं पिता श्रुतं ॥
बांधवाःकुलामिच्छंति मिष्टान्नमितरे जना ॥ १ ॥

अर्थ.–मुलीची इच्छा पति रूपवान असावा अशी असते. मुलीच्या आईची इच्छा मुलीच्या अंगांवर पुष्कळ अलंकार पडावेत, आणि संपत्ति असावी या गोष्टींकडे असते. बापाची इच्छा वर विद्वान व लौकिकवान् असावा अशी असते. इतर कुटुंबी कुल चांगलें असावें असें इच्छितात. आणि इतर जन दररोज पंचपक्वान्नें मिळतील असा वर पक्ष असावा असें इच्छितात.

बापू०–ज्याचें त्याचें स्वार्थाकडे लक्ष! असो. शास्त्री महाराज, आपण सांगितल्याप्रमाणें वर व कन्या यथायोग्य आहेत. आतां हें एवढें जमवून द्या.

शास्त्री.–यास कांहीं उशीर लागणार नाहीं. बहुतेक अशीं असावीं तशीं आहेत. आणखी तें काय पाहिजे ?

---

१. स्त्रियांची मुख्य विद्या म्हणजे संसारसंबंधी सर्व गोष्टींशीं उत्तम प्रकारें व्यवस्था ठेवणें ही होय.

२. अर्थ, काम, मोक्ष, पुरुषार्थ शरीराचें, संसाराचें व अब्रूचें रक्षण करणें हें स्त्रियांचें गुणांवर अवलंबून असतें, हें थोडक्या विचारांतीं कळून येईल. करितां ही कुलीन असली पाहिजे. म्हणजे तिच्या अंगीं हे गुण आपोआप असावयाचेच.

बापू०—अहो, पण वकील साहेबांनीं रुकार दिला पाहिजे ना ?

शास्त्री०—तें काम माझें. अशा आपल्या सारख्या गृहस्थांशीं शरीरसंबंध करण्यास वकील मागें पहातील असें मला वाटत नाहीं. त्यांत मुलगी चांगली व, पत्रिकाही उत्तम जमतात. मग यांत कांहींच अडचण येणार नाहीं.

नारा०—अशी जर आपली खातरीच आहे, तर हा जमवून अनू काय !

शास्त्री०—बरें आहे, वकीलांकडे जाऊन त्यांजजवळ गोष्ट काढिली पाहिजे.

बाबा.—कार्तिक महिना संपत आला. मार्गशीर्ष महिन्यास अजून चार दिवस अवकाश आहे. तो महिना निघाला ह्मणजे वकीलांकडे जाऊन गोष्ट काढूं.

( इतकें संभाषण झाल्यावर नारायणराव व शास्त्री बुवा उठून जातात. )

मार्गशीर्ष महिना निघाल्यावर एके दिवशीं सितारामपंत वकील लोडाशीं टेंकून बसले आहेत, जवळ लिहिण्याचें सामान व दफ्तरें मोकळीं पडलीं आहेत. इतक्यांत बाबासाहेब, बापूजी देशमुख व नारायणराव वगैरे मंडळी तेथें आली. सितारामपंतांनीं उभयतांच्या थोरपणास योग्य असें त्यांचें आगत स्वागत केलें.

वकील.०—आज आपलें येणें इकडे कुणीकडे झालें ?

बापूजी.०कांहीं नाहीं सहज आपलें बरेंच दिवस दर्शन झालें नाहीं, ह्मणून वाटलें भेटावें येऊन ! आपल्याला, आपण पडलां सरकारी कामदार, टाईमशीर वागणार ! आपली भेट होते कशी ?

वकील.—करा बुवा थट्टा! सरकारी कामदार ना? महाराज, सरकारी नोकरीनें आह्मी जसें बंदिवान झालों आहों. आपण कसें स्वतंत्र, मर्जीस येईल तेव्हां कोणतीही गोष्ट करण्यास मुकत्यार आहा. असो; पण आज बाबासाहेबांची स्वारी इकडे कोणीकडे?

बापूजी.—आपल्याच कडे,—अगदीं मुद्दाम—करावें काय? त्यांना आपल्या सारख्यांच्या कडे खेपा घातल्याच पाहिजेत ! देणी पडली आहे ना पदरीं ? आपल्याशीं शरीरसंबंध घडावा अशी त्यांची फार इच्छा आहे.

बाबा.—हो—आमच्या मनांत आहे, परंतु यांनीं आह्मांला पदरांत घेतलें तर ?

वकील.—हें काय ! म्हणजे वास्तविक म्हटलें म्हणजे जें आमच्या सारख्यांनीं म्हणावयाचें तेंच आपण म्हणतां ! आपली गोष्ट कुणिकडे! आज कसें झालें तरी जहागी-रदार! आम्हीं काय ! सरकारी नोकर आणि नोकरी म्हणजे दोन प्रहरची सावली !

बापु.—वकील साहेब ! आपण म्हणतां ते खरें, परंतु आपण म्हणजे नोक-रीवरच अवलंबून आहां असें नाहीं. आणि त्यांत आपली नोकरी कोणत्या प्रका-रची आहे हें उघड दिसतच आहे. परंतु पैशाकडे व श्रीमंतपणाकडे पाहून शरीर

संबंध करणें हें तुझाचें काम नाहीं. अहो, मनदौलत काय ! क्षणभंगुर आहे ! कुळ मोठी पाहिजेत, त्या परिपूर्ण असल्या म्हणजे झालें. असो, पण तूर्त तूर्त बाळा-साहेबांचें लग्न करावयाचा विचार आहे किंवा नाहीं ?

वकील.—माझा मनोदय यंदाच करावें असा नव्हता. परंतु रावसाहेबांचीं मला दोन पत्रें आलीं कीं, यंदा कोठें चांगल्या रीतीनें जमेल तर संधि घालवूं नका. आतां, तसें कोठें जमून आलें, तर उरकून घेऊं, असा विचार आहे.

बापूजी.— ( मनांत ) ईश्वर पावला, आम्हांला तेंच पाहिजे आहे. ( उघड ) आपण म्हणतां कीं, जर चांगलें जमून आलें, तर उरकून घेऊं. आतां बाबासाहेब आ-पल्याकडे आले आहेत, व त्यांचे मार्फत मी आपल्यास विनंती करितों कीं, आपण त्यांस पदरांत घ्या. मुलीविषयीं म्हणाल तर ती जशी आपल्यास पाहिजे तशीच आहे. आतां पत्रिका मात्र जमल्या पाहिजेत. त्या आपण जोशांकडून जमवाव्या. मुलीची पत्रिका ही मी आणिली आहे. ( पत्रिका देतात. ) आपल्या मनाप्रमाणें टिपणें जम-ल्यावर मग कांहीं नाहींना ?

वकी०—परवां रविवार आहे. ते दिवशीं रावसाहेब येथें यावयाचे आहेत, ते आल्यावर काय तो विचार करूं.

ह्याप्रमाणें संभाषण झाल्यावर पानसुपारी घेऊन बाबासाहेब वगैरे मंडळी आपापल्या घरीं गेली. पुढें मागें सितारामपंतांनीं सांगितल्याप्रमाणें रावसाहेब रविवारीं आले व त्या दिवशीं भोजनोत्तर उभय बंधूंमध्यें पुढील संभाषण झालें.—

राव०—मार्गशीर्ष महिना निघाला, गोविंदाचें कोठें जुळण्याचा रंग आहे का ?

वकील.—जमवणें वगैरे सर्व आपल्याकडेच आहे. मुलींच्या तर काय अगदीं उदंड उड्या पडत आहेत. परंतु बाबासाहेब पोतनीस यांचे नातीबद्दल फारच घोळ पडली आहे.

राव०—त्यांची नात म्हणजे वामनरावची मुलगी असेल !

वकील.—हो, वामनराव, धारकरांचे जावई, त्यांची मुलगी.

राव०—वा ! ती मुलगी फार चांगली आहे. आपल्या आईसारखी देखणी, कुशल व हुशार आहे. तुम्ही तिला पाहिली आहे काय ? मीं तिला ठाण्यास आपासाहेबांकडे पाहिली आहे. मला वाटतें, कीं तें जमल्यास मागें पुढें पाहूंच नये.

१ सितारामपंत वकील यांचे वडील बंधु. २ वामनरावांचे सासरे.

वकील.—मुलगी चांगली आहे. आपल्यापैकील सर्वांच्या मनांत येत असावें असें आहे. घराणें कुलीन आहे परंतु आपल्याला त्यांजबरोबर हात देववेल कां ?

राव०—हात देण्याचें पहातां येईल. मुख्य आपल्याला मुलीचें कुळ व मुलगी यांजकडे लक्ष द्यावयाचें ! आतां हें कदाचित नाकापेक्षां मोती जड होईल. तथापि बाबासाहेब फारच थोर आहेत, व त्यांच्या घरांतील इतर मनुष्येंही मोठीं सज्जन आहेत. ह्मणजे श्रीमंतीच्या ताठ्यांत वागणारी ही मंडळी नव्हे; आणि त्यांतून परमेश्वरानें आपल्याला ह्मणजे कांहीं कमी केलें आहे असें नाहीं. तेव्हां हें तुह्मी जमवून टाका उगीच विलंब लावूं नका.

याप्रमाणें उभय बंधूचें बोलणें चाललें आहे; इकडे वकीलसाहेबांची स्त्री दरवाज्याचे आड उभी राहून तें मोठ्या उत्सुकतेनें ऐकत आहे, असें पाहून रावसाहेब विचारितात.

रावसा०—कां जानकी बाई, मुलगी पसंत पडते कां ? काय तें आतां सांगा! पुढें मग कुरकुर नको.

जान०— ( मोठ्या मर्यादेनें. ) यांत मला तें काय विचारायाचें ? बाईनां पसंत पडली ह्मणजे झालं.

( इतक्यांत रावसाहेबांची स्त्री तेथें आली. )

वकील— काय वहिनी ! सून पसंतीस येते का ? तुमच्या मर्जीस उतरली ह्मणजे झालें.

राव० स्त्री०—मुलगी काय ? दीपज्योतींत का तशी मिळायाची आहे ? नुसतें रूप काय ! पण तिचे गुणही तसेच आहेत. आमच्या सगळ्यांच्या मनांत ती मुलगी अगदीं पसंत ठरली आहे. बाईनां तर ती मुलगी फारच आवडली आहे.

रावसा०—तिला आवडली ह्मणजे झालें. आतां आह्मी पुढचं पाहतों कसं काय जमतें तें.

( त्या दोघी जातात. )

इकडे बाबासाहेबांस रावसाहेब आल्याची बातमी कळल्यावर त्यांनीं बापूजी व नारायणराव यांस बोलावून आणून, सर्व जण मिळून वकीलसाहेबांच्या घरीं गेले.

रावसाहेब व वकीलसाहेब यांच्या स्वाऱ्या [illegible]

होत्या. जवळ रामशास्त्रीबुवा वधुवरांच्या पत्रिका पाहून त्या एकमेकांशीं कितपत जमतात हें सांगत होते; इतक्यांत बाबासाहेब वगैरे मंडळी तेथें आली. परस्परांचे आदरसत्कार झाल्यावर बापूजींनीं बोलण्यास सुरवात केली.

बापू०—( रावसाहेबांस. ) आपल्याला अण्णासाहेबांनीं सर्व हकीकत व बाबासाहेबांचा हेतु विदित केला असेलच. आतां मला तो पुनः सांगण्याचें कारण नाहीं. आपण आज आलां, असें कळल्यावरून कांहीं तरी रुकार मिळावा अशा हेतूनें बाबासाहेब आले आहेत; त्यांस रुकार मिळून त्यांचा मनोदय पूर्ण होईल अशी आशा बाळगीत आहें.

रावसा०—हा बाबासाहेबांचा आमच्यावर अनुग्रहच म्हणावयाचा. आतां ह्या शरीरसंबंधाच्या गोष्टी ईश्वर सूत्राप्रमाणें जमून येणाऱ्या असतात. आपण कितीही प्रयत्न केले, तरी ब्रह्मदेवानें मारिलेल्या गांठी कां चुकावयाच्या आहेत!. त्यांत आमच्या वडीलांचें आम्हांस असें सांगणें आहे कीं, कसेंही झालें तरी पत्रिका पाहून गुणमैत्री जमल्याखेरीज कधीं लग्न करूं नका.

शास्त्रीबु०—बापूजी, पूर्वी कोणी झालें तरी पत्रिका जमल्या वांचून लग्न करीतच नव्हते. आतां काय सुधारलेली मंडळी! त्यांना ज्योतिष वगैरे सर्व खोटें वाटतें. पण आमचे बाबासाहेब, रावसाहेब, यांजसारखी कांहीं पोक्त मंडळी आहे, म्हणून कांहीं तरी आमचा मान आहे. नाहींतर आम्हांस. कोण विचारतो! राजमार्तंड ग्रंथांत एके ठिकाणीं असें सांगितलें आहे कीं, जरी वर भिन्न गोत्रांतला, उत्तम कुळांतला, ज्याचें आचरण चांगलें, जो रूपवान् व गुणवान्, असा असला तरी उभयतांच्या पत्रिकांची गुणमैत्री जमली पाहिजे.

रावसा०—काय हो! शास्त्रीबुवा, अमुकच गुण मिळाले पाहिजेत असें कोठें सांगितलें आहे काय!

शास्त्रीबु०—त्याच ग्रंथांत याबद्दल असें सांगितलें आहे कीं, वधुवरांच्या पत्रिकांचे गुण १८ पेक्षा जास्त २३ पर्यंत आले तर कर्तव्यास उक्त; १८ हून कमी आल्यास तें करूंच नये; आणि २३ पासून २६ पर्यंत फार उत्तम, सांप्रत पण असाच परिपाठ आहे.

( इतकें म्हणून दोन्ही पत्रिका घेऊन कागदावर गुण मिळविले ते:— )

| नं. | पत्रिका. | वर | वधू. | गुण. |
|---|---|---|---|---|
| १ | नक्षत्र | उत्तरा भाद्रपदा. | श्रवण. | |
| २ | चरण | द्वितीय. | तृतीय. | |
| ३ | नाडी. | मध्य. | अंत्य. | ८ |
| ४ | राशी. | मीन. | मकर. | ७ |
| ५ | राशिस्वामी | गुरु. | शनि. | ३ |
| ६ | गण. | मनुष्य. | देव. | ६ |
| ७ | वर्ण. | विप्र. | वैश्य. | १ |
| ८ | योनि. | गज. | नकुळ. | २ |
| ९ | वैरयोनि. | सिंह. | सर्प. | ० |
| १० | वश्य. | जलचर. | जलचर. | २ |
| ११ | नाम. | शकदेव. | खुमाबाई | |
| १२ | तारा. | शुभ. | अशुभ. | १॥ |

एकूण गुण ३०॥

( कागद पुढें करून रावसाहेबांस.) हें पाहिलेंत रावसाहेब, पत्रिका फार नामी जमतात ! एकूण ३०॥ गुण जमले, यापेक्षां ज्यास्त गुणांची अपेक्षाच नाहीं.

राव०—( कागद हातीं घेऊन पाहतात. ) गुण साडेतीस तर मिळाले, पण मंगळ वगैरे पाप ग्रह नाहींत ना?

शास्त्री०—( वधूची कुंडली दाखवून ) हें पहा, कांहीं एक नाहीं. ग्रह फारच चांगले आहेत. हा पहा अकरावा शुक्र कसा उत्तम आहे! उभयतांचे ग्रह फारच बुवा नामी आहेत !

बापूजी.—( रावसाहेबांस ) आतां कांहीं हरकत आहे काय ?

रावसाहेब.—( मनांत ) आजपर्यंत बऱ्याच मुली सांगून आल्या होत्या, परंतु त्यांपैकीं कोणाचेंही टिपण असें जमलें नाहीं. करितां आतां रुकार देण्यास कांहीं हरकतशी दिसत नाहीं. (उघड)हरकत कशाची! ठीक आहे, बाबासाहेबांच्या इच्छेचा भंग करून त्यांच्याशीं शरीरसंबंध जोडण्याची जी संधि आली आहे, तिचा अव्हेर करणें मला योग्य दिसत नाहीं.

बापू०—हें पाहिलें थोर माणसाचें सर्व असें आहे ! केव्हांच उलगडून गेलें पहा! नाहीं तर नुसता रुकार मिळावयाला कोण दगदग व आयास पडावा! ठीक आहे, रावसाहेब आपण बाबासाहेबांस पदरांत घेत आहां तर मग आतां उगाच

विलंब करण्यांत अर्थ नाहीं. लग्नाच्या मुहूर्तात झटलें ह्मणजे अजून सुमारें दीड महिना अवकाश आहे. ह्मणून आतांच जमवून टाकाल तर उभयपक्षांस सिद्धता करण्यासही ठीक पडेल.

राव०—हो तें खरें आहे. बरें हा महिना कोणा? मार्गशीर्ष. पुढें पौष कारेटाच आहे. पुढें येतो माघ, त्यांत करून घेतलें पाहिजे. पुढें आमच्या घरीं अडचण येणार आहे. बरें आहे. उद्यांक सोमवार चांगला दिवस आहे. तर सर्व ठराव वगैरे होणें ते उद्यांक रात्रीं करण्यांत येतील.

बाबा०—रावसाहेब, आपण आमची एक मोठी काळजी निवारण केलीत.

राव०—बाबासाहेब, आपण करणार कोण? तें सर्व त्याच्याकडे आहे.

बाबा०—हो,तसें तर आहेच; बरें आहे, मग आतां उद्यां रात्रीं मी व बापूजी आपण कळविल्या प्रमाणें येऊं.

राव०—ठीक आहे. आपण असे रात्रीचे आठ वाजावयाच्या सुमारास आलां, ह्मणजे बरें पडेल.

असा निश्चय झाल्यावर सर्व मंडळी आपआपल्या घरीं गेली. बाबासाहेब घरीं आल्यावर सर्वांचा विचार घेऊन वकीलांकडे मुलगी द्यावी, असा सर्वांचा निश्चय ठरला.

दुसरे दिवशीं पूर्वी ठरविल्याप्रमाणें ठराव वगैरे झाले ते येणेंप्रमाणें:—

बाबासाहेबांनीं १००० रुपये हुंडा द्यावा. मुलास पोषाखः—पागोटीं, शाल जोड्या, शेले, धोतरें, पितांबर, वगैरे. अलंकारः—गोफ, पौंची, कंठी, जोडवीं. चांदीचीं भांडीं:—तांब्या, जांब, ताट, वाट्या, हें सामान मर्जीनुरूप द्यावें. विहिणींचा मानपान करणी वगैरे सर्व यथास्थित करावी. रासनहाण करावें. विहिणीचें तोंड धु-ण्याचें सामान चांदीचें करावें. व लग्न राहते गांवीं करावें.

आत्मारामाचेंही लग्न यंदाच उरकून घेण्याचा बाबासाहेबांचा विचार होता. त्यांच्याकडेही मुलींची अगदीं झिम्मड पडली होती. परंतु नातीचें जमल्या खेरीज त्यांस या संबंधानें कांहींच ठरवितां आलें नाहीं. त्यानां अनेक मुली सांगून आल्या होत्या; त्यांत त्यांच्या गांवचे मामलेदार यांनीं तर काय [१] त्यांच्या उंबऱ्याची साल नाहींशी केली होती. बाबासाहेबांच्या नातीचें वकीलांकडे ठरलें असें नानासाहेबांस ( मामलेदार ) कळलें मात्र, तों त्यांची स्वारी दुसऱ्या दिवशींच बाबासाहेबांकडे आली.

नाना०—भोरासाहेबांकडून मुलीचें टिपण आज आलें. व ते स्वतः रविवारीं येणार आहेत.

---

१ नानासाहेबांचे मेहुणे. ह्मणजे त्यांच्या मावशीचे यजमान. हे पुण्यास मामलेदार होते.

बाबासाहेब०—आपण तें येथें आणिलें आहे काय? असल्यास शास्त्रीबुवा लागलेच पाहतील कसें काय जमतें तें.

नानासा०—होय. हें आणिलें आहे. ( टिपण बाबासाहेबां जवळ देतात. बाबासाहेब आत्मारामाचें टिपण आणून दोन्ही टिपणें शास्त्रीबुवांच्या हवाली करितात. )

शास्त्री०—( पत्रिका पाहून मनन करून मोठ्या हर्षानें. ) वाहवा ! फारच उत्तम ! अहो! एक वर्षपर्यंत धुंडलें तरी असा जोडा मिळावयाचा नाहीं. बरोबर छत्तीस गुण मिळाले ! ! !

नाना —( आनंदित होऊन. ) काय? छत्तीस गुण मिळाले? ईश्वरी सूत्र!!

बाबा०—( कागद हातीं घेऊन ) वाहवा ! छत्तीस गुण मिळाले खरे. अहो पण हें काय ? दोघांचें नक्षत्र एकच आहेना ? हें कसें जमणार शास्त्रीबुवा ?

शास्त्री०—हः—बाबासाहेब, आपली शंका खरी आहे. परंतु याला कांहीं एक बाध नाहीं. नक्षत्र एक आहे खरें, परंतु चरण भिन्न आहेत. तेव्हां याला कांहीं दोष नाहीं.

बाबा०—काय ? चरण भिन्न असले ह्मणजे चालतें वाटतें ? एक नक्षत्राचा फारच दोष मानिला आहे. यास कायशी एकनाड ह्मणतात कीं.

शास्त्री०—तें खरें, परंतु मी जें ह्मणतों त्यास ग्रंथाधार आहे. त्याशिवाय मीं आपल्यास असें कसें सांगेन ?

एक राशी पृथक् धिष्ण्ये पृथक् राशौतथैकभे ॥
गणनाडी न दूरत्वं ग्रहवैरं न चिंतयेत् ॥ १ ॥
दंपत्योरेक नक्षत्रे भिन्नपादे शुभावहं ॥
दंपत्यो रेकपादे तु वर्षांते मरणं ध्रुवं ॥ २ ॥

राजमार्तंड ग्रंथामधील हे श्लोक आहेत. यांचा अर्थ असा आहेः—

अर्थ—उभयतांच्या राशी एक, व नक्षत्रें भिन्न; आणि उभयतांच्या भिन्न राशी, व नक्षत्रें एक; असें असल्यास गण व नाडी यांचे दोष व ग्रहांचें वैर असल्यास कांहीं चिंता नाहीं. परंतु नक्षत्र एक असल्यास पाद भिन्न असले पाहिजेत. नाहींतर, पाद भिन्न नसले तर मात्र एका वर्षांत मृत्यु जाणावा.

बाबा०—शास्त्रीबुवा, असें असेल तर फारच उत्तम आहे ! नानासाहेब ठीक आहे. आपण ह्मणतां त्याप्रमाणें आपासाहेब आल्यावर सर्व विचार ठरतील.

याप्रमाणें भाषण झाल्यावर नानासाहेब व शास्त्री घरीं गेले. नंतर बाबासाहेबांनीं घरांतील सर्वांचा रुकार घेऊन तीच मुलगी कायम करण्याचें ठरविलें.

आपासाहेब पुसकून आल्यावर ते बाबासाहेबांकडे आले, व ठरल्या प्रमाणें बाबासाहेबांनीं त्यास रुकार दिला. नंतर परस्परांत लग्नासंबंधी ठराव झाले ते येणे प्रमाणें:-

बाबासाहेबांनीं आपल्या नातीला जितका हुंडा दिला तितका आपासाहेबानीं द्यावा, व त्याचप्रमाणें करणीही करावी; आणि लग्नास बाबासाहेबांचे गांवीं यावें.

ह्यांप्रमाणें आत्मारामाचें व चंद्राबाईचें अशा दोन्ही लग्नांचा निश्चय ठरला.

नंतर कांहीं दिवसांनीं बाबासाहेबांकडून साखरपुडा झाला तो:-

सुदिन दिवस पाहून त्यादिवशीं नानासाहेबांस सूचना दिली. मंडळीस पानसुपारीचें आमंत्रण केलें. स्त्रियांस, हळदकुंकुवास बोलाविल्या. नंतर रात्रीं कांहीं स्त्रिया अलंकार घालून वस्त्रे परिधान करून सिद्ध झाल्या. त्याचप्रमाणें पुरुष मंडळी सिद्ध झाल्यावर वाजत गाजत मोठ्या समारंभानें नानासाहेबांकडे सर्व मंडळी गेली. स्त्रिया घरांत गेल्या. परस्पर विहिणी एकमेकींस नमस्कार करून खालीं बसल्या. इकडे पुरुषमंडळी दिवाणखान्यांत गेली. तेथें नानासाहेब व दुसरी मंडळी होती. सर्वांचे नमस्कार झाल्यावर मंडळी आपआपल्या ठिकाणीं बसली.

इकडे घरांत दोन चौरंग मांडून त्यांजवर मरुं घातले. नंतर एकावर नवरे मुलीस व दुसऱ्यावर तिच्या आईस बसविलें. मुलाच्या आईनें त्या दोघींस हळदकुंकू देऊन, आईची ओटी भरून तिला लुगडें व खण दिला. मुलीच्या हातांत साखरपुडा ( पेढे, बर्फी वगैरे मिठाई बांधिलेला पुडा ) देऊन, गळ्यांत पुतळ्याची माळ घालून, तिला साडी व खण दिला.

नंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकू, पानसुपारी देऊन ओटया भरिल्या.

मंडळी सर्व जमल्यावर पानसुपारी, अत्तरगुलाब, व हारगजरे वांटून पेढे वाटले. नंतर सर्व मंडळी वाजत गाजत घरीं परत गेली.

( यांप्रमाणें परस्परांकडून साखरपुडे झाले. )

**बाबा०**—( शिवरामभाऊस. ) आतां स्वस्थ बसून उपयोग नाहीं. दोन कार्यें व्हावयाचीं आहेत. त्यांच्या सिद्धतेस आतांपासून लागलें पाहिजे. मुलीचे अलंकार तयार होण्यास बरेच दिवस लागतील. सोनें व मोत्यें खरेदीकरितां मुंबईस गेलें पाहिजे. तें काम तुह्मावांचून दुसऱ्याच्यानें होणार नाहीं. त्याचप्रमाणें घरांतील सामान तयार होण्यास फार वेळ लागेल.

**शिवरा०**—प्रथम आपण सर्व साहित्याच्या याद्दि कराव्या आणि प्रत्येकास निरनिराळें काम सोंपवून द्यावें.

बाबा०—हो, तें खरें. आणा पाहू माझा रुमाल. आजचा दिवस बरा आहे. आजच यादि करूं. दिवस हे हे म्हणतां निघून जातील.

शिवरामभाऊ रुमाल आणून देतात. नंतर सर्व साहित्याच्या वेगवेगळ्या यादि केल्या त्याः—

## वरपक्षाकडील सिद्धता.

### नवरे मुलीचे अलंकार.

**मोत्यां हिऱ्यांचे जडावी अलंकारः**—बिंदी, बिंचपेट्या, तन्मणि, चंद्रकोर, राखडी, चंद्रबाळ्या, घोसबाळ्या, काप, नथ, मंगळसूत्र, कंठा, बांगड्या, भोकरें, मोत्यांचे पेंडे, मोत्यांची एकसरी.

### सोन्याचे अलंकार.

**हातांतील**ः—तोडे, कांकणें, गजरे, गोठ, पाटल्या, बांगड्या, वाकी, बाजुबंद.

**गळ्यांतील**ः—सरी, होनाची माळ, पुतळ्यांची माळ, हरपुर रेवड्यांची माळ, चापेकळ्यांची माळ, चंद्रहार, कंठा, ठुशी.

**इतर**ः—डोकींतील फुलें, गोंडे, बोरें, कंबरपट्टा.

### चांदीचे अलंकार.

तोडे, वाळे, पैंजण, तोरड्या, रूळ, वेढी, विरोद्या.

### चांदीचें सामान.

करंडे २ १ कुंकुवास, व १ मेणास, फणी, भांगसळी, आरशी, वाट्या तेलास, कुंकवाचें सामान ठेवण्यास पेटी.

### नवरे मुलीचें कापड.

१ **शेवटी मुहूर्ताचे वेळेचें**ः—शालू, भरजरीचा खण, शेला. २ **वाङ्निश्चयाचे वेळेचें**—शेलारी, पैठणी, जरीचा खण, शालजोडी. ३ **उष्ट्या हळदीचे वेळेचें**ः—रेशमी साडी, खण. ४ **मेढी मुहूर्ताचे वेळेचें**ः—रेशमी साडी, खण शेला. ५ **सुनमुख पहाण्याचे वेळेचें**ः—शेलारी, खण, शालजोडी. ६ **मूळसाडीः**—पैठणी, भरजरीचा खण, शालजोडी. **वरातीचे वेळेचें**ः—शालू, भरजरी खण, शाल.

### इतर कापड.

**कान पिळण्याचे वेळेसः**—पागोटें शालजोडी. **करवलीसः**—शालू, खण.

---

१ नथा दोन कराव्या, एक नक्षी मोत्यांची व दुसरी मोठी, कारण चार दिवसांत मोत्यांची नथ लागते.

शेला. अंतरपाटाच्या शेला कोरा. मुलीचे मातोश्रीस पातळ रेशमी काठी पातळ वेस आडविणाऱ्यास पागोटें. शकून घेऊन सामोरा येईल त्यास पागोटें, लुगडें व खण.

## वधु पक्षाकडील सिद्धता.

### नवरे मुलास अलंकार द्यावयाचे ते.

कंठी. गोफ. मोत्यांचाहार. पोची. आंगठ्या. जोडवीं. चौकडा.

### मुलाचा पोषाख.

झगा. तुंबा. पागोटीं. शालजोड्या. शेले. धोतरें. पितांबर.

त्यांचा तपशील, व कोणत्या वेळेस काय द्यावें याची माहिती.

१ वरपूजेचे वेळेस-पागोटें, शालजोडी. २ उष्टया हळदीचे वेळेस-पागोटें. शेला. ३ वरप्रस्थानाचे वेळेस-झगा. तुंबा. पागोटें शालजोडी अथवा दुपेटा. ५ मधुपर्काचे वेळेस-पितांबर. शालजोडी. ६ लग्न झाल्यानंतर नेसावयास-धोतरजोडा. ७ वरातीचे वेळेस-पागोटें शालजोडी. ८ मांडव परतण्याचे वेळेस-मंदिल. शालजोडी.

### मुलास द्यावयाचीं भांडीं.

चांदीचीं.-तांब्या, जांब, ताम्हन, ताट. वाट्या. गंधास तबकडी, व साखळी

तांब्या पितळेचीं.-रुखवत नेण्यास पराती. ताटें. वाट्या. तबकें. तस्त. कन्यादानाचे वेळेस, दिवा. काशाचें ताट.

### मुलास द्यावयाचें इतर सामान.

चौरंग, पलंग, गाद्या, दुलया, गिरद्या, चादरी, चर्मी जोडा, अबदागिरी. छत्रा. आरसा. गंधाचें खोड.

### विहिणीस म्हणजे मुलाच्या आईस देण्याचें सामान.

### तोंड धुण्याचीं भांडीं व इतर सामान.

### भांडीं चांदीचीं.

तबक. वाट्या २;-१ हळदीस, १ सुवासिक तेल ठेवण्यास. आरसा. फणी

---

१ हें पातळ नवें पैकन त्याचा शिवला रंग द्यावा. २ वर पूजेचें पागोटें तांबड्या रंगाचें असावें. ३ वरातीचें पागोटें हिरव्या रंगाचें असलें पाहिजे. ४ किंवा चांदीची आरशी. ५ हस्तिदंती व चांदीची.

करंडे २ — १ कुंकवास, १ मेणास, तांब्या, आंब, ताट, वाटवा, दातवण ठेवण्यास आंबा, अथवा कळी. वजी, जिमळोकी, तबकडी, दातवणास सोन्याचें फूल. दात सोन्याचें, खुंटा चांदीचा, घंगाळ पितळेचें.

**तांब्या पितळेची भांडी तोंड धुण्यावर जावयाचीं तीं.**—घागर, तस्त, तांब्या

**इतर भांडीं**:—मांडी थेपण्याचें पातेलें, शकुनाचें तपेलें.

### इतरकापड.

पहिले जावई असतील त्यास मधुपर्काचे वेळेस देण्याचा पोषाख:—पागोटीं शालजोड्या, शेले, वडील मुलीस:—लुगडीं, खण.

नवऱ्यामुलास भांग पुसण्याकरितां शेला. व तोंड पुसण्यास रुमाल मश्रूचा. मुलाच्या आईस तोंड पुसण्यास रुमाल, पायघड्या घालण्यास पांढरें कापड.

### इतर सामान.

*कण्याचे तांदूळ रंगविण्यास रंग, हिरवा, पिवळा, हिंगूळ, पारवा, नक्षत्रमाळा, कागदी चौरंग, नारळांस व सुपाऱ्यांस लावावयास बेगड, मांडव ओहिरी. ( बहुल्याच्या भोंवतालच्या वह्या ) झाल.

## उभय पक्षाकडे लागणारें सामान.

पुढील यादींत जें सामान लिहिलें आहे त्याची जरूर उभय पक्षीं आहे, असें समजावें.

( ज्या जिनसां पुढें * अशी खूण आहे तो जिन्नस मुंजींत लागत नाहीं, असें समजून बाकीचे सर्व पदार्थ आणावे. )

### शृंगारिक पदार्थ.

हळद, कुंकू, गुलाल, बुका, शेंदूर, कापूर, उदबत्या, अगरबत्या, गंधाचे रवे, केशरी गोळ्या, अरगजे, अत्तरें नानाप्रकारचीं, गुलाबपाणी, कावगोळ्या रांगोळें, उटणीं नानाप्रकारचीं, सुवासिक तेलें, जरदा, मुंढावळी मोत्याच्या, व कागदी, जानवी जोडे.

### भक्षणीय पदार्थ.

तांदूळ, ( कमोद, आंबे मोहोर, जिरेसाळ, ) गहू, हरभरे, मसुरा, वाटाणे, चवळ्या, उडीद, तुरीची डाळ, मूग, तूप, साखर, गूळ, खोबरें नारळ, खजूर, खारिक-बदाम, पिस्ते, चारोळी, बेदाणा, केशर, जायपत्री, जायफळ वेलची, कंकोळ,

---

१ हा श्रीमंत लोक तांब्याच्या भोवळोच्या करितात.

सुपारी, मुइमुग, दालचिनी, सुंठ, लवंगा जिरें, मिरें, कांदे, बडिशेप, कमलपत्र, बादियान, मिरची, धणे, मिठ, हळद, तिळाचें तेल, खोबऱ्याचें तेल, ग्यासलेट, नासकें खोबरें, हिलालास. कोकम. चिंच. मोहरी. खसखस.

लोणचीं नानाप्रकारचीं करून ठेवावीं तीं:—लिंबाचें, आंब्याचें, आल्याचें, महाळुंगांचें.

वर सांगितलेलें सर्व सामान पूर्वीं तयार करून ठेवावें. जसा आपल्यास खप असेल त्याप्रमाणें सामान कमी जास्त आणावें.

आयते वेळेस आणावयाचें जिन्नस * फळफळावळ:—केळी, पेरू, आंबे, नारिंगें, साखर,लिंबूं, अंजिर, द्राक्षें, पपनिस, अननस, डाळिंबें, फणस, ऊंस (ह्या जिनसांची वधू पक्षाकडे विशेष जरूर आहे, ज्या दिवसांत हे जिन्नस जितके मिळतील तितके मिळवावे)

नागवेलीचीं पानें, फुलें, हार, कलगी तुरे, केळीचीं पानें हे पदार्थ खपाप्रमाणें आणावेत.

भाज्या:—आलकोल, कोबीचे कांदे, पडवळें, फणस, वांगीं, बटाटे, सुरण, हिरवीं केळीं, दुधे भोपळे. भाज्या हंगामाप्रमाणें मिळतात. सर्व सारख्या मिळत नाहींत. करितां ज्या मिळूं शकतील त्या मिळवाव्या.

### इतर उपयोगी जिन्नस.

सुंभ, सुतळ, खिळे, चुका, पत्रावळी, द्रोण, शोभनें.

### बुरुडकाम.

रोवळ्या, टोपल्या, दुरड्या, शिपतरें, परड्या, पुडे, देव परड्या.

### कुंभार काम.

देवेआहिऱ्या.

बैठकीचा सरंजाम घरीं नसल्यास मिळवून आणावा लागतो तो:—

आजम, गालिचे, सतरंज्या, लोडें, तक्के, रुजामे, खुर्च्या, टेबलें, मेजें.

### पानसुपारीचा सरंजाम.

तबकें, ताटें, अत्तरदाण्या, गुलाबदाण्या, आडकीते, चुनाळ, चौफुलें तंबाकूस डबे:— (हें सामान चांदीचें मिळाल्यास मिळवावें.)

### स्वयंपाकाचीं भांडीं.

पातेलीं. तपेलीं. पराती. ताटें. पळ्या. कालथे. कढया.

**वाढपाची भांडीं**:—ताटें, वाट्या, पराती, तांब्ये, पळ्या, भोगपळी, वेळण्या. ( हीं सर्व चांगलीं व कल्हई लाविलेलीं असावित. )

इतर कामास व पाणी साठवून ठेवण्यासः—हांडे, घागरी, पंचपात्रें, सतेली, घंगाळें ( गंगाळवें. )

हा सरंजाम सर्वांच्या घरीं असत नाहीं, करितां गांवांत ज्यांजकडे असेल त्यांजकडून अगोदर आणून ठेवावा. आयत्यावेळेस जरूर लागल्यावर आणणें रास्त नाहीं.

**परस्परांकडून व्याह्यास द्यावयाचे पोषाख**:—पागोटीं, शालजोड्या, याचा तपशील:—वरपूजेचे वेळेस पागोटें, शालजोडी. वाक्‌निश्चयाचें वेळेसः—पागोटें शेला. मांडव परतणीचे वेळेसः—पागोटें, शालजोडी.

**परस्परांकडून विहिणीस द्यावयाचें कापड.**

१ शेवंती मुहूर्ताचे वेळेस लुगडें, खण जरीचा. २ वरपूजेचे वेळेस शालू, शालजोडी, खण भरजरीचा. ३ वाग्‌निश्चयाचे वेळेस शेलारी, शालजोडी, खण-किनखाबी. ४ उष्टयाहळदीचे वेळेस लुगडें, जरीचा खण. ५ मेढी मुहूर्ताचे वेळेस लुगडें, खण. ६ सुनमुख पहाण्याचे वेळेस शेलारी, भरजरीचा खण. ७ वरातीचे वेळेस शालू, शालजोडी, खण. ८ नेसवणीवर पैठणी, भरजरीचा खण.

**इतर कापड.**

परस्परांकडील मानकरी पुरुष मंडळीस द्यावयाचा पोषाखः—पागोटीं, शालजोड्या, शेले. मानकरिणी स्त्रियांसः—लुगडीं, खण. प्रत्येकांकडील सोयरे व वऱ्हाडी लग्नास जमले असतील त्यांस.—पागोटीं, शालजोड्या, शेले, लुगडीं, खण. परस्परांकडील दास दासी, शिपाई वगैरे लोकांस देण्यासः—पागोटीं, शेले, लुगडीं, खण. आपल्या घरच्या दासदासी व शिपाई वगैरे लोकांस देण्यासः—पागोटीं, शेले, लुगडीं खण. परस्परांकडील उपाध्यांस द्यावयासः—पागोटीं, शेले अथवा शालजोड्या. आपल्या उपाध्यास द्यावयासः—पागोटें, शेला अथवा शालजोडी.

याप्रमाणें सर्व यादी तयार झाल्यावर बाबासाहेबांनीं आपल्या तीन पुत्रांस निरनिराळीं कामें वाटून दिलीं. त्याप्रमाणें प्रत्येक जण आपलें काम करण्यांत गुतले. बाबासाहेबांकडे कारकून, शिपायी, गडी, मोलकरणी वगैरे दोन कार्यांस पुरे इतकीं माणसें नव्हतीं. म्हणून त्यांनीं एक दोन कारकून, काहीं शिपायी, गडी मोलकरणी वगैरे नवीं माणसें ठेविलीं. याप्रमाणें जरूर तितकीं माणसें नोकर ठेविल्यावर मग काय विचारतां! सिद्धतेचें काम मोठ्या झपाट्यानें होऊं लागलें. जिकडे पहावें तिकडे बाबासाहेबांच्या वाड्यांत धामधूम दिसूं लागली. सहज त्यांच्या वाड्यावरून जाणाऱ्या पांयस्थलोकांस पुढील चौकांत घातलेल्या

मोठ्या व सुशोभित मंडपाचें काम कांहीं झालें आहे व कांहीं होत आहे, तसेंच वाड्यास बाहेरून व आंतून रंग देण्याचें काम चाललें आहे, वगैरे गडबड पाहून वाटत असें कीं, येथें मोठ्या थाटमाटाचें कार्य व्हावयाचें असावें. जर एकादा कोणी वाड्यांत गेला तर त्याच्या दृष्टीस पडे कीं, चारपांच सोनार जणुं काय आपले टुमदार दुकान मांडून पोतनिसांच्या वाड्यांतील मधल्या चौकांतील खोलींत बसले आहेत; जवळ बाबासाहेब लहानशा गादीवर लोडाला टेंकून बसले आहेत व त्यांचें अलंकार करण्याचें काम चाललें आहे; इकडे मोठ्या सोप्यांत कापडकरी–गुजराथी, वाणी, मारवाडी वगैरे मंडळी कापडांचे बस्ते सोडून जो तो आपआपला माल जास्त खपावा म्हणून उत्तम सनगें पुढें करून शिवरामभाऊंस दाखवित आहे; व वामनराव यांची स्वारी साखर, गूळ, तूप, खोबरें वगैरे माल पसंत करून अमूक मण आणावयास सांगत आहेत. इकडे नारायणराव खुर्चीवर बसले आहेत व हाताशीं एक कारकून घेऊन बाजारांतून आलेलें सामान नीट व्यवस्थेनें म्हणजे लवकर सांपडावें असें कोठींत ठेवित आहेत व तिसऱ्या चौकांतील सोप्यांत मोलकरणी–कोणी गहूं दळीत आहेत, व कोणी तांदूळ सडीत आहेत. याप्रमाणें कार्य सिद्धतेची अगदीं धामधूम उडाली आहे.

अशीच तयारी सितारामपंत वकील व नानासाहेब यांचेकडे होत होती.

पौष महिना अर्धा संपत आला तों बहुतेक सिद्धता झाली. बाबासाहेब अलंकार करण्याचें कामांतून मोकळे झाल्यावर त्यांनीं शिवरामभाऊ यांनीं घेतलेलें कापड पाहून, तें बाईसाहेब वगैरे घरांतील स्त्रियांस दाखवून, सर्वांच्या पसंतीस पडलें तें ठेवून बाकीचें परत करविलें. त्याचप्रमाणें वामनराव यांणीं कोण कोणते जिन्नस घेतले व आतां कोणते घ्यावयाचे आहेत, याची चौकशी करून जे घेतले नव्हते ते लवकर आणावयास सांगितले. याप्रमाणें सर्व कामांचा तपास करून राहिलेलें काम लवकर आटोपण्याविषयीं ताकीद दिली. अशी इकडील व्यवस्था लावून बाबासाहेब व शिवरामभाऊ मोठमोठ्या किंमतीचें कापड वगैरे जें सामान त्यांचे राहते गांवीं मिळालें नाहीं तें आणण्याकरितां मुंबईस गेले. तेथें गेल्यावर त्यांनीं सामान खरेदी केलें व मित्रमंडळी, आप्तसगे, वगैरे मंडळीस आमंत्रणें पाठविण्यास कुंकुमपत्रें छापविलीं. ( त्याचा नमुना खालीं दिल्या प्रमाणें. )

॥ श्री. ॥

**राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री.** ——————

मुक्काम —————— स्वामी गोसावीं यांस.

पोष्य बाळाजी श्रीधर पोतनीस मुक्काम ... कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागाईत मिती पौष वद्य ९ पावेतों वर्त्तमान यथास्थित असे विशेष. यानंतर इकडील मजकूर, पौत्र चिरंजीव **आत्माराम** याचा विवाह माघ शुद्ध ५ रोजीं योजिला आहे. शरीरसंबंध राजमान्य राजश्री आप्पासाहेब पुणेकर यांची **कन्या** वधू नेमस्त ठरविली आहे. व दुहिता चिरंजीव **चंद्राबाई**, इचा विवाह माघ शुद्ध ५ रोजींच योजिला आहे. शरीरसंबंध राजमान्य राजश्री सिताराम रामचंद्र ठाणेकर यांचा पुत्र वर योजिला आहे. कार्य कर्तव्य ... येथें आहे. आपण सहकुटुंब सहपरिवार येऊन कार्यसिद्धि करावी. कळावें लोभ असावा हे विनंती.

याप्रमाणें कुंकुमपत्रें छापवून व तेथलीं कामकाजें आटोपून, बाबासाहेब आपल्या गांवीं आल्यावर त्यांनीं आपल्या इष्टमित्रांस व आप्तसग्यांस लग्नास येण्याविषयीं आग्रहाचीं पत्रें पाठविलीं. तसेंच कांहींकांकडे कारकून व शिपाई आणावयास पाठविले. हीं पत्रें पोंचतांच त्यांजकडे वऱ्हाड जमूं लागलें व कांहीं दिवसांनीं पोतनिसांचा वाडा गजबजलेला दिसूं लागला.

पौष महिना अर्धा निघून गेला. सर्व सिद्धता झाली. पुढील मंडपांत सुरूचे खांब उभे करून ठिकठिकाणीं महेरपदार कमानी केल्या. पांढरें सफेत छत लावून झालरी सोडल्या. तांबड्या, हिरव्या, पांढऱ्या, पिवळ्या अशा रंगीबेरंगी हांड्या टांगून मधून मधून झुंबरें टांगिलीं. माडीवरील दिवाणखान्यास तजेलदार रंग देऊन वेलबूट काढिले. इराणी गालिचे पसरून कोठें खुर्च्या, कोठें टेबलें व कोठें गाद्या, तक्के वगैरे मांडून बिछाईत घातली.

---

१ हा नमुना मोठा आहे सबब कार्डावर मावणारा नाहीं. तो याच मान्याचा थोडक्यांत लिहावा. मतलबासंबंधीं कुंकुमपत्र याच मान्याचें असावें.

याप्रमाणें उभयपक्षांकडे सिद्धता पूर्ण होऊन कांहीं । स्वस्थ विश्रांती घेण्यास मिळाले.

इतक्यांत, पुण्याहून आपासाहेब सर्व वऱ्हाडासह आज सायंकाळीं येणार, ह्मणून नानासाहेब यांजकडून सूचना आली. नंतर गाडीच्या टाइमावर त्यांस आणण्यास सामोरें जाण्याकरितां वाजंत्री, ताशे, घोड्यांच्या गाड्या, म्याने वगैरे सरंजाम तयार करण्यास बाबासाहेबांनीं बापूजींस सांगितलें. सर्व तयारी झाल्यावर कांहीं मंडळी पोषाख करून सिद्ध झाल्यावर सरंजामासह स्टेशनावर गेली. गाडी आल्यावर सर्वांस गाडींतून उतरून, कोणास घोड्यांच्या गाड्यांत, व स्त्रियांस म्यान्यांत बसवून वाजत गाजत गांवा नजीक येऊन पोंहचले. तों बाबासाहेब गांवांतील कांहीं मंडळीस बरोबर घेऊन सामोरे जाऊन सर्वांस नानासाहेबांच्या घरीं पोंचविलें.

पुण्याचें वऱ्हाड येऊन पोंहोचलें असें समजतांच बाईसाहेबांनीं साखरपाणी[1] व सिधा[2] नेण्याची तयारी केली आणि तें चार सवाष्णींबरोबर वाजतगाजत पाठविलें.

तेथें गेल्यावर मुलीला व तिच्या आईला चौरंगावर बसवून, हळदकुंकू देऊन साखर दिली व दोघीनां लुगडीं व खण दिलें. नंतर इतर स्त्रियांस हळदकुंकू देऊन, पानसुपारी, अत्तरगुलाब देऊन ओट्या भरिल्या व साखर वाटली. आणि बरोबर नेलेला सिधा तेथें ठेविला. आणि नंतर सर्व बायका घरीं परत आल्या.

---

# पोटभाग २ रा

## लग्न व चारदिवसांतलि सोहळे.

### ( माघ शुद्ध प्रतिपदा )

कोकां[3] शोकास त्यांच्या शमवुनि दयितासंगमें हर्षवी जो, ॥
कारागारें कुरांहीं उघडुनि कमलें[4] भृंगही सोडवी जो, ॥
जेणें अंधार सारा पळवुनि हरिलें सृष्टिच्या दृष्टिदोषा ॥
त्या मित्राचा बघूनी उदय कवण तो चित्तीं मानी न तोषा ॥ १ ॥

---

१ साखरपाणी:–हळदकुंकू, साखर, पाण्याची घागर–वर नारळ ठेविलेला. ओटीचें सामान, पानसुपारी, अत्तरगुलाब, हारतुरे, मुलीला साडी खण व मुलीचे आईला लुगडें, खण. असेंच साखरपाणी वर मुलगा (वर) दुसऱ्या गांवाहून वधूच्या गांवीं आला तर तिकडे न्यावें लागतें. २ सिधा–भोजनाचें सामान शिधासुद्धां. हें सामान जो पक्ष पर गांवाहून येईल त्याजकडे नेण्याची चाल आहे. ही चाल सर्वत्र असत नाहीं. ३ चक्रवाक पक्षी. ४ कमळें.

माघ महिना निघाला. कडक थंडी पडूं लागली. प्रातःकाळ जिलीब पुढें निघाली. पूर्वेस शुक्राची चांदणी चमकूं लागली. अंगास झोंबणारा गार वारा सुटला. पूर्वेस तांबडें फुटलें. ताटातूट होऊन सर्व रात्रभर वियोगानें दुःखित झालेले चक्रवाक पक्षांचे नरमादीचे जोडे अरुणोदय झाल्यावर एकत्र होऊन, आपली भेट झाली ह्मणून सूर्याचे आभार मानून जलक्रीडा करावयास सरोवर जाऊं लागले. अरुणोदय होतांच सर्व रात्रभर कारागृहांत कोंडून राहिलेले भुंगे बाहेर पडून पुनः गुंजारव करूं लागले.

सूर्यबिंब दृष्टिगोचर होऊन वासरमणीची तांबुस प्रभा पृथ्वीवर पसरत चालली. स्नानकरून, नित्यकर्म सारून, बाबासाहेब माडीवरील दिवाणखान्यांत बसले आहेत, इतक्यांत सिताराम आणावकील, रावसाहेब व आबासाहेब, असे तिघे तेथें आले.

( परस्परांस नमस्कार करून खालीं बसल्यावर )

बाबा०—( कांहीं गोष्टी झाल्यानंतर ) आज प्रतिपदा; आतां उद्यापासून कार्यास आरंभ केला पाहिजे.

राव०—उद्या आरंभ तो काय करावयाचा ? प्रथम नवग्रहांची शांति करून घ्यावी, आणि नंतर आरंभ करावा.

वकील—अहो, अजून लग्नाचे अंश योजिले नाहींत, ते योजिल्यानंतर सर्व विचार करण्यास ठीक पडेल.

बाबा०—( सखारामास हाक मारून चिंतामण जोशीबुवांस बोलावणें पाठवितात. )

( जोशीबुवा आल्यावर. )

बाबा०—जोशी महाराज, निश्चयाप्रमाणें कार्याची सर्व सिद्धता झाली, वऱ्हाड सर्व जमलें, आतां कार्यास आरंभ करून शेवटास नेणें आपले स्वाधीन आहे.

जोशी.—आपण यजमान समर्थ आहां. व कार्य शेवटाला नेणारा परमेश्वर समर्थ आहे.

रावसा.—तें सर्व असो; आतां लग्नांचे अंश कोणते लाभतात ते सांगा. व ग्रहशांति, देवप्रतिष्ठा आणि इतर मुहूर्त, हीं कल्यें केव्हां करावीं याचा निश्चय करा, ह्मणजे सर्वांस ठीक पडेल.

जोशी—( पंचांग पाहून. ) बाबासाहेबांच्या नातीस गोरज मुहूर्त चांगला लाभतो, व रात्री ३ घटकेचा मुहूर्त पुणेकरांच्या मुलीस योग्य आहे; असे दोन

१ एक मुलाचें व एक मुलीचें अशीं दोन लग्नें असलीं, तर प्रथम मुलाचें लग्न लागलें पाहिजे. असा शास्त्राधार आहे.

मुहूर्त उत्तम आहेत, ते साधून घेतले पाहिजेत. उद्यां तिहींकडील ग्रहमख करून, तृतीयेचे दिवशीं वरपूजा व शेवती, हे दोन मुहूर्त करावे आणि चतुर्थीचे दिवशीं देवप्रतिष्ठा करून वाङ्निश्चय करावा.

रावसा०—आतां उद्यापासून कार्यास आरंभ होईल असें समजलें पाहिजे.

( इतकें संभाषण झाल्यावर सर्व मंडळी उठली. )

## ग्रहमख व वरपूजेची तयारी.

माघ महिना असल्यामुळें कडक थंडी पडली. पहांट होऊन अंधःकाराचा लोप होत चालला. कावळे काव काव करूं लागले. गुरें पहांट चाऱ्यास सोडिलीं.

पूर्वेस तांबडें फुटलें. मांडवांत सडासारवण पडून आम्रपल्लवांचीं तोरणें बांधिलीं. मागील चौकांतील मंडपांत चुली पेटल्या, व स्नानास स्त्रीपुरुषांची गर्दी झाली.

मंडपांत चौघडा वाजूं लागला, तासे खणाणूं लागले, त्यामध्यें सनयांचे मनास आल्हाद देणारे मधुर स्वर मिसळून त्या वाद्यांच्या गजरानें मनें आनंदित होऊन, सर्वांचीं मुखकमलें प्रफुल्लित दिसूं लागलीं.

माडीवरील दिवाणखान्यांत पुरुषमंडळी कोणी गप्पा मारित, तंबाखू खात, व कोणी गंजीफाचे डाव खेळत बसली होती. स्त्रिया कोणी पक्वान्नें करण्यांत गुंतल्या होत्या; कोणी आपल्या मुलास कडेवर घेऊन समजावित, होत्या; आणि कोणी न्हाऊं घालून जेवूं घालीत होत्या.

याप्रमाणें तो सर्व वाडा मनुष्यांनीं गजबजून गेला होता. चोहोंकडे मंगलदायक वृत्ति होऊन आनंदमय दिसत होतें.

उपाध्ये स्नान करून, भस्माचे पट्टे ओढून वर गंध लावून अंगावर शालजोडी व हातांत पळीपंचपात्री आणि दर्भांची जुडी घेऊन तेथें आले.

नंतर मंडपांत ग्रहमख करण्याचा प्रकार सुरू झाला.

( या कृत्यांतील वैदिक कर्मे व त्यांस लागणारे साहित्य यांची माहिती पत्रकांत दिली आहे ती पहावी. )

वैदिक कर्म आटोपल्यावर "ब्राह्मणभोजन" झालें. नंतर स्त्रीपुरुषांचीं भोजनें झालीं.

( याप्रमाणें तिहींकडील ग्रहमख म्हणजे ग्रहांची शांति झाली. )

सूर्य अस्तास जाऊन अंधःकार पसरत चालला. नभोमंडळांत नक्षत्रें चमकूं

---

१ कार्याचे आरंभीं ग्रहशांति करावी हा उत्तम मार्ग आहे.

लागली. मंडपांत चौघडा वाजूं लागला. व दिवट्यांच्या हांड्या झुंबरांचा लख-लखाट पडला. अशा वेळीं बाबासाहेब मंडपांत बसले होते. तेथें उपाध्ये आले त्यांस बाबासाहेब ह्मणतात.

बाबासा०— अहो, उद्यां वरपूजा व सीमांतपूजन हीं दोन केव्हां करावीं!

उपाध्ये:—प्रातःकाळीं ९ वाजण्याचे सुमारास आपण वकीलांकडे वरपूजा न्यावी; ते आपल्या मुलीस सायंकाळीं चार वाजतां शेवती आणवील. नंतर रात्रीं पुणेकरांकडून आपल्याकडे वरपूजा येईल; *त्यानंतर आपण मुलीस शेवती न्यावी. याप्रमाणें वकीलांकडेही विचार ठरला आहे.

बाबासा०:—बरें आहे. आह्मांस आतांच तयारी करून ठेविली पाहिजे. नाहीं तर सकाळीं धांदल होईल.

उपाध्ये:—आपण आतांच वरपूजेची तयारी करून ठेवावी, हें फार चांगलें.

( उपाध्ये जातात. )

बाबासा०—( बाबासाहेब घरांत जाऊन शिवरामभाऊंस. ) आपल्यास उद्यां प्रातःकाळीं वरपूजा न्यावयाची आहे, त्याची तयारी आतांच करून ठेविली पाहिजे, सकाळीं वेळ मिळणार नाहीं.

शिव०—बरें आहे. आईसाहेबांच्या विचारानें सर्व तयारी करून ठेवितों. नंतर शिवरामभाऊ यांणीं बाई साहेबांच्या विचारानें वरपूजेची तयारी केली तीः—

वरपूजेस लागणारें सामान—ऊन्हपाणी, तस्त, रुमाल, चौरंग मखरसहित, हळदकुंकवाचें सामान. स्त्रियांच्या ओटया भरावयास तांदूळ व नारळ.

मुलास देण्यास पोषाखः—पागोटें, शालजोडी. करवलीसः—पुतळ्यांची माळ, साडी व खण. मुलाचे अलंकार. बुक्काभेटीचें सामान. मुलाचे आईसः—लुगडें, खण.

### रुखवताचें सामान.

तांदूळ, तुरीची डाळ, हरभऱ्यांची डाळ, गूळ, तूप, कणीक, वारकूट, हळकुंडें, नारळ, खोबरें, खजूर, जिरें, धणें, गुलाल, तुपाचें तपेलें[2] तुपासहित.

( हें सामान आपल्या सामर्थ्याप्रमाणें कमजास्त ( तांदूळ ४ मणांच्या या मानानें सर्व जिन्नस असावें. ) असावें. या सामानांनीं शिपतरें भरून ठेवावीं, व त्यांवर, एकावर एक लुगडें व खण ठेवावा. या लुगड्यास फिरती घडी ह्मणतात. कारण हें लुगडें दोन्हीपक्षीं फिरत असतें ) याप्रमाणें सर्व तयारी करून ठेविली.

---

१ बुक्काभेटीचें सामानः—तबक चांदीचें अ० पितळी. शिल्पूळ ( हलका ) बुक्का, कुंचें व खण. २ यांत नगद नाणें घालितात. याला शकूनाचें तपेलें ह्मणतात.

## वरपूजन व शेवती.

कोंबडा आरवला. जनावरांचा किण् किण् शब्द बंद होऊन गायन करणाऱ्या पक्षांचे मंजुळ शब्द कानीं येऊं लागले. गार वाऱ्याची झुळूक सुटून ती अंगास झोंबूं लागली. झऱ्यांचे घरघराट व त्यावरील मंजुळ गाणीं कानास आनंद देऊं लागलीं. वाटसरू वाटेवर पावली टाकून मार्ग कमूं लागले.

पूर्वेस लाल प्रभा फांकत चालली. नक्षत्रें निस्तेज दिसूं लागलीं. डोंगरांतून, गर्द झाडांमधून सपाट मैदानावर सरसावलेल्या सर्पासारख्या वांकड्या पायवाटा प्रकाशित होत चालल्या. भयंकर व क्रूर प्राणी सर्व रात्रींत मिळविलेले भक्ष भक्षण करीत असतां सूर्याची लाल प्रभा पाहून, राहिलेले भक्ष तोंडांत धरून आपआपल्या गुहांत जाऊते झाले.

भानूदय झाला. स्त्रिया आंगें धुऊन तुळशीची पूजा करून एकमेकींस, हळदकुंकूं देऊं लागल्या. गांवांत आप्तस्नेही वगैरे सर्व पुरुष व बायका मंडळीस वरपूजनास येण्याकरितां आमंत्रणें पाठविलीं. बाई साहेब प्रातःस्नान करून, तुळशीची पूजा वगैरे नित्य कर्म सारून, सर्व स्त्रियांस लवकर स्नान करण्यास सांगूं लागल्या. बाबासाहेब व शिवरामभाऊ घरांत वारंवार सांगत होते कीं "चला आटोपा, मुहूर्त नेण्याची वेळ झाली."

स्त्रिया अलंकार घालून, कोणी शालू, कोणी डोलारी, व कोणी पैठणी, नेसून, अंगावर लफ्फेदार पदराच्या जरीच्या शालजोड्या घेऊन सिद्ध झाल्या. पुरुष मंडळी पांढरी शुभ्र धोतरें नेसून अंगावर उपरणीं, व शेले घेऊन, कोणी कुसुंबी, कोणी गुलाबी रंगाचीं पागोटीं घालून, निरनिराळ्या रंगाचें अलपाकी अंगरखे घालून, जावयास तयार झाली. याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर सामानाच्या पराती, टोपल्या, गड्यांच्या डोक्यावर दिल्या. व लहान मुलांस गाड्यांत बसविलें.

अग्रभागीं व्यांडवाले, त्यांच्या मागें वाजंत्री व ताशांचे जोड चालूं लागले. त्या पुढें सामान घेऊन चालणारे गडी व मुलांच्या गाड्या चालत होत्या. त्यानंतर स्त्रिया हळूहळू चालूं लागल्या आणि सरतेशेवटीं पुरुष मंडळी निघाली, तो प्रातःकाळचा समय होता. बाळसूर्याचे आरक्त किरण रस्त्यावर पसरले होते. रस्त्याच्या दुतर्फा रमणीय बगीचे होते. त्यांत अनेक रंगांचीं व अनेक जातींचीं फुलें, झाडें, केळी, नारळी, पोफळी, इत्यादि होत्या. त्यांचीं हिरवीं गार पानें

उन्हाळ्यांत पावसासारखी चकाकत. मधून मधून पाणी खेळविलें होतें. त्यावर सूर्याचे किरण पडल्यामुळें तें स्फटिकासारखें दिसे. ठिकठिकाणीं सुवासिक फुलांचे ताटवे जाई जुई सारख्या सुवासिक टवटवीत व रसाळी वेलींनीं गुरफटून गेले होते. त्यांजवरची तांबडी लाल, पिवळी धमक, काळी भोर, पांढरी सफेत, अशा तऱ्हेतऱ्हेच्या रंगांचीं फुलें व कळ्या यांचा घम् घम् सुवास सुटला होता. पक्ष्यांचे मधुर स्वर निघत होते. त्यांत स्त्रिया चालत असतां त्यांच्या पायांतील पैंजणाचा व नूपुरांचा झणत्कार मिसळला होता. सर्वांचीं मुखकमलें प्रफुल्लित दिसत होतीं. त्यांत स्त्रियांच्या प्रफुल्लित मुखकमलावर बालार्काचे आरक्त किरण पडल्यामुळें तीं गुलाबाच्या टवटवीत फुलांसारखीं तेजस्वी दिसूं लागलीं. ते थंडीचे दिवस असल्यामुळें त्यांस हळूहळू चालावें लागत असे; कारण, अगोदर त्यांचे पाय कोमल, त्यांत तोरड्या पैंजणांचा भार, व भरजरी शालूच्या निऱ्यांचा घोळ बराच असल्यामुळें जडत्व प्राप्त झालेले ते सुकुमार पाय सडकेवरील रुपणाऱ्या खड्यांवर पडण्यास मागें पुढें पहात असत. असो. आतां वाचणारांचीं मनें वर्णनांत गुंतलीं असतील, सबब हें वर्णन पुरें करून आपण विषयाकडे वळूं.

सर्व मंडळी वकीलांच्या मंडपीं पोंचली. स्त्रिया घरांत गेल्या, व पुरुष मंडळीस वकील सामोरे येऊन त्यांनीं मंडपांत आणून बसविलें. नंतर मंडपस्थानीं दोन चौरंग मांडून त्यांवर मधू घातले. उपाध्यांनीं गणपति व शचि-पूजन वामनरावकडून करविलें. नंतर प्रथम करवलीचे पादप्रक्षालन करून तिला मुलीच्या आईनें हळदकुंकू देऊन, अलंकार व वस्त्र दिलीं आणि ओटी भरिली त्यानंतर नवऱ्या मुलाचे पाय धुऊन, गंध लावून ,लाऊन, गळ्यांत फुलांचा हार घालून, अलंकार व पोषाख दिला, व मुंडावळ बांधिली. नंतर मंडळीस पानसुपारी, अत्तरगुलाब व हार गजरे वाटले.

इकडे घरांत बैठक घातली होती तेथें स्त्रिया गेल्या. परस्पर विहिणींचे नमस्कार झाल्यावर सर्व खालीं बसल्या. मंडपांतील वरपूजा आटोपल्यावर मुलीची आई घरांत गेली. नंतर चौरंग मांडून त्यावर मुलाच्या आईस बसविलें. तिला मुलीच्या आईनें हळदकुंकू देऊन रुखवताचें सामान हातीं लावून, लुगडें व चोळी दिली, आणि ओटी भरिली. नंतर विहीण व तिच्या सर्व मानकरिणी उभ्या राहिल्या. मुलीच्या आईनें त्या सर्वांच्या ( प्रथम मुलाच्या आईच्या ) अंगावर गुलाब

१ मुलाची बहिण ही कुमारी असावी. २ मुलीच्या आईनें पाणी ओतावें, व बापानें पाय धोऊन रुमालानें पुसावें.

फेंकला, व परस्पर भेटल्या. याप्रमाणें मुकाभेट झाल्यावर सर्व स्त्रियांस हळदकुंकू देऊन पानसुपारी वांटून नारळांनीं ओटया भरिल्या. नंतर वकीलांकडील स्त्रियांनीं त्या सर्वांस हळदकुंकूं देऊन ओटया भरिल्या.

याप्रमाणें आटोपल्यावर सर्व मंडळी वाजत गाजत घरीं गेली.

( या पूजेस श्रीमंतपूजाही ह्मणतात. परंतु खरा शब्द "सीमांतपूजा" हा आहे. ही पूजा वर लग्नाकरितां वधूच्या गांवीं येतो तेव्हां सीमेवर करावी. सांप्रत ही चाल नाहीं. परंतु कोठें कोठें वरास देवालयांत नेऊन तेथें पूजा करितात. हा मार्ग चांगला आहे.)

नंतर स्त्रिपुरुषांचीं भोजनें झाल्यावर मुलीस शेवंतीपूजा नेण्याची तयारी चालली तीः—

बाबासा०— ( बाईसाहेबांस. ) सायंकाळीं चार वाजतां वकीलांकडून शेवंतीपूजा यावयाची आहे, त्याबद्दल तयारी करा. मुलीस साडीचोळी नेसऊन अलंकार घाला. व आपल्यासही रात्रीं ८ वाजतां शेवंतीपूजा न्यावयाची आहे; त्यास लागणारें सामान तयार करून ठेवा. पुढें तुह्मास वेळ मिळावयाचा नाहीं.

असें सांगितल्यावर बाईसाहेब व शिवरामभाऊ यांनीं शेवंतीपूजेची तयारी केली तीः—

### शेवंतीपूजनास लागणारें सामान.

उन्ह पाणी. तस्त. रुमाल. हळदकुंकुवाचें साहित्य, मुलीच्या ओटीचें साहित्य. मुलीस अलंकार. साडी, खण. करवलीस अलंकार, साडी व खण. मुलीच्या आईस लुगडें व खण. स्त्रियांच्या ओटया भरण्यास नारळ. तांदूळ. पानसुपारीचा सरंजाम.

( वर सांगितलेलें सामान ताटांत, परातींत व तबकांत भरून ठेविलें. )

बाबासाहेबांनीं सांगितल्याप्रमाणें वकीलाकडून चार वाजतां शेवंतीपूजा आल्यानंतर रात्रीं नऊ वाजतां बाबासाहेबांकडून शेवंतीपूजा पुणेकराकडे चालली.

रात्रीचा समय असल्यामुळें अंधःकार पडला होता. थंडी वाजत होती; आकाशांत नुसत्या चांदण्याच चमकत होत्या. अशा वेळीं वाद्यें वाजविणारे सर्वांच्या

१ कोठें कोठें दोन वेळां ओटया भरितात. एक पूजेबद्दल व एक मुकाभेटीबद्दल.
२ हें सामान येणें प्रमाणें.—गहूं, बदाम, खारीक, हळकुंडें गाठीचीं, नारळ, भाकोव.

अग्रभागीं चालत असून पाठीमागें स्त्रीपुरुष हळुहळू चालले होतीं. दिवाल बरेच असल्यामुळें अंधकार नाहिसा झाला. विश्रांतीचा समय असल्यामुळें चोहोंकडे शांतता होती. अशा वेळीं वाद्यांचे स्वर कानास फार गोड लागत होते. झाडांखालून जात असतां त्यांवर विश्रांतीस राहिलेले पक्षी दिलालांचा लालभडक प्रकाश पाहून उडत, व उडतांना त्यांच्या पंखांचा फड् फड् असा आवाज होई. वाद्याचे मधुर स्वर ऐकून आसपासचे लोक मौज पहाण्याकरितां दारें उघडून बाहेर येत. तेव्हां दारांचा खडखडाट ऐकूं येई. चालतां चालतां बाजार पेठ लागली. दुकानदार दुकानें बंद करीत होते. तेव्हां ठाकठोक असे आवाज निघत. पुढें सारंगीचें मंजुळ कुरकुरणें, व तबल्यावरच्या थापा ऐकूं येऊं लागल्या. सतारीचे सूर व कलावंतिणी ख्यालें, तराणे, गझल, दादरे गात होत्या, त्यांचे गोड सुस्वर आलाप कानीं येऊं लागले. मधून मधून कुत्र्यांचें भुंकणेंही एकूं येत होतेंच.

असे ते रम्य वेळची शोभा अवलोकन करीत चालले. चालतां चालतां पुणेकरांच्या मंडपीं पोंचले. पुरुषमंडळीस नानासाहेब योग्यते प्रमाणें बसविते झाले. स्त्रिया घरांत गेल्या. परस्पर विहिणींचे नमस्कार झाल्यावर सर्व खालीं बसल्या.

मंडपांत मध्यस्थानीं दोन चौरंग मांडून त्यांवर मखरूचे रुमाल घालून त्यांवर करवलीस व मुलीस बसविलें. उपाध्यायानीं गणपति व शचीची स्थापना करून शिवरामभाऊंकडून पूजा करविली. नंतर करवलीचे पादप्रक्षालन करून रुमालानें पुसले. मुलाच्या आईनें तिला हळदकुंकू देऊन, ओटी भरून, साडी व खण दिला. त्यानंतर नवऱ्या मुलीचे पाय धुऊन, तिला हळदकुंकू देऊन अलंकार घातला व साडी आणि खण देऊन ओटी भरली.

इकडे घरांत मुलीच्या आईला चौरंगावर बसऊन, तिला व तिच्या मानकरिणी स्त्रियांस हळदकुंकू देऊन ओट्या भरल्या. मुलीच्या आईच्या हातीं तें रुखवताचें सामान लाविलें आणि नंतर लुगडें व खण दिला. नंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकूं अत्तरगुलाब व हारगजरे देऊन नारळांनीं ओट्या भरल्या.

मंडपांत पुरुषमंडळीस पानसुपारी, अत्तरगुलाब व हारगजरे वाटल्यावर सर्व मंडळी उठली. नंतर सर्व मंडळी आल्याप्रमाणें वाजत गाजत परत गेली. ( अलीकडे हा मुहूर्त वेगळा करीत नाहींत. वाग्निश्चय व हा एकत्र करितात. )

# मंडपस्थापना, देवकप्रतिष्ठा व वाग्निश्चय

थोडा बहू उजळ पाडुनि अंधकारा
कांहीं कमी करिती दीप, शशांक, तारा,
नाशी प्रकाश अवघ्याहि तमा जयाचा
ऐसा जगीं, समज एकच भानु साचा ॥ १ ॥

( अन्योक्तिकलाप. )

दिशा प्रकाशित झाल्या. नक्षत्रांचा लोप होत चालला. पक्षी गायन करूं लागले. मंडळींचीं स्नानें एकामागून एक होऊं लागलीं. आभाळ पांढरें फडफाटित झालें. मंडपांत सडासारवण पडलें. वाद्यें वाजूं लागलीं.

सूर्याचे आरक्त किरण मंडपांत पसरले. उपाध्ये स्नान करून आले. त्यांनीं मंडपस्थापना[1] व देवक[2] प्रतिष्ठा करण्याकरितां शिवरामभाऊ, व वामनराव यांस स्नान करावयास सांगितलें. नंतर त्यांस लागणारें साहित्य कोठींतून मागून घेऊन वैदिक कर्मास सुरुवात केली. ( याची माहिती साहित्यपत्रकांत पहावी. )

वैदिककर्म आटोपल्यावर आहेर झाला. आहेर म्हणजे पागोटीं, शालजोडया, लुगडीं, खण असा पोषाख आप्त सोयरे वगैरे मंडळी देतात. प्रथम घरचा आहेर झाला. नंतर सोयरेधायरे व मित्रमंडळी यांजकडून झाला. ( कोणाकडून काय आलें तें टिपून ठेवावें. )

वैदिककर्म आटोपल्यावर बोलाविलेल्या मंडळीसह भोजन झालें. त्याचप्रमाणें स्त्रियांचें भोजन झाल्यावर लग्नाचें पाचारण करण्याची तयारी चालली.

उपाध्ये.–( बाबासाहेबांस. ) दोन वाजून गेले. आतां पाचारणास निघालें पाहिजे. पुढें रात्र होईल.

बाबा.–मला असें वाटतें कीं, दोन्हीं पाचारणें एकत्र करावीं.

उपा.–हो हो तसेंच करावें. मी पुणेकरांकडे जाऊन त्यांजकडील मंडळीस घेऊन येतों.

बाबा.–अहो, अगोदर घरांत जाऊन घाई करा आणि नंतर त्यांजकडे जा.

उपाध्ये.–( घरांत जाऊन बाईसाहेबांस. )अहो पाचारण करण्यास मुहूर्त-

---

१ मंडपस्थापनेची मुहूर्त वेळ मंगलाच्या अगोदर दिवशी करावी·

२ कुळस्वामिच्या प्रतिमा घरीं असल्यास सुपाऱ्या मांडितात. कोठें कोठें देवक मांडावयाचें त्या ठिकाणीं भिंतीस चुनो लावून चित्रें काढितात.

बरोबर कोणास पाठवितां चला निघा लवकर. सर्व गांव फिरावयाचा आहे.

बाई.–तुमची घाईच फार. प्रत्येक गोष्टींत तुमची आपली घांदल आहेच.

उपाध्ये.–अहो, अशी जर आह्मी घाई न करूं तर चेंगट बायकांचें कधींहीं लवकर आटोपणार नाहीं.

बाई.–बायका चेंगट, बायका चेंगट, हा टपका आह्मां स्त्रियांस जन्मापासून लागला आहे. काय, आह्मीं चेंगट आणि पुरुष मात्र चपळ ना?

उपा.–अहो, बायकांस लुगडीं नेसावयास आणि कुंकूं लाऊन अलंकार घालवयासच फार वेळ लागतो, त्यास त्यांचा कांहीं चेंगटपणा नाहीं. आमचे पुरुषांचे कसें, अंगरखा घालून पागोटें चढविलें कीं, पडले बाहेर. चला, कोणास पाठवितां त्यांस तयार होण्यास सांगा? मी पुणेकरांकडे जातों. ( असें ह्मणून जातात. )

बाई.–( काशीबाईस व दुसऱ्या पांचजणींस ) तुह्मी वेणीफणी व अलंकार घालून तयार व्हा. पाचारणास जावयाचें आहे.

ह्याप्रमाणें बाबासाहेब कांहीं मंडळीस पोषाख करून सिद्ध होण्यास सांगतात. स्त्रिया व पुरुषमंडळी याप्रमाणें तयार होत आहेत इतक्यांत उपाध्ये पुणेकरांकडील कांहीं मंडळीस घेऊन आले. नंतर दोन्ही पक्षांकडील स्त्रिया व पुरुष एकत्र होऊन वाजत गाजत उपाध्यासह पाचारण्यास निघाले.

सूर्य अस्तास जाऊं लागला. शहरांतील सर्व रस्ते मनुष्यांच्या व गाड्यांच्या जाण्या येण्यामुळें भरून गेले. ठिकठिकाणच्या रमणीय बागांतून कारंजीं उंचउंच उडत होतीं. त्यांचे तुषार जवळील गुलाब, बटमोगरा, जाई, जूई, चमेली, वगैरे फुललेल्या ताटव्यांवर पडून ते टवटवीत दिसत होते. माळी हातांत झारी घेऊन झाडांस पाणी घालीत होते. पक्षांचा किलकिलाट चाळला होता. पाचेसारखे हिरवे गार राघू चिव्चिव् करीत एका वृक्षावरून दुसऱ्यावर व दुसऱ्यावरून तिसऱ्यावर भराभर उडत होते. वारा झुळूझुळू वाहत होता. त्यामुळें झाडांचीं पानें फड् फड् वाजत होतीं. सांयकाळीं उमलणाऱ्या बटमोगरा, मोतिया, वगैरे फुलांचा घमघमाट सुटला होता. अशी शोभा अवलोकन करीत प्रत्येक घरी आमंत्रण देत चालले.

पाचारणाचे वेळीं उपाध्ये खालीं लिहिल्याप्रमाणें बोलत व प्रत्येक घरांतील यजमानाच्या हातावर कुंकुममिश्रित अक्षता देत असत.

---

१ मतबंधाचें आमंत्रण याच प्रमाणें करण्याची चाल आहे.

"वामनराव पोतनीस यांची कन्या व सिताराम आण्णा वकील यांचा पुत्र, यांचा, उद्यीक गोरज, व आपासाहेब पुणेकर यांची कन्या व शिवरामभाऊ पोतनीस यांचा पुत्र, यांचा उद्यीक रात्रौ २ घटकेचा, याप्रमाणें विवाह योजिले आहेत; आपण सहकुटुंब सहपरिवार येऊन कार्यसिद्धि करावी."

तसेंच स्त्रिया घरांत जाऊन घरांतील स्त्रियांस कुंकूं लाऊन ह्मणतात"–उद्यां एक गोरज पोतनिसांच्या वाड्यांत, व एक रात्रीं ७ वाजतां मामलेदारांच्या वाड्यांत अशीं दोन लग्नें आहेत, तर आपण सर्वांस घेऊन हळदकुंकुवास यावें."

वर सांगितल्याप्रमाणें पाचारणास उपाध्ये, स्त्रिया आणि पुरुष गेल्या नंतर,

बाबासा०–( बाईसाहेबांस. ) आतां तुह्मी वाग्निश्चयाची तयारी करा. हा मुहूर्त फार महत्वाचा आहे. ह्यावरील [1]वरणी चांगली भरली पाहिजे.

बाईसाहे०–वरणी चांगली असलीच पाहिजे. नाहीं तर मुलीकडील ह्मणतात कीं "[2]जशी तुमची वरणी तशी आमची करणी." असें लोकांनीं आपल्याला बोलूं नये. ह्मणून ती चांगली भरण्याकडे लक्ष दिलें पाहिजे.

बाबा०–तुमच्या [3]विहिणबाईंस हें काम सांगा. त्यांस पुष्कळ चांगली माहिती आहे.

बाई०–त्यांस कोठींत बसवून त्यांच्या सांगण्याप्रमाणें सर्व तयारी करायास नारायणास सांगतें.

बाबा०– ( शिवरामभाऊंस. ) मुलीचे अलंकार ताटांत भरून ठेवा व सोनारास बोलाऊन आणण्यास सखारामास पाठवा.

बाई०–परवणावळीच्या वेळेस, सुनमुख पहाण्याच्या वेळेस आणि वरातीच्या वेळेस मुलीस देण्याकरितां कोणते तीन अलंकार ठेवावे?

---

१ वरणी म्हणजे मुलाकडून मुलीकडे सर्व शिधा द्यावा लागतो. त्यांतील सामान येणें-प्रमाणें:–तांदूळ. गहूं. तुरीची डाळ. हरभऱ्याची डाळ. चारकूट. कणीक. गूळ. साखर. नारळ. लोण-च्याच्या वाट्या. तूप. बदाम. वेलची. खडीसाखर. खारीक. पिस्ते. बेदाणा. कुंकू. गुलाल. हळकुंडें. फळफळावळ. असें सामान असतें. हें सामान आपल्या सामर्थ्याप्रमाणें असावें. श्रीमंताकडे कीं ज्यांनीं १५०० रुपये हुंडा दिला आहे, त्यांनीं तांदूळ मण, गहूं मण, यामानानें सर्व सामान द्यावें. मध्यम प्रतीच्या लोकांनीं तांदूळ १० आच्छेरांच्या मानानें सर्व सामान द्यावें. दक्षिण प्रांतांतील लोकांपेक्षां वऱ्हाडाकडील लोकांच्या वरण्या फार चांगल्या असतात. म्हणजे त्यांचें सामान पुष्कळ असतें.

२ ह्या म्हणीचा अर्थ असा आहे कीं, ज्याप्रमाणें मुलाकडून वरणींत सामान कमजास्त असेल त्याप्रमाणें आह्मी मुलास करणी करूं, असें मुलीकडील सर्वांचें म्हणणें असतें. कधीं कधीं वरणींतील सामान कमजास्त असल्या कारणानें परस्परांत विघ्न पडण्याचा संभव असतो. हा प्रकार बायकांच्या अज्ञानपणामुळें होतो. ह्यांत हजारों रुपये खर्च होतात. त्यांत वराहीत ह्यावाकडे पाहणें योग्य नाहीं ह्मणून वरणी चांगली असावी. ३ शिवरामभाऊंची सासू.

बाबा०—परतनावळीस काप, सुनमुख पहाण्याकरितां मोत्यांचें पेंडें व वरातीकरितां नथ मोठी, असे तीन अलंकार ठेवा.

बाग्निश्चयाचें सामान.

ऊन्ह पाणी, तस्त, रुमाल, चौरंग. हळदकुंकवाचें व ओटीचें सामान. [१]अखंड चोळी व मणी. व ओटीचें सामान. मुलीचे अलंकार. [२]वगैरे. करवलीस अलंकार साडी, व खण. सासिविडे वांटण्याकरितां सगळीं हळकुंडें व सुपाऱ्या. व्याह्यांस देण्याचा पोषाख:—पागोटें, शालजोडी. मुलीच्या आईस—शालू, खण, शालजोडी. इतर स्त्रियांच्या ओट्या भरावयास नारळ, तांदूळ.

टीपेंत सांगितल्याप्रमाणें आपल्या सामर्थ्यानुरूप वरणीचें सामान टोपल्यांत, शिपतरांत व परातींत भरून ठेवावें.

वरपूजेच्या वेळेस मुलीकडून जें रुखवत आलेलें असतें तें सर्व तसेंच द्यावें.

बडोद्याकडील लोकांत या मुहूर्तावर दुसरें एक रुखवत नेण्याचा प्रघात आहे. त्या रुखवताचें साहित्य:—

बुंदीचे लाडू, मुगदळ, मोतिचूर, बेसन, दळया, जिलिब्या, घिवर, मांडे, अनारसे, दोवफेण्या, खाजे, साधे व केशरी, तिळाचे लाडू, मुईमुगाचे लाडू, लाह्यांचे लाडू, डाळ्यांचे लाडू, पिस्ते व बदामाचे मिश्रित लाडू, चारोळ्यांचे लाडू, खसखसीचे लाडू, खारका खोबऱ्याचे लाडू.

( हे पदार्थ फार मोठे करण्याची चाल आहे. एक लाडू दोन कच्चे शेरांचा असतो. हे पदार्थ आपल्या सामर्थ्याप्रमाणें लहान मोठे करून शिपतरांत अथवा परातींत भरून द्यावे. ही चाल दक्षिण प्रांतीं नाहीं. )

अशी तयारी चालली आहे इतक्यांत नऊ वाजून गेले. पाचारणास गेलेली मंडळी परत आली. नंतर वाग्निश्चय घेऊन जाण्याकरितां स्त्रिया अलंकार घालून, उंची वस्त्रें परिधान करून सिद्ध झाल्या. पुरुषमंडळी पोषाख करून निघाली. वाद्यें वाजूं लागलीं. हिलालांचा प्रकाश पडला. बरोबर न्यावयाचें सामान गड्यांजवळ दिलें. नंतर सर्व पुणेकरांकडे जावयास निघाले.

---

१ अखंड चोळी— ही चोळी अखंड खणाची असते. व मणी—काळ्या पोतींत सोन्याचा एक मणी ओंवून सकसरी करावी. ही चोळी नवऱ्यामुलाकडून थोरीची शिवविताव. तसेंच मणी, मंगळसूत्र व मोत्यांची एकसरी, या तीन गळसऱ्यांत मुलाकडून पांच दाणे ओंवावितात.

२ वर सांगितलेल्या तीन अलंकारांशिवाय बाकीचे सर्व अलंकार:— करंडी, कणी, भांगटिकी, वेणी, बिरोबाचांदीव. एका करंड्यांत कुंकूं व एकांत शिंदूर पाठवावा.

रात्रीचा समय असल्यामुळें रस्त्यावर मनुष्याची गर्दी नव्हती. जरि ठिक ठिकाणीं कंदे होते तरि मधून मधून थोडथोडा अंधःकार पडला होता. चंद्राच्या प्रभा फांकल्या होत्या. दिलालांचा प्रकाश चोहोंकडे सारखा पडला होता. वाजांतून मधुर स्वर निघत होते. त्यांत वाजंत्र्याचे मंजुळ स्वर मिळाल्यामुळें वेगवेगळ्या प्रकारचे स्वर एकत्र होऊन कानांस गोड लागत, आणि त्यापासून एकाद्या चिंतातुर मनुष्यास झालेल्या दुःखाचा परिहार होऊन तो आनंदित होत असे. स्त्रियांच्या पायांतील पैंजण व तोरड्या खणाखणा वाजत त्यामुळें त्यांना पाय उचलण्यास व टाकण्यास एका प्रकारचा आनंद वाटत असे, आणि त्यामुळें सहजवृत्त्या ते जोरानें पडत होते. पुरुष मंडळी हातांत हात घालून गोष्टी बोलत चालली होती.

अशा थाटानें चालतां चालतां मंडळी पुणेकरांच्या मंडपीं पोंचली. स्त्रिया घरांत गेल्या. व मंडळी मंडपांत गेली. परस्पर व्याह्यांच्या भेटी झाल्यावर सर्व खालीं बसतांच कलावंतीण नाचूं लागली. तबला घुमूं लागला व सारंगी कुरकुरूं लागली.

व्याह्यांच्या भेटी झाल्यावर मध्यस्थानीं दोन चौरंग मांडून एकावर करवलीस व दुसऱ्यावर मुलीस बसविलें. नंतर उपाध्यानीं शिवरामभाऊंकडून गणपति व शशिपूजन करविलें. त्यानंतर प्रथम करवलीचे पाय धुऊन तिला हळदकुंकूं देऊन साडी व खण दिला, आणि ओटी भरिली. करवलीची पूजा झाल्यावर मुलीचे पाय धुऊन तिला मुलाच्या आईनें हळदकुंकूं दिलें. शिवरामभाऊनीं वस्त्रालंकाराचें ताट तिच्या हातीं दिलें. मुलगी अलंकार घालण्याकरितां घरांत गेली. ती घरांत गेल्यावर प्रथम तिची वेणी घालून सोनाराकडून[1] अलंकार चढविण्याचें व वस्त्रें परिधान करविण्याचें काम चाललें.

मुलगी गेल्यावर शिवरामभाऊ व आपासाहेब समोरासमोर बसले. नंतर परस्परांनीं एकमेकांची पूजा केली. नंतर आबासाहेब यांनीं आपल्या आप्तसम्यांस विचारिलें कीं, "हे अमुक ग्रहस्थ ( शिवरामभाऊ पोतनीस ) मुलगी मागावयास आले आहेत, त्यांस मुलगी द्यावयाची?" ते सर्व सांगतात "फार उत्तम आहे द्यावी." असा त्यांचा रुकार घेतल्यावर मुलगी देण्याची कबूल करून सोडिगांठ[2] बांधिल्यानंतर उपाध्ये परस्परांकडून खालीं लिहिल्याप्रमाणें बोलवितात.

"अमुक गोत्राय, अमुक गोत्रोत्पन्नाय, अमुक शर्मणः प्रपौत्राय, अमुक शर्मणः

---

१ मुलीला अलंकार चढविण्याकरितां मुलाकडील सोनार आलेला असतो त्यास वधूपक्षाकडून पागोटें, शेला वगैरे पोषाख मिळतो. २ सोडिगांठ–परस्पर व्याही एकमेकांच्या पदरास गांठी बांधितात. त्यांत हळकुंडें असतात.

पौत्राय, अमुक शर्मणः पुत्राय, अमुक शर्मणे कन्यार्थिने श्रीधरस्वरूपिणे वराय, अमुक शर्मणः प्रपौत्रीं, अमुक शर्मणः पौत्रीं, अमुक शर्मणः पुत्रीं, अमुक नाम्नीं कन्यां वरार्थिनीं ज्योतिर्विदादिष्टे मुहूर्ते दास्ये वाचा संप्रददे " असा गोत्रोच्चार झाल्यावर मुलीचा बाप ह्मणतो.—

वाचा दत्ता मया कन्या पुत्रार्थे स्वीकृता त्वया ।
कन्यावलोकनविधौ निश्चितस्त्वं सुखी भव ॥

मुलाचा बाप ह्मणतो.—

वाचा दत्ता त्वया कन्या पुत्रार्थं स्वीकृता मया ।
वरावलोकनविधौ निश्चितस्त्वं सुखी भव ॥

पुनः मुलीचा बाप.—

अव्यंगे पतिते क्लीबे दशदोषविवर्जिते ।
इमां कन्यां प्रदास्यामि देवाग्निद्विजसन्निधौ ॥

याप्रमाणें मुलगी देण्याची कबूल केल्यानंतर परस्परांनीं उपाध्यांची पूजा करून त्यांस पोषाख दिले. त्याप्रमाणें परस्पर व्याह्यांनीं एकमेकांस पोषाख दिले. मुलगी अलंकार घालून वस्त्रें परिधान करून आल्यावर तिची ओटी भरिली. नंतर सर्व मंडळीस साखिविडे वांटून पानसुपारी, अत्तरगुलाब, व हारगजरे वांटले.

घरांत मुलीच्या आईला चौरंगावर बसवून तिला हळदकुंकूं देऊन, वरणीचें सामान हातीं लाऊन, लुगडें व खण देऊन ओटी भरिली. नंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकूं देऊन, साखिविडे वांटून ओटया भरिल्या. याप्रमाणें सर्व आटोपल्यावर मंडळी घरीं आली.

सर्व मंडळी घरीं येऊन पोंचल्यावर दुसऱ्या दिवसाची कांहीं तयारी होणें होती ती पुरी करण्याकडे कांहीं मंडळी लागली. बाबासाहेब मंडपांत बहुलें घालण्याचें काम चाललें होतें तेथें जाऊन तें लांब रुंद बरोबर झालें किंवा नाहीं हें पहात होते. अशीच सर्व मंडळी कामांत गुंतली होती.

याप्रमाणें तिन्ही पक्षाकडील मुहूर्त वगैरे लग्नापूर्वींचीं कृत्यें आटोपलीं. आतां उद्देक आमच्या वाचकांस दोन लग्नमंडपांत फिरावयाचें आहे ह्मणून थोडीशी विश्रांती घेऊं.

१ साखिविडे—पानें, सगळ्या सुपाऱ्या व हळकुंडें यांस साखिविडे ह्मणतात. हे विडे उभयपक्षीं वाटावे लागतात. २ बहुलें वधूच्या हातानें तीन हात लांब व चार हात रुंद आणि एक हात उंच पूर्वाभिमुख असावें. सर्वत्रांनीं बहुलें करण्याची चाल नाहीं.

# विवाहविधि.

देखूनी उदया तुझ्या द्विजकुळें गाती अती हर्षुनी, ॥
शार्दूलादिक सर्व दुष्ट दडती गिर्यंतरीं जाउनी, ॥
देशी ताप परी असा वरिवरी पेशीं नमीं, भास्करा, ॥
अत्युग्रीं परि घोरही विघडतो हा बोल आहे खरा, ॥

अन्योक्तिकलाप.

पंच पंच उःषकाल झाला. कावळे काव काव करूं लागले. पंडी आंगास झोंबूं लागली. पक्षांचीं मंजुळ गायनें सुरू झालीं. द्विजकुळें मोठ्या आनंदानें गायन करूं लागलीं. लालप्रभा अवलोकन करून व्याघ्र इत्यादि क्रूर प्राणी गिरिकदरांत लपूं लागले.

वासरमणीची तांबुस प्रभा पसरत चालली. हौदावर स्नानास मंडळीची एकच गर्दी होऊन गेली. बाबासाहेब स्नान करून नित्यक्रम सारून मंडपांत गेले. बाईसाहेब स्नानकरून नित्यनेम उरकून सर्वांस स्नान करण्यास सांगत होत्या. सर्व स्त्रियांचीं स्नानें झाल्यावर उडद्यामुहूर्त, व तेलवण करण्याची आणि उडीद-ळद नेण्याची तयारी चालली ती:—

### उडद्या मुहूर्त.

ज्या ठिकाणीं देवकप्रतिष्ठा केली होती तेथें दगडी जातें मांडिलें. त्यास आम्र-पल्लव बांधून पांच सुवासिनी त्या सभोंवती बसल्या. नंतर आत्मारामास पागोटें घालून, मुंडावळ बांधून चौरंगावर बसविलें. आणि त्यांनीं आत्मारामासहत्या जात्यांत उडीद दळले. ( ह्या कृत्यास उडद्यामुहूर्त म्हणतात. याप्रमाणें चंद्राबाईबद्दलही उडद्या मुहूर्त केला. )

### तेलवण.

देवकाजवळ चौपाट काढून त्यावर चौरंग मांडिला, [2]तेलणीस कुंच्यें सूत व आम्रपल्लव बांधून त्यांत तिळाचें तेल घातलें. एका वाटींत तेलांत हळद कालवून ठेविली.

ह्याप्रमाणें तयारी झाल्यावर आत्मारामास पागोटें घालून, मुंडावळी बांधून चौरंगावर बसविलें. नंतर प्रथम त्याचे आईनें एका हातांत चाकू व दुसऱ्या हातांत

१ हे उडीद दळून जें पीठ पडतें तें पोरकुटांत टाकावें. पंडित गणपतीची प्रार्थना सूचक मंगलदायक गाणीं म्हणतात. २ याच कडे म्हणतात.

आम्रपल्लव घेऊन, चाकूचें पात व आम्रपल्लव वळणींत बुडवून त्यांनीं प्रथम मुला-च्या पायास, नंतर गुडघ्यास, नंतर खांद्यास आणि सरशेवटीं कपाळास तेल लाविलें. याप्रमाणें पांच वेळ तेल लाविल्यानंतर दोन्ही हातांत कालविलेली हळद घेऊन वर सांगितलेल्या सर्व भागांस अनुक्रमें पांच वेळां लाविली. याप्रमाणें सर्व स्त्रियांनीं केलें. ( वर सांगितल्या भागांस हळद लावितात. तेव्हां त्या भागांवर हळदीचे गोळे जमतात. ते सर्व काढून दुसऱ्या वाटींत ठेवावे, याकल्यास तेलवण असें ह्मणतात. ह्याप्रमाणें चंद्राबाईचें तेलवण केलें. )

## उष्टीहळद.

वर जे दोन मुहूर्त सांगितले ते झाल्यानंतर हा मुहूर्त प्रथम मुलीकडून मुलास येतो. नंतर मुलाकडून मुलीस जातो. हा मुहूर्त वर सांगितलेल्या दोन मुहूर्तांपेक्षां महत्वाचा आहे. यांचा प्रकार येणें प्रमाणें:—

वर सांगितलेले दोन मुहूर्त झाल्यावर वकीलांकडे उष्टयाहळदीचा मुहूर्त नेण्याची तयारी चालली तीः—

## मुहूर्तांचें सामान.

मुलीचें तेलवण करीत असतां जी हळद काढून ठेवावी असें वर सांगितलें आहे, ती हळद, ओट्या भरण्यास तांदूळ, नारळ; मुलास पागोटें, शेला; मुलीच्या आईस लुगडें खण; व हळदकुंकुवाचें साहित्य.

हें सामान घेऊन पांच सुवाशिनी वकीलांच्या मंडपीं वाजत गाजत गेल्या.

तेथें गेल्यानंतर उमऱ्यामध्यें मोठी परात उपडी घालून त्यावर सकलाद घातली· नंतर मुलास पागोटें घालून, मुंडावळी बांधून त्यावर बसविलें. मुलाच्या आईसही तेथें बसविलें. प्रथम तिला हळदकुंकू देऊन ओटी भरून लुगडें व खण दिला. नंतर मुलास कुंकू लाऊन दिवा ओंवाळून तेलवणांत सांगितल्याप्रमाणें तेल व हळद त्या त्या भागांस लाविली. ह्याप्रमाणें पांच सुवाशिनींनीं केलें. नंतर मुलास पागोटें व शेला दिला. नंतर इतर स्त्रियांस हळदकुंकू देऊन त्यांच्या ओट्या भरल्या. ह्याप्रमाणें सर्व आटोपल्यावर सर्व स्त्रिया वाजत गाजत घरीं परत आल्या.

घरीं परत आल्यावर कांहीं वेळानें वकिलांकडून चंद्राबाईला व पुणेकरांकडून आत्मारामाला उष्टयाहळदीचे मुहूर्त आले. ते आटोपल्यानंतर बाबासाहेबांकडून पुणेकरांकडे वधूला उष्टीहळद व मेढीमुहूर्त नेण्याची तयारी चालली तीः—

---

१ त्या परातीच्या चार बाजूस लोखंडाच्या चार वाट्यांत तेल व वाती घालून त्या लावून ठेवितात.

( हे दोन मुहूर्त वेगळे आहेत. परंतु एकच वेळीं करावे. यांतील मेढीमुहूर्त फक्त मुलाकडून मुलीकडे नेतात. )

### उष्ट्याहळदीचें सामान.

मुलाचें तेलवण करीत असतां जी हळद ठेवितात ती.

मुलीची ओटी भरावयासः—गहूं, नारळ, बदामें ५, खारका ५, आक्रोडें ५. मुलीस—साडी व खण. मुलीच्या आईस—लुगडें व खण. मुलीच्या आईची ओटी भरावयासः—तांदूळ, नारळ, हळदकुंकवाचें साहित्य.

### मेढीमुहूर्ताचें सामान.

ह्या मुहूर्तास वरील मुहूर्तांत सांगितलें त्याचप्रमाणें सामान घ्यावें. मात्र हळद घेऊं नये.

वर सांगितल्याप्रमाणें दोन्ही मुहूर्ताचें सामान घेऊन काशीबाई व दुसऱ्या कांहीं स्त्रिया पुणेकरांच्या मंडपीं गेल्या. तेथें गेल्यावर, वकीलांकडे उष्ट्याहळदीचा मुहूर्त नेऊन तेथें जसा प्रकार केला ( तो मागें सांगितला आहे ) त्याप्रमाणें हा मुहूर्त केला.

पुढें देवप्रतिष्ठा करते समयीं उपाध्ये मंडपांत जी मुहूर्तमेढ बांधितात त्या मेढीजवळ दोन चौरंग मांडून, त्यांवर मश्रु घालून, मुलीला आणि तिचे आईला बसविलें. नंतर दोघींला ( प्रथम आईला ) हळदकुंकू देऊन, ओट्या भरून लुगडीं आणि खण दिले. या ( कृत्यास मेढीमुहूर्त ह्मणतात. हा मेढीजवळ करतात ह्मणून याचें असें नांव पडलें असावें. )

याप्रमाणें परस्परांकडून मुहूर्त नेण्या आणण्यांत अर्धा दिवस निघून गेला.

इकडे बाबासाहेब स्नान करून नित्यकर्म सारून पोषाख करून नानासाहेबांकडे गेले. तेथून दोघे गांवांत मोठमोठे सावकार व सरकारी अधिकारी वगैरे मंडळीस लग्नाचें आमंत्रण करावयास गेले.

चंद्राबाईचें लग्न गोरज व आत्मारामाचें रात्रौ ८ घटकेचें अशीं दोन लग्नें आज व्हावयाचीं हें वाचकांच्या लक्षांत असेलच.

मुलाचें लग्न असलें म्हणजे त्याबद्दल मुलाकडे लग्नाचे दिवशीं जास्त बखेडा नसतो, त्याप्रमाणें आत्मारामाच्या लग्नाबद्दल कांहीं एक नव्हता; यामुळें त्याबद्दलची माहिती न देतां, आतां आपण चंद्राबाईच्या लग्नाकडे वळूं.

मंडळी वरीच जमली होती. कोणी मसरदाण्यांत तऱ्हेतऱ्हेचीं सुवासिक

असतें व कोणी गुलाबदान्यांत गुलाबपाणी भरीत होते. कोणी वाट्यांत लवंग वेलची व चौफुल्यांत वेलदोडे, जायपत्री, कातगोळ्या आणि उत्तम जर्दा भरीत होते. तसेच कोणी हारतुऱ्यांनीं तबकें व कोणी नारळांनीं बुरडी टोपल्या भरीत होते.

इकडे मंडपांत बहुल्यासमोर रंगाकाढण्याचें काम चाऊलें होतें. त्यांत एकीकडे तांबडे, मधून मधून हिरवे, दुसऱ्या पाकळींत निळे, त्याच्याखालीं पिंवळे, अशा निरनिराळ्या रंगांचे तांदूळ कमळांत भरून त्या सभोंवती हरभऱ्याची डाळ अशा चतुराइनें लाविली होती कीं तें खरोखर कमळच उमललें आहे, असें दिसे, अशा ह्या कुशळ कामांत कोणी गुंतले होते. कोणी बैठकी घालून कोठें जाजमें, कोठें गालीचे पसरून, कोठें तक्के व कोठें लोडें ठेवीत होते. अशी जिकडे तिकडे मंडळी कामांत गुंतली होती.

इकडे बाईसाहेब कोठींत बसून रुखवत[1] तयार करीत होत्या, त्याचें सामानः—

**भक्षणीय पदार्थ.**

आंबे, नारिंगें, साखरलिंबें, अंजिर, अननस, फणस, द्राक्षें, केळीं, सुकेळीं, पेरू, उसाचा भारा, दालिंबें, रामफळें, सफरचंद, ( जीं फळें मिळूं शकतील तीं. ) बेदाणा, बदामांचे गोळे, चारोळ्या, पिस्ते, अक्रोड, खारका, खजूर, खडीसाखर, मनुका, बरफी, पेढे, बत्तासे, मुरांबा, गुलकंद, मुरावळा, फणसपोळी, मोहोनभोग, आम्ररसाच्या पोळ्या, निरनिराळ्या प्रकारचे हलवे ( तिळगुळ. ) ( जितके पदार्थ मिळतील ते. )

बुंदीचे लाडू. मुगदळ. मोतिचूर, बेसन. दळया जिलिब्या. घिवर. मांडे. अनरसे. शेवया. खाजें साधें व केशरी. तिळाचे लाडू. भुईमुगाचे लाडू. लाह्याचे लाडू. डाळ्याचे लाडू.[2] पिस्ते बदामांचे लाडू. चारोळ्यांचे लाडू. खसखसीचे लाडू.

**इतर सामान.**

लाकडी व कागदी चौरंग. चौरंगावर घालण्यास मखमल. आरसा. गंधास तबकडी अथवा वाटी. गंध लावावयास सांखळी. ताट. वाटी चांदीची. गंधाचें खोड. फणी.

फराळाचें सामान ठेवण्यास.—पराती, तबकें, तस्त पाय धुण्यास. तोंड पुसण्यास रुमाल रेशमी.

---

१ यास कायस्थप्रभू जातींत फराळ म्हणतात.

२ हे दळवताचे लाडू याबेळीं नेत नाहींत. लग्नसमारंभ आटोपल्यावर नेण्याची कित्येक ठिकाणीं चाल आहे. ब्राह्मण जातींत सोजी, भाजी, भजी. वगैरे पदार्थ नेत असतात.

मखमालीचा, अबदागिरी, छत्री, चवरी, पायमोजा, मुलास पोषाखः—अंगा पायजमा, पागोटें, शालजोडी, अथवा दुपेटा.

मुलास आणावयास गेल्यावर तेथें दुसरें लागणारें सामान.—उष्णपाणी, वधोद- शमुणी विडा, मुलास घालावयास फुलांचे हार, गजरे, तुरे, हळदकुंकूवाचें साहित्य. ओटीस नारळ व तांदूळ. मुलाच्या हातांत द्यावयास मर्व लावलेला नारळ. व रात्रीचा समय असल्यास दारूकाम. ( हें वर लिहिलेलें एकंदर सामान सामर्थ्यानुरूप कमजास्त घ्यावें. ) याप्रमाणें सर्व सामान ताटांत व परातींत भरून ठेविलें.

सायंकाळ होत चालला, मंडपांत व माडीवरील दिवाणखान्यांत बैठकी पडल्या. बहुल्या समोरील कणा जसा काळ्या मखमालीच्या कापडावर निरनिराळ्या रंगांच्या रेशमांनीं कशिदा काढावा, तसा त्या काळ्या भोर जमिनीवर शोभे लागला. त्यावरील लखलखणाऱ्या सुपाऱ्या त्यास अधिकच शोभा देत होत्या. बहुल्या सभोंवती अहिरी उभी केली होती. ती तांब्याच्या भांड्यांची असल्यामुळें चकाकत होती. बहुल्यावर चित्रविचित्र रंगांची रांगोळी काढिली होती.

इकडे चौकांत अलंकार व वस्त्रांनीं शृंगारिलेले तेल्या, अबलक, अरदा व पांढऱ्या रंगांचे अश्व झुलत होते. त्या सर्वांत एक शामवर्ण चांदीचे अलंकार व भरजरीचे करडे घालून शृंगारिला होता. चौघड्यांचे जोड गाड्यांवर चढविले होते. ताशे व वाजंत्रीवाले आपआपलीं वाद्यें सज्ज करून उभे होते.

लग्नघटकेस तीन घटकेचा अवकाश असतां चंद्राबाईला लग्नचुडा भरावयास कासार आला. त्यानें लेंमचुडा[2] भरला. नंतर तिला मंगळस्नान घालून पिंवळ्या रंगाची अष्टपुत्री नेसवून पिंवळ्या तापत्याची चोळी घातली. रुईच्या फुलांची माळ तिच्या हातांत दिली. नंतर देवकाजवळ एका पाटावर पार्वती टेविली. त्या समोरील दुसऱ्या पाटावर चंद्राबाईला बसविलें. तिच्या हातांत कुंकुममिश्रित अक्षता दिल्या. ती त्या पार्वतीवर वाहूं लागली. ( या वेळेस मुलगी ' गौरी गौरी सौभाग्य दें; दारीं वर येईल त्याला आयुष्य दें. ' असें म्हणून अक्षता वाहतें. या पूजेस गौरीहर म्हणतात,

---

१ यास मखा म्हणतात. बहुतकरून हा मखा कुंभारांकडील रंगविलेल्या मडक्यांच्या असतात. या बहुल्याच्या चार बाजूस कोपऱ्याला एकावर एक अशा पांच ठेवितात. त्या मडक्यांत हळकुंड, सुपारी, खारीक, खोबरें, बदाम वगैरे पदार्थ घालून कळ्या करितात. श्रीमंत लोक या तांब्याचे हांडे, घागरी, वरेळी व तांब्ये यांच्या करितात.

२ हिरव्या रंगाच्या कांच्या बांगड्या भरल्याची चाल आहे.

**वरप्रस्थान.**

या प्रमाणें मुलीला बांगड्या भरून व स्नान घालून बसवीत आहेत, तों इकडे मुलास आणावयास निघण्याची तयारी झाली. पुरुषमंडळी पोषाख करून मंडपांत जमली. स्त्रिया अलंकार घालून उंची वस्त्रें परिधान करून सिद्ध झाल्या. न्यावयाचें सर्व सामान ब्राह्मणांच्या व गड्यांचे डोक्यांवर दिलें. चौघडे झडूं लागले. ताशे खणाणूं लागले. वाद्यांचे मधुर स्वर निघाले. शृंगारिलेले अश्व पुढें चालूं लागले. त्यांचे पाठीमागें वाद्यें वाजविणारे निघाले. आणि नंतर स्त्रिया व पुरुषमंडळी चालूं लागली. असा हा स्त्रीपुरुषांचा जमाव वाजत गाजत वकीलाच्या मंडपीं पोंचला. स्त्रिया घरांत गेल्या. पुरुष मंडळी मंडपांत बसली. घरांत बैठक घातली होती तेथें दोन चौरंग मांडून त्यांवर अश्रु घातले होते. एकावर मुलास व दुसऱ्यावर मुलाच्या आईला बसविलें. नंतर मुलीच्या आईनें दोघांचे पाय ऊन्ह पाण्यानें धुवून रुमालानें पुसले. मुलास गंध लावून त्याचें गळ्यांत फुलांचे हार घातले. नंतर मुलाच्या आईला व तिच्या मानकरिणी स्त्रियांस हळदकुंकू देऊन फुलांचे गजरे व हार दिले. व नारळांनीं ओट्या भरिल्या. रुखवताचीं पानें इतक्या अवकाशांत वाढून तयार होतीच, त्यावर वरपक्षाकडील मुली व नवरदेवाची स्नेही मंडळी वगैरे आपआपल्या माना प्रमाणें बसली. नंतर मुलीच्या आईनें नवरदेवा करितां मुद्दाम तयार केलेलें चांदीचें ताट, मुलाच्या पुढ्यांत ठेविलें. नंतर मंडळी फराळ करूं लागली. वराच्या मुखांत मुलीच्या आईनें कांहीं पदार्थ भरविले. मुलाचा फराळ होऊन मुखप्रक्षालन झाल्यावर त्यास मुलीच्या आईनें त्रयोदशगुणी विडा दिला. व बरोबर आणलेला पोषाख त्याच्या अंगावर घालून, मुंडावळ बांधून, गालबोटें लावून पायांत जोडा घालून तयार केला. त्याच्या हातांत वर्ख लाविलेला नारळ दिला. नंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकू देऊन त्यांच्या नारळांनीं ओट्या भरिल्या. इकडे मंडपांत सर्व पुरुष मंडळीस पानसुपारी, अत्तरगुलाब व हारगजरे दिले.

मुलास शृंगारिलेल्या श्यामवर्ण अश्वावर बसविलें. मुलाच्या मागें स्त्रिया कऱ्हा दिवा घेऊन चालूं लागल्या. मागाहून पुरुष मंडळी चालूं लागली.

त्या वेळीं वाद्यांचें स्वर फार मंजुळ निघत होते. शृंगारिलेले अश्व मोठ्या डौलानें चालले होते. त्यांच्या अंगावरील चांदीचे अलंकार सूर्याच्या पीतवर्ण किरणानें झळकत होते. ठिकठिकाणीं बगीचे होते. त्यांतून हजारों कारंजीं-

---

१ यास गुजराथेंत वरघोडा म्हणतात.

२ या वेळेस मुलगा नसतांत कांहीं नाणें टाकतो.

धुई धुई उडत होतीं. ते स्वच्छोदकाचे तुषार सूर्याच्या पिंवळ्या किरणानें मोत्यां सारखे दिसत होते. बगीच्यांत फुलझाडें फुललीं होतीं. त्यांजवरून सुगंध व शीतल वायु मंद मंद वाहत होता. वेळोवेळीं वाद्यांचे स्वर बदलत होते. ठिकठिकाणीं वरावरून नारळ उतरून टाकीत होते. बरोबर कोणी अबदागिरी व छत्री धरून चालले होते. त्यांवरील सुवर्णमय कळस रविकिरणानें झळकत होते. नक्षत्रमाळा उन्हामध्यें चकाकत होत्या. असा हा थाट पहाण्यास रस्त्यावर जागोजाग मनुष्यें जमलीं होतीं. आसपासच्या घरांतील स्त्रिया, मुली, वगैरे वर पहाण्यास घरांतून बाहेर येत. उपवर मुली त्या राजबिंड्या वरास पाहून मनांत असाच पति आपणास मिळावा अशी परमेश्वरा जवळ प्रार्थना करीत असतील. असो. अशा थाटानें हा सर्व आनंदी स्त्रीपुरुषांचा जमाव चालत होता. आतां आपण या मंडळीस अशा थाटानें चालत असतां मध्येंच सोडून लग्नमंडपाकडे वळूं.

वाड्यावरून जाणाऱ्या रस्त्यावर दुतर्फा ग्लासांचीं झाडें जशीं पेटलीं आहेत. मंडपांत हांड्या झुंबरांचा लखलखित प्रकाश पडला आहे. मंडळी जमूं लागली आहे. त्यांस बापूजी व्यवस्थेनें बसवीत होते. मृदंगावर थापा पडूं लागल्या. सारंगी कुरकुरूं लागली. माडीवरील दिवाणखान्यांत स्त्रिया येऊं लागल्या. मंडपाचे दारांत शकुन घेऊन शुद्राची स्त्री उभी होती. नवरा मुलगा तेथें आल्यावर तिनें घोड्याच्या पायांवर पाणी ओतिलें. नंतर मुलीची आई एका हातांत पिठाचा दिवा उजळलेला, व दुसऱ्या हातांत पिवळें वस्त्र गुंडाळलेली रवी घेऊन, मंडपाचे दारांत येऊन मुलास रवी दाखवून तिनें दिवा ओवाळिला. नंतर मुलाला घोड्यावरून खालीं उतरिलें. वामनराव पीतांबर नेसून, शालजोडी घेऊन, तेथें आले. त्यांनीं मुलाचा हात धरून त्याला बहुल्या जवळ नेलें. मुलाचा पोषाख उतरून त्यास पीतांबर नेसावयास दिला. व शालजोडी अंगावर दिली. नंतर मधुपर्क झाला,

१ इकडे पुणेकर यांजकडून मंडळी आत्मारामास नेण्याकरितां वर लिहिल्या प्रमाणें समारंभानें येऊन आत्मारामास घेऊन गेली. या लग्नास (आत्मारामाच्या.) रात्रौ ३ घटके पर्यंत अवकाश होता, तरी पण वकीलाकडील वर बाबासाहेबांचें मंडपांत येण्यापूर्वी पुणेकर आत्मारामास घेऊन गेले याचें कारण, शोध करितां वाचकां पुढें ठेवण्या सारिखें खरें कळून आलें नाहीं. परंतु फार दिवसांपासून, अशी रूढी चालत आली आहे कीं, वर एक्याच दिवशीं एकेच घरीं दोन कार्ये असलीं तर मुलीचें लग्न अगोदर लावावें व त्यावेळीं ज्या मुलाचें लग्न होणें असेल त्याला मंडपांत अथवा त्या घरांत ठेवूं नये.

२ मंडपाच्या सन्निध गांवचा वतनदार सामोरा येतो त्याला पागोटें किंवा कांहीं द्रव्य देण्याचा परिपाठ कोंकणांत आहे. ३ या स्त्रिया कुमारें व लण देतात.

( मधुपर्क म्हणजे जे कुणे जांवई असतील त्यांची पूजा करून त्यांस व त्यांच्या स्त्रियांस ( भावल्या मुलींस ) वस्त्रें देऊन गौरवितात. आणि नंतर नवीन होणाऱ्या जांवयाची पूजा करितात. व वस्त्रालंकार देतात. याची मा-हिती पत्रकांत पहा. )

या प्रमाणें मधुपर्क झाल्यावर उपाध्येबुवानीं घटका[1] मांडिली होती त्या ठिकाणीं शिवरामभाऊ व सितारामआण्णा यांजकडून पत्रिकापूजन करविलें.

लग्नघटकेस अर्ध्या तासाचा अवकाश असतां अष्टवर्ग[2] नेमिले. ते कायम झाल्यावर मुलास कण्यावर पश्चिमाभिमुख उभें केलें. अष्टवर्गांनीं अंतरपाट धरिलें. नंतर मुलीचा मामा मुलीस आणावयास गेला. मुलगी अद्याप गौरीची पूजा करीत होती. तिला कडेवर घेऊन आणून कण्यावर उभी केली. मुलाची आई मंगळसूत्र हातीं घेऊन मुलीच्या पाठीमागें उभी राहिली. याप्रमाणें वधुवरें कण्यावर उभीं राहिलीं. त्यानंतर ब्राह्मण मंगलाष्टकें म्हणूं लागले. चोहोंकडून वधुवरांच्या मस्तकांवर कुंकूमिश्रित अक्षता पडूं लागल्या. त्यावेळीं चोहोंकडे शांतता होती. मंगलाष्टकांचे लांब स्वर कानांस गोड लागत होते.

मधून मधून " शुभ लग्न सावधान " असे शब्द कानीं पडत होते. सर्वांचें लक्ष एकसारखें त्या वधुवरांकडे लागलें होतें. मंगलाष्टकें पुरीं होत आलीं. वाद्यें वाजविणारे अगदीं तयार झाले. परंतु चोहोंकडे शांतता होती.

अशीं सर्वांचीं मनें स्थिर असतां एकाएकीं " शुभ लग्न सावधान " असे शब्द ऐकूं आले—टाळ्या पिटल्या—अंतरपट उडविलें—मुलीच्या गळ्यांत मणी मंगळसूत्र बांधिलें—मुलीनें वराच्या गळ्यांत माळ घातली—वाद्यांचा एकच गजर झाला. नंतर त्या उभयतांस कण्यावर पाट मांडून त्यावर पूर्वाभिमुख व मुलीस

---

१ घटका मांडण्यास [illegible] काही [illegible] आहे, व तेच घटका [illegible] वधुवरांची [illegible] पत्रिकेस [illegible] उभयतांकडून सामर्थ्या प्रमाणें दक्षिणा [illegible] असते.

२ [illegible] वधुवरांकडील [illegible] कण्यादिव घेऊन उभ्या राह-तात व [illegible] करितात.

३ [illegible] ह्यांच्या मस्तकावर [illegible] ब्राह्मण [illegible] त्यावर उभे करून लग्न लावितात. वधुवरांस कुलदेवतेची नावें घेण्यास सांगण्याचा प्रघात आहे.

पश्चिमाभिमुख समोरा समोर सन्निध बसविलें.

वाचकहो, ह्या ठिकाणीं लग्न लागलें व आजपर्यंत आपण जो तिसरा भाग वाचीत आलां त्यांतील मुख्य जें कृत्य तें झालें.

'शुभ लग्न सावधान' असे शब्द व टाळ्या कानीं पडतांच बाजा वाजूं लागला, ताशे वणाणूं लागले व बंदुकींचे आवाज निघाले. तबल्यावर थापा पड-ल्या, सारंगींतून मंजूळ स्वर निघूं लागले व कलावंतिणींचे थाटमाट केलेले ताफे उभे राहून नाचूं लागले.

तो सायंकाळचा समय होता. गार वारा झुळझुळ वाहत होता. मंडळीनीं सर्व मंडप भरून गेला होता. चोहोंकडे हांड्या, झुंबरें व ग्लासांचा प्रकाश पडला होता आणि वाद्यांचे मंजुळ स्वर व कलावंतिणींचे गोड सुस्वर आलाप निघत होते. अशा ह्या सर्व गोष्टींनीं तें ठिकाण तर काय पण आसपास सर्व मंगलमय दिसत होतें. सर्वांच्या मुखकमलांवर आनंदश्री चमकत होती.

मंडळी सर्व जमली. गांवांतील मुख्य मुख्य सभ्य गृहस्थ व कामदार लोक सर्व आले, कोणी यावयाचे राहिले नाहीं, असें पाहून बाबासाहेबांनीं पानसुपारी वांटण्यास द्या अशी मंडळीस[2] सूचना केली.

मंडळीस सूचना मिळतांच विड्यांनीं भरलेलीं चांदीचीं तबकें घेऊन प्रथम भिक्षुक व सभ्य गृहस्थ व सरकारी कामदार यांस मंडळी विडे देत चालली. मागाहून लवंग, वेलची व जायपत्री वांटूं लागले. कोणी अत्तरदान्या घेऊन तें लावीत चा-लले. इतक्यांत हार, तुरे, केतकिपत्रें, व नारळांच्या[3] टोपल्या आल्या, व नारळ वां-टण्याचें काम अर्धें झालें, असें पाहून मंडळीला गुलाबदाणी [illegible] झाली, सर्वांस पानसुपारी, अत्तरगुलाब व नारळ मिळाले, [illegible] आहे, हें काहीं मंडळी पाहत होती. आतां कोणास द्यावयाचें [illegible] नाहीं, असें [illegible]

1 बहुतेक [illegible] मैत्रस झालेले नंतर तें सर्व [illegible]

2 [illegible] झाल्यास नैर्ऋत्य [illegible] सर्व मंडळीस [illegible] तबक सोडून सवड [illegible]

3 कांहीं [illegible] प्रथम हारतुरे, अत्तरगुलाब देऊन नंतर पानसुपारी देण्याची चाल आहे. व नारळ वांटण्याची चाल नाहीं. या प्रांतीं कोठें कोठें दोन नारळ (एक मुलाकडचा व एक मुलीकडचा,) देण्याची चाल आहे.

सर्व मंडळी उठली. बाबासाहेबांच्या व वकीलांचा निरोप घेऊन मंडळी जाऊं लागली. भिक्षुक मंडळीस दक्षिणा उदईक प्रातःकाळीं होईल असें सांगितलें.

इकडे लग्न लागल्यावर मुलाची आई व दुसऱ्या स्त्रिया माडीवरील दिवाणखान्यांत बैठक मांडली होती तेथें गेल्या. सर्व स्त्रिया जमल्यावर त्यांस हळदकूंकूं, पानसुपारी, अत्तरगुलाब व हारगजरे वांटून त्यांच्या नारळांनीं ओट्या भरिल्या. नंतर तेथून उठून सर्व स्त्रिया पुणेकरांचे मंडपीं गेल्या.

लग्न लागल्यावर वधुवरांस पाटावर बसविलें, असें मागें सांगितलें आहे. त्यानंतर वामनराव पत्नीसह कन्यादान करण्याकरितां तेथें आले.

मनुष्य जें कर्म करितो त्यास त्या कर्माचें ज्ञान असल्यावांचून तें कर्म त्याच्या हितास कारणीभूत होत नाहीं. ह्मणून ज्ञानाशिवाय कर्म व्यर्थ होय. तसेंच मुलीचीं मातापितरें कन्यादान करितात व मुलगा तें दान घेतो, परंतु हें दान करण्याचा मुळ हेतु, याजबद्दल नवरानवरीचें मनाची समजूत, कन्यादान करणारांस आपल्या कर्तव्याची माहिती, आणि वर व वधू यां परस्परांमध्यें होणारे करार यांचें त्यांस कितपत ज्ञान असतें, हें प्रत्येकानें आपल्या मनाशीं ताडून पाहिलें असतां त्याचें लक्षांत येईल. भटजी मंत्र ह्मणून, त्याप्रमाणें कन्यादानकर्ते व नवरानवरी यांणीं तंत्र केलें ह्मणजे सर्व काम झालें, असें मानितात. असो. कन्येचा बाप तिचें दान करतानां जें बोलतो आणि वराकडून जे कराररूकरून घेतो, त्याचा अर्थ काय व कन्येचें दान करण्यांत तिच्या मातापितरांचे हेतु काय असतात, हें समजून ते जें कर्म करितात त्यांचें ज्ञान त्यांस असावें, हें योग्य जाणून तो विधि येथें अर्थासहित देतों.

---

१ कोठें कोठें अशी चाल आहे कीं, लग्न लागल्यावर मुलाची आई तशीच घरीं निघून जाते. नंतर वधुकडील स्त्रिया वाजत गाजत गाडींतून तिला घेऊन येतात. ती आल्यानंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकू देतात. "सूनमुख" पाहण्याचा प्रकार याच वेळीं व्हावा असा खरा मार्ग आहे. पण बहुतकरून तसें न होतां पुढें एकादे वेळीं करण्याचा प्रघात पडला आहे. येथें याच प्रमाणें पुढें करून दाखविलें आहे.

## कन्यादानविधि.

—००—

### मुलीचें वर्णन.

मुलीचा बाप म्हणतो—

आरोगिणीं भ्रातृमतीं । असमानार्षगोत्रजां ॥
अनन्यपूर्विकां कांतां । असपिंडां यवीयसीं ॥ १ ॥

अर्थ—प्रकृतीनें चांगली, जिला भाऊ आहेत, नवऱ्याचे प्रवरांतील व गोत्रांतील नव्हे, कुमारी, सुंदर, लहान, अशी ही मुलगी.—

अव्यंगे पतिते क्लीबे । दशदोषविवर्जिते ॥
इमां कन्यां प्रदास्यामि । देवाग्निद्विजसन्निधौ ॥ २ ॥

अर्थ—हातापायांनीं धड, भ्रष्ट झालेला नव्हे, नपुंसक नाहीं, व दहा दोष ज्यास नाहींत, अशा ह्या पुरुषास देव, अग्नि व ब्राह्मण, यांच्या समक्ष ही कन्या देतों.

गौरीं कन्यामिमाम् विप्रा। यथाशक्तिविभूषितां ॥
गोत्राय शर्मणे तुभ्यं । दत्तां विप्र समाश्रय ॥ ३ ॥
कन्ये ममाग्रतो भूयाः । कन्ये मे देवि पार्श्वयोः
कन्ये मे पृष्टतो भूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयात् ॥ ४ ॥

अर्थ.—हे विप्रा, ही मी आपली गौरी कन्या यथाशक्ति शृंगारून तूं —गोत्रांत उत्पन्न झालेला—त्या तुला देतों. इचें तूं पाणिग्रहण ( अंगिकार ) कर.

चवथ्या श्लोकांत कन्येचा बाप तिची प्रार्थना करितोः—

अर्थ.—हे कन्ये, या विप्रास तुझें दान करण्याचा माझा हेतू हा काय कीं, माझ्या पुढील व मागील पूर्वजांस या तुझ्या दानानें मोक्ष मिळावा. ( या करितां तूं याजबरोबर पतिव्रताधर्मानें चाल. कीं जेणेंकरून मला मोक्ष मिळेल. )

### दानाचा हेतु.

मम समस्त पितॄणां निरतिशयसानंदब्रह्मलोकावाप्त्याद कन्यादानकल्पोक्त फलावाप्तये अनेन वरेण अस्यां कन्यायामुत्पादयिष्यमाणसंतत्या द्वादशावरान् द्वादशापरान् पुरुषांश्चपवित्रीकर्तुं आत्मनश्चश्रीलक्ष्मीनारायणप्रीतयें ब्राह्मविवाहविधिना कन्यादानमहंकरिष्ये.

अर्थ.-माझ्या सर्व पितरांस निरवधि आनंद व ब्रह्मलोक प्राप्त व्हावा याकरितां-कन्यादानाचें जें उक्त फल तें प्राप्त होण्यासाठीं, कन्येस या वरापासून जी संतती होईल तेणेंकरून माझे पितृपक्षाकडील १२ व मातृपक्षाकडील १२ पुरुष पवित्र व्हावे यासाठीं, व श्रीलक्ष्मीनारायणाचे प्रीतीसाठीं मी ब्राह्मविवाह विधीनें आपले कन्येचें दान करितों.

दान करण्याचा संकल्प.

अद्य अमुक गोत्राय, अमुक गोत्रोत्पन्नाय, अमुक शर्मणः प्रपौत्राय, अमुक शर्मणः पौत्राय, अमुक शर्मणः पुत्राय, अमुक शर्मणे श्रीधररूपिणे कन्यार्थिने स्नातकाय वराय; अमुक गोत्रस्य, अमुक प्रवरान्वितां, अमुक शर्मणः प्रपौत्रीं, अमुक शर्मणः पौत्रीं, अमुक शर्मणः पुत्रीं, अमुक नाम्नीं श्रीरूपां वरार्थिनीं, इमां कन्यां सालंकृतां प्रजापतिदैवत्यां धर्मप्रजासिद्ध्यर्थंतुभ्यमहं संप्रददे.

अर्थ-अमुक गोत्रांतील, अमुक गृहस्थाचा पणतु, अमुक गृहस्थाचा नातू, अमुक गृहस्थाचा पुत्र, अमुक नांवाचा, श्रीधरस्वरूपी, कन्यार्थी, स्नातक, (ह्मणजे उपनयन झालेला,) यास अमुक गोत्रांतील, अमुक प्रवरी, अमुक गृहस्थाची पणती, अमुक गृहस्थाची नात, अमुक गृहस्थाची मुलगी, अमुक नांवाची—लक्ष्मीरूप—अलंकार घातलेली, जिचें प्रजापति दैवत, धर्म आणि प्रजा यांच्या सिद्धिसाठीं, मी तुजकारणें दान करितों.

याजवर वराचें उत्तर. " कन्यां प्रतिगृण्हामि. "

अर्थ—या कन्येचें मी ग्रहण करितों. नंतर मुलीचा बाप वरास ह्मणतोः—

विश्वंभरः सर्वभूताः साक्षिण्यः सर्व देवताः ॥
इमां कन्यां प्रदास्यामि पितॄणां तारणाय च ॥
तुभ्यं विप्र मया दत्ता पुत्र पौत्र प्रवर्धिनी ॥
धर्मे चार्थे च कामे च नातिचरितव्या त्वयेयं ॥ १ ॥

अर्थ—हे ब्राह्मणा, परमेश्वर, तशींच पंच महाभूतें, व सर्व देवता, यांच्या साक्षीनें पुत्रपौत्रांतें वाढविणारी अशी ही मी आपली कन्या पितरांच्या तारणाप्रीत्यर्थ तुला दिली. आतां तूं हिला धर्माविषयीं, व अर्थाविषयीं, व कामाविषयीं, अंतर देऊं नको.

यांजवर वराचें उत्तर.

नातिचरामि, नातिचरामि, नातिचरामि.

" अंतर देणार नाहीं " असें त्रिवार

याप्रमाणें दान झाल्यावर मुलास इतर दानें देऊन त्याचा बहुमान केला (यावेळेस द्रव्य, गांव, हत्ती, घोडे, दासदासी वगैरे जें देणें तें द्यावें.) हें दान झाल्यावर पाणिग्रहणविधि झाला.

हें पाणीग्रहण झाल्यावर परस्परांकडून हातास कंकणें बांधविलीं. आणि नंतर लाजाहोम करावयास लागले. यावेळेस मुलीच्या भावानें वराचा कान पिळला. त्यास वराकडून पागोटें, शालजोडी वगैरे पोषाख मिळाला. (यास कानपिळा ह्मणतात.)

हा होम झाल्यावर तांदूळाच्या राशी करून त्याजवरून वधुवरांनीं परस्परांचा हात धरून बहुल्यास सात प्रदक्षिणा घातल्या व पाषाणावर (सहाण) उभयतांनीं पाय दिले. (हीं ७ पावलें पतीबरोबर आयुष्यमर्यादेपर्यन्त राहवयाचीं सूचक आहेत.)

यावरून पाहिलें असतां कन्यादानाचे हेतू स्पष्ट दिसोन येतात. मुलीच्या दानापासून तिच्या मातापितरांचा हेतू मोक्षप्राप्ति मिळावी असा असतो. परंतु फक्त दान केल्यानेंच मोक्ष मिळावयाचा नाहीं. तर ती पतिव्रता धर्मानें चालली पाहिजे. आणि ज्याप्रमाणें सत्पात्रीं दान केल्याशिवाय त्याचें श्रेय मिळत नाहीं, तसेंच हेंहि दान (कन्यादान) करण्यास पात्र असा वर पाहिजे. कित्येक लग्नांत मुलीच्या मातापितरांचा हेतू मोक्षप्राप्तीचा नसून उदरपोषणाचा दिसून येतो. अशा लग्नांत सुद्धां आमचे उपाध्ये बुवा संकल्पांत "ब्रह्मलोकमावाप्त्यादि" हेच शब्द बोलतात, हें आश्चर्य नव्हे काय? असो. या विषयावर लिहिण्यास एक स्वतंत्र ग्रंथच तयार करण्याचें काम हातीं धरिलें पाहिजे.

ईश्वरी लीला कांहीं विलक्षण आहे. पहा, कीं, स्त्री व पुरुष हीं दोघेंही भिन्न भिन्न उदरांतून उत्पन्न झालीं असल्यामुळें, प्रथमतः तीं अगदींच परकीय असतात. परंतु, विवाहानंतर त्या उभयतांस परस्पराविषयीं ममता उत्पन्न होऊन तीं फारच जवळचीं संबंधी होतात. आणि जे एकया उदरांतून उत्पन्न झालेले असतात, ते एकमेकांचा द्वेष करून शेवटीं दूरचेसे होतात. हा ईश्वरीमायेचा मोठा विलक्षण चमत्कार आहे! असो.

वैदिक कर्म आटोपल्यावर वरास धोतर नेसावयास दिलें. धोतर नेसल्यावर त्यास माडीवरील दिवाणखान्यांत बाबासाहेब यांजवळ बसविलें. इकडे

---

१ या वेळेस श्रीमंत लोक आपल्या सामर्थ्याप्रमाणें मुलीस आंदण देतात, परंतु गरीबानें निदान लामणदिवा, काशाचें ताट, तांब्या, वाटी, ताम्हन इतकें तरी दिलें पाहिजे.

२ कच्च्या सुतानें हळकुंडे मनगटास बांधितात.

३ या होमाच्या वेळेस भाताच्या लाह्या लागतात. हा होम होत असतां मुलीचा भाऊ वराचा कान पिळतो व उभयतांच्या हातांत लाह्या देतो, त्या लाह्या होमांत टाकतात.

रात्रीचा समय बराच झाला होता, म्हणून, वऱ्हाडाच्या वेळ न करितां, जेवणाची तयारी चालली. आपापल्या पंगतीस वकीलांकडील मंडळीस आमंत्रण जाऊन, ती आल्यावर, सर्वांस पंचपक्वान्नांचें भोजन झालें.

आतां आमच्या वाचकांस आपल्या ग्रन्थाचा मुख्य नायक आत्माराम याच्या लग्न मंडपीं नेऊन तेथील थोडीशी माहिती देऊं.

बाबासाहेबांकडून वकीलांकडे मुलास आणण्यास जेव्हां मंडळी गेली तेव्हां पुणेकरांकडील मंडळी येऊन आत्मारामास घेऊन गेली, हें मागें सांगितलेलें वाचकांचे लक्ष्यांत असेलच. तेथील थाट काय विचारावा! त्यांच्या योग्यतेप्रमाणें तेथील व्यवस्था फारच चांगली होती. बाबासाहेबांकडील लग्न लागल्यावर पानसुपारी घेऊन सर्व मंडळी पुणेकरांच्या मंडपांत गेली, तेथें लग्नमुहूर्तास बराच अवकाश होता. म्हणून मंडळीचें मनरंजन होऊन वेळ लवकर जावा व त्यांस फारवेळ बसल्याचा कंटाळा न यावा यास्तव तेथें कलावंतणींचे दोन ताफे उभे केले होते. त्यांचीं तीं सुस्वर गायनें ऐकून आणि मनोहर नृत्य पाहून मंडळीचें मन तल्लीन झालें होतें. अशा या रंगांत सर्व मंडळी गर्क झाली आहे, तों " शुभ लग्न सावधान " असे शब्द ऐकूं आले. हा नुकताच मंगलाष्टकांस आरंभ झाला होता. नंतर गायन व नृत्य बंद झालें व चोहोंकडे शांतता पसरली. नंतर लग्न लागल्यावर पानसुपारी वाटून कन्यादान वगैरे वैदिक कर्मे आटोपून तिकडेही सर्वांचीं भोजनें झालीं.

इकडे बाबासाहेबांकडे दोन वाजण्याचे सुमारास गृहप्रवेशाची तयारी झाली. नंतर कांहीं स्त्रिया व पुरुष मंडळी वाजत गाजत पुणेकरांचे मंडपीं गेली.

तेथें गेल्यावर आत्मारामास पोषाख घालून मुंडावळी बांधून तयार केलें. त्याचप्रमाणें नवरेमुलीस अलंकार घालून वस्त्रें परिधान करवून त्या दोघांस पालखींत बसविलें. नंतर सर्व मंडळी घरीं यावयास निघाली.

तो पहाटेचा समय होता. त्यावेळेस पक्षांचीं गायनें चाललीं होतीं. गार गार सुटून तो आंगास झोंबत होता. विद्यार्थी वेदपठण करीत होते. अशा वेळीं हिलालांचा प्रकाश पडला होता. वाद्यांचे मधुर स्वर निघत होते. मधून मधून हिरव्या, लाल, व पांढऱ्या रंगांच्या हवयांचा प्रकाश पडत होता. नळे उंच उंच उडत होते. अशा थाटानें ते सर्व मंडपानजिक येऊन ठेपले.

---

१ लग्न लागून वैदिक कर्म आटोपल्यावर जांई व त्याचे मानकरी यांचा फराळ होऊन नंतर भोजन होतें, असा कोठें कोठें परिपाठ आहे.

२. यास "वरातणी" असाही शब्द आहे. पुणेरी भांतीं हा प्रकार करण्याचा परिपाठ नाहीं.

हें आटोपल्यावर काशीबाईंनी आत्मारामाच्या पुढचांत फराळाचे पदार्थ एका ताटांत ठेविले.

नंतर दोघांनीं एकत्र फराळ केल्यावर त्यांच्या हातांवर दही व साखर दिली. आणि त्या दोघांस परत पुणेकरांकडे पोंचविलें.

या प्रमाणें वकीलांनींही बाबासाहेबांकडे येऊन आपल्या मुलाचा गृहप्रवेश केला. आणि पुनः दोघांस परत आणून पोंचविलें.

दक्षिणा व सूनमुख पाहणें.

दुसऱ्या दिवशीं बाबासाहेब निजून उठल्यावर शौच वगैरे विधि आटोपल्या नंतर शिवरामभाऊंस ह्मणतात:-

बाबा०-शिवरामभाऊ, तुह्मी वकीलांकडे जाऊन दक्षिणे बद्दल त्यांचा काय विचार आहे तें विचारा. माझा विचार आठ आणे, चार आणे व दोन आणे असे तीन दर ठेवावे, असा आहे. हें सर्व त्यांस सांगून त्यांचा रुकार घेऊन या. व त्यांजकडील कोणास तरी बरोबर आणा. भिक्षुक मंडळी आतां येईल. पुणेकरांच्या मंडपीं दुसरी दक्षिणा व्हावयाची आहे.

नंतर शिवरामभाऊ वकीलांकडे जाऊन त्यांचा विचार घेऊन आल्यावर:-

शिवरा०-( बाबासाहेबांस. ) त्यांचें पण मत असेंच आहे कीं, आठ आणे, चार आणे व दोन आणे, असे तीन दर ठेवावे.

बाबा०-बरें आहे. दोनशें रुपयांची मोड-अधेल्या, शंभर रुपयांच्या पावल्या आणि शंभर रुपयांच्या चवल्या घेऊन या.

इकडे शिवरामभाऊ दक्षिणेची तयारी करीत आहेत तों भिक्षुकमंडळी मोठ्या गडबडीनें येऊं लागली.

बाबासाहेब व दामोदरराव जवळ २०० रुपयांचें नाणें घेऊन बसले होते. जवळ वकीलांचा वडील मुलगा बसला होता. सर्व भिक्षुक मंडळी जमली असें पाहून बाबासाहेब, दामोदर व भिक्षुक मंडळींतील मुख्य भट्ट असे तिघे मंडपाच्या दारांत बसले.

नंतर प्रथम जे विद्वान ब्राह्मण, भिक्षुक व जोशी वगैरे होते त्यांस त्यांच्या योग्यतेप्रमाणें कोणास पांच रुपये, कोणास चार रुपये, अशी दक्षिणा देऊन त्यांची मनें तृप्त केलीं. नंतर सर्व भिक्षुक मंडळीस मोठ्यांस आठ आणे, मुंज झालेल्यांस चार आणे व लहानांस दोन आणे, याप्रमाणें दक्षिणा देऊन त्यांसाहि तृप्त केलें.

दक्षिणा आटोपल्यानंतर किती रुपये लागले याचा हिशोब करून त्या मानानें प्रत्येकांनीं रुपये दिले.

याचप्रमाणें पुणेकरांच्या मंडपांत दक्षिणा झाली.

प्रातःकाळीं नवरा मुलगा उठल्यावर शौच्य वगैरे विधि आटोपल्या नंतर त्यास गाडींत बसवून वाजत गाजत वकीलांच्या घरीं पोंचविलें. नंतर चंद्राबाई उठल्यावर तिची वेणी घालून, अलंकार घातले आणि शालू नेसवून अंगावर शेला दिला, व मोत्यांची मुंडावळ बांधिली. काशीबाई व दुसऱ्या चार पांच जणीं तबकांत गुलाल, नागवेलीचीं पानें, लवंगा, खोबऱ्याचे तुकडे व सुपाऱ्या घेऊन चंद्राबाईसह घोड्याच्या गाडींत बसून व दुसरी गाडी बरोबर घेऊन वाजत गाजत वकीलांच्या मंडपीं गेल्या.

वाजत गाजत मंडळी येत आहे, असें ऐकून वकीलांकडील करवल्यांनीं मुलास लपविलें. चंद्राबाई व तिच्या करवल्या गाडींतून उतरून घरांत गेल्या व मुलास शोधूं लागल्या. सर्व घर शोधित इकडून तिकडे, तिकडून इकडे पाहूं लागल्या, परंतु मुलगा सांपडेना. तेव्हां मुलाकडील करवल्या म्हणतातः—

मुलाक० करव—मुलगा शोधून काढा. नाहीं तर नांवें घ्या! उगाच वेळ कशाला लावितां?

मुली० करव०—तुम्ही जर खोलींत लपवून कुलूप लाविलें असेल, तर कसें शोधून काढावें!

मुला० करव०—आम्ही खोलींत लपविलें नाहीं. बाहेरच आहे.

नंतर मुलीकडील करवल्यां पुनः मुलाला शोधूं लागल्या, तेव्हां मुलगा सांपडला.

नंतर मंडपांत बैठक घातली होती तेथें मुलास लोडाशीं टेंकून बसविलें. चंद्राबाईला त्याच्या समोर बसविलें. मुलीकडील करवल्या मुलीच्या तोंडांत पानाच्या विड्या आणि लवंगा देऊं लागल्या. मुलगी त्या विड्या दोन दातांत धरी. मुलगा एक हात मुलीच्या हनुवटीवर व दुसरा डोक्यावर ठेवून आपल्या दातांनीं त्या तोडी. याचप्रमाणें मुलाकडील करवल्या मुलास विड्या व लवंगा देत. त्या वर सांगितल्याप्रमाणें मुलगीही तोडी. परंतु तिला उभें रहावें लागे. याप्रमाणें विड्या तोडण्याचा प्रकार कांहीं वेळ चालल्यानंतर सुपाऱ्या खेळण्यास सुरवात झाली.

कांहीं वेळ सुपाऱ्यांनीं एकमेकींचा खेळ झाल्यानंतर सुपारी लपविण्याचा प्रकार चालला. प्रथम मुलीकडील करवल्यांनीं चंद्राबाईच्या अंगावर कोठें तरी

१. वरपक्षाकडील दक्षिणा बहुधा दुप्पट असते, अशी कोठें कोठें चाल आहे.

सुपारी लपवून ठेविली. ती मुलानें काढून दिली. त्याप्रमाणें मुलानें सुपारी लपविली ती मुलीनें काढिली. असे हे खेळ चालू असतां स्त्रिया व पुरुष मंडळी कौतुकानें पाहत होती.

असे खेळ झाल्यावर मुलाकडील व मुलीकडील करवल्या वधुवरांसह गाड्यांत बसून वाजत गाजत बाबासाहेबांच्या वाड्यांत आल्या.

घरीं आल्यावर पुनः विड्या तोडण्याचा व सुपाऱ्या खेळण्याचा प्रकार झाला. खेळ पुरा झाल्यावर वधुवरांच्या स्नानाची तयारी झाली:—मंडपांत दोन समोरासमोर चौरंग मांडिले. उष्णोदकाचीं गंगाळें ठेविलीं. मसालेदार खोबऱ्याचें दूध व सुवासिक उटणीं आणि सुगंधिक तेलें ठेविलीं. गुलाबाचा व केशराचा रंग करून तो एका ताम्हणांत ठेवला. मुलाचा पोषाख उतरून त्यास नेसावयास पंचा दिला. नंतर वधुवरें चौरंगावर बसलीं. परस्पराकडील करवल्या अंगास उटणीं वगैरे लावून स्नान घालूं लागल्या. व वधुवरें रंग खेळूं लागलीं.

वाचकहो, आतां आपण ह्या वधुवरांस येथेंच स्नानक्रीडा करीत टाकून दुसऱ्या गोष्टींकडे वळूं.

मागें दक्षिणा वाटण्याचा प्रकार पुरा होऊन भिक्षुक वगैरे सर्व मंडळी गेली असें सांगितलें आहे. सर्व मंडळी गेल्यावर बाबासाहेब माडीवरील कोठींत बसले आहेत इतक्यांत बाईसाहेब तेथें आल्या. त्यांनीं बाबासाहेबांच्या विचारानें चंद्राबाईच्या सासूला सूनमुख पाहण्यास आज बोलवावी असें ठरविलें! नंतर लगेच बाईसाहेब, काशीबाई व सीताबाई अशा तिघी घोड्याच्या गाडींत बसून वकीलांकडे गेल्या. आणि विहिणास आमंत्रण देऊन परत आल्यावर तयारीस लागल्या. बाबासाहेबांसारख्या श्रीमंत कुलीन घरांत एकादें लहानसहानसें कार्य व्हावयाचें असलें म्हणजे त्यांजकडे पांच पंचवीस पानें सहज व्हावयाचीं. मग आतां तर काय! शुभसमारंभ! म्हणून सूनमुख पहाण्याला विहीण व तिच्या मानकरिणीच बोलविल्या नाहींत. गांवांतील पांचपंचवीस घरच्या बायकाही बोलविल्या होत्या व हळद कुंकवाचें आमंत्रण तर सर्व घरीं केलें होतें.

असा त्यादिवशीं एक लहानसा समारंभच व्हावयाचा होता असें म्हटलें तरी चालेल; आणि त्याप्रमाणें तयारीही चालली होती. असो.

वधुवरांस स्नान करीत सोडून आपण बराच वेळ दुसरीकडे वळलों हें वाचकांच्या लक्षांत असेल. आतां आपण त्यांजकडे वळूं.

इकडे वधूवरांचें मंगलस्नान झाल्यावर मुलास अंग पुसण्यास शेला दिला. अंग पुसल्यावर पितांबर नेसावयास दिला. पितांबर नेसल्यावर मुलास बहुलावर

बसला. मुलीस घरांत नेऊन तिचें आंग पुसून, विडा कुंकू लाऊन, पैठणी नेसवून बहुल्यावर बसविलें. नंतर उपाध्यांनीं त्यांजकडून लाजाहोम करविला.

इकडे घरांत फराळाचीं पानें मांडण्याची तयारी चालली. जांवयांच्या पंक्तीस त्यांजकडील मंडळीस आणण्यास वाजे, वाजंत्री घेऊन नारायणराव वकीलांकडे गेले. काशीबाई करवल्यांस आणावयास गेली.

इकडे माजघरांत लालभडक गुलालाचे सरळ पट्टे ओढून त्यावर लुसलुशीत पांढऱ्या रांगोळीनें कणा काढिला. मेहरपी काढून त्यांत निरनिराळे रंग भरिले. चांदीच्या फुल्या मारिलेले मोठेमोठे पाट मांडिले. त्यांसमोर विस्तीर्ण केळपानें मांडून त्यांजवर मोठीं ताटें ठेविलीं. मधून मधून उदबत्त्यांचीं व अगरबत्त्यांचीं झाडें ठेविलीं. एके ठिकाणीं तऱ्हेतऱ्हेच्या वेलबुट्टींनीं मेहरपी काढून दोन पाट मांडिले. आडणीवर मोठें चांदीचें ताट ठेवून त्यांत वाट्या ठेविल्या. सभोंवतीं शामदानें ठेऊन उदबत्त्यांचीं झाडें ठेविलीं. अशी तयारी चालली होती. जांवयाचे स्नेही, भाऊ वगैरे मानकरी आणि करवल्या अशी मंडळी चौघड्याच्या गाजावाजांतून वाजतगाजत आली.

नंतर नानाप्रकारचे पदार्थ वाढून पानें तयार झाल्यावर जांवई व त्यांजकडील मानकरी व करवल्या या सर्वांस त्यांच्या मानाप्रमाणें पाटावर बसविलें. सर्व फराळ करूं लागले. चंद्राबाईस नवऱ्याच्या पुढ्यांत बसविलें.

अगरबत्त्यांचा घमघमाट सुटून त्यांत पक्वान्नाचा मधुर स्वाद येत होता. कोणी बुंदीचे केशरी लाडू फोडीत होते, कोणी साखरफेणी दुधांत भिजवीत होते; कोणी जिलबीची नळी तोंडांत घालीत होते; व कोणी अनरसे वरच्यावर चाखीत होते. स्त्रिया हातांत पक्वान्नांनीं भरलेलीं ताटें घेऊन वाढीत होत्या. शिरापुऱ्यांचे समाचार घेत होते. इतक्यांत बाईसाहेब आल्या.

बाई०–( चंद्राबाईस) आतां नवऱ्यास भरीव. एकटीच काय खावेस ?

नाराय०–चंद्रे, साखरफेणी भरीव पाहूं. ( चंद्राबाई साखरफेणी दुधांत भिजऊन भरविते इतक्यांत )

काशी०–चंद्रे संभाळहो, खालीं पडली तर फजिति होईल.

याप्रमाणें वधुवरें एकमेकांस घांस भरवितात व स्त्रिया कौतुक पहातात.

---

१ भला होम करून आईपर्यंत सकाळ संध्याकाळ होत असतो. बडोद्यांकडे ही चाल नाहीं असें समजतें.

सर्वांचें भोजन झाल्यावर सर्वांस तांबुल देऊन पानसुपारी, अत्तरगुलाब व हारगजरे वाटले.

नंतर कांहीं वेळानें जांवई व मानकरी यांजसह पंचपक्वान्नीं भोजन झालें. असो. आतां येथें थोडीशी विश्रांति घेऊन पुढील मनोरंजक प्रकारास आरंभ करूं.

## सूनमुख पाहण्याचा प्रकार.

सायंकाळ होत आहे तों, मंडपांत बैठक पडली. हांड्या, ग्लासें, झुंबरें, पेटवूं लागले. बहुल्यावर दोन चौरंग मांडून त्यावर मखमलीचे रुमाल घातले. हळदकुंकवाचें साहित्य व पानसुपारी, अत्तरगुलाब, फुलें हारगजरे वगैरे साहित्यांनीं भरलेलीं ताटें, तबकें तेथें ठेविलीं. हांड्या झुंबरांचा लखलखित प्रकाश पडला. वाद्यें वाजूं लागलीं. स्त्रिया एकी मागाहून एक येऊं लागल्या. त्यांस काशीबाई बसवीत होती.

बऱ्याच स्त्रिया जमल्या असें पाहून बाईसाहेब व दुसऱ्या दोन स्त्रिया वाद्यांसहित विहिणीस आणण्यास वकीलांकडे गेल्या. तेथें गेल्यावर त्यांजकडील सर्व स्त्रिया अलंकार घालून व पोशाख करून तयार होत्या, त्यांस घोड्याच्या गाडींत बसवून त्या वाजतगाजत मोठ्या थाटानें इकडे यावयास निघाल्या.

इकडे स्त्रियांनीं सर्व मंडप भरून गेला होता. कित्येक अजून येत होत्या. बाईसाहेब गाडींतून उतरून सर्व स्त्रियांसह मंडपांत आल्या. विहिणीस व मानकरिणी स्त्रियांस मध्यस्थानीं बसविलें.

कांहीं वेळ गेल्यानंतर मुलाच्या आईला बहुल्यावरील चौरंगावर बसविलें व चंद्राबाईस दुसऱ्या चौरंगावर बसविलें. नंतर मुलाच्या आईनें तिला हळदकुंकूं देऊन नवी शेल्लारी नेसवून अंगावर शेला दिला, आणि ओटी भरली. त्यानंतर तिला आपल्या मांडीवर बसवून तिचें तोंड न्याहाळून पाहिलें आणि तोंडांत साखर घातली व गळ्यांत मोत्यांचें पेंढें घातलें. नंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकूं, पानसुपारी, व अत्तरगुलाब देऊन हार गजरे दिले व त्यांच्या नारळांनीं ओट्या भरल्या आणि पेढे वाटले. नंतर ज्यांस फराळाचें आमंत्रण होतें त्या तेथेंच राहिल्या आणि बाकीच्या सर्व घरीं गेल्या.

इकडे माजघरांत कणा रांगोळी काढून, मोठमोठे पाट मांडून केळरांबे मांडिलीं होतीं. मधून मधून समया व शामदानें ठेविलीं होतीं. उदबत्त्या लाविल्या होत्या. पक्वान्नें वाढण्याची गर्दि चालली होती. कोणी पांढरे शुभ्र मांडे व कोणी केशरी करंज्या वाढीत होत्या; कोणी साखर

फेण्या व बुंदीचे लाडू वाढित होत्या; कोणी भाज्या, कोणी भाजी, कोशिंबिरी वाढित होत्या. थोडक्यांत सर्व पानें पक्वान्नांनीं व इतर पदार्थांनीं भरून गेलीं.

मुलीच्या आईनें विहिणीचे व त्रिच्या मानकरिणींचे पाय धुतल्यावर विहिणीस व सर्व स्त्रियांस पाटांवर बसविलें. इंग्रजी फराळ करूं लागल्या.

तो रात्रीचा समय. चोहोंकडे लखलखीत प्रकाश पडला आहे. मुलेंबाळें इकडून तिकडे, तिकडून इकडे धांवत आहेत. कित्येक आनंदानें खेळत आहेत. आचारी स्वयंपाक करण्यांत गुंतले आहेत. इकडे मांडवांत स्त्रियांचा फराळ चालला आहे. उदबत्त्यांचा घमघमाट सुटला आहे. बाईसाहेब आग्रह करून वाढीत आहेत. कोणास लाडू, कोणास मांडे, कोणास पुऱ्या, कोणास मोतीचूर, कोणास जिलब्या, कोणास साखरफेण्या व कोणास साखरभात, असे पदार्थ वाढण्यांत कांहीं स्त्रिया गुंतल्या आहेत. कोणी 'नको नको' म्हणून हात पुढें करीत आहेत. तरी पण बाईसाहेब आग्रहानें वाढीत आहेत. याप्रमाणें फराळ झाल्यावर त्यांस तांबूल दिले. नंतर विहिणीस व त्यांजकडील मानकरिणींस गाडींत बसवून वाजतगाजत घरीं पोहोंचत्या केल्या.

हा सूनमुख पहाण्याचा प्रकार झाला.

याप्रमाणें एके दिवशीं पुणेकरांकडील सूनमुख पहाण्याचा प्रकार झाला.

वधुप्रवेश. ( वरात. )

तिसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं नवरा मुलगा उठल्यावर मागें सांगितल्या प्रमाणें खेळ वगैरे करणें झालीं; पुढें फराळ व्हावयाचा होता. फराळाचा बेत फार च चांगला केला होता. जांवयाचे मित्र, करवल्या वगैरे मंडळीही बरीच होती. नानाप्रकारचीं पक्वान्नें मोठीं सुंदर केलीं होतीं. त्याचप्रमाणें फराळाच्या वेळचा थाटही फारच चांगला होता. एकंदरीनें पाहतां तो समारंभ लहानशा मेजवानी प्रमाणें झाला असें म्हटलें तरी चालेल. असो. याप्रमाणें फराळ झाल्यावर सर्वांचें भोजन झालें. नंतर वरातीची तयारी वगैरे चालली.

भोजन आटोपल्यावर बाबासाहेबांनीं कांहीं मंडळीस गांवांत आमंत्रण करावयास पाठविलें. मंडपांत बैठकी पडून रोषनाई होऊं लागली. बापूजी वगैरे मंडळी पालखी शृंगारूं लागले. कांहीं पानसुपारीची तयारी करण्यांत गुंतले. गांवांत स्त्रियांस हळदकुंकवाचें आमंत्रण करण्याकरितां मोलकरिणी निघाल्या. कांहीं-

---

१ विहिणीचे पाय धुतल्यानंतर व नंतर यांनीं धरून करण्याचा प्रघात.

साहेब कुमानाचे कोठींत बसून झाड तयार करूं लागल्या. ती तयार झाल्यावर मेजवा-नीची कुमारी, खण, वगैरे कापड नारायणराव यांजकडून आणून घेऊन त्यांचे मखर बांधिले. इकडे नानासाहेब मामलेदार यांच्या घरापासून थेट बाबासाहेबांच्या वाड्यापर्यंत दुतर्फा रस्त्यानें ग्लासांचीं झाडें व तोरणें बांधिलीं. ठिकठिकाणीं दारूकामाचीं झाडें, चक्रें वगैरे उभीं केलीं होतीं. याप्रमाणें तयारी होतां होतां सूर्य अस्तास जाऊं लागला. तशी तयारी जारीनें होऊं लागली. याप्रमाणें वकीलांचे मंडपींही मोठी धामधूम चालली होती.

सायंकाळ झाला तोंच मंडपांत तऱ्हेतऱ्हेचे हिरवे, पिवळे, तांबडे वगैरे इराणी गालिचे पसरून, ठिकठिकाणीं पांढरी शुभ्र लोडें ठेवून बैठक पडली. हांड्या व झुंबरें लावून चोहोंकडे ग्लासांच्या एक सारख्या रांगा लागल्या. पालख्या, घोडे, गाड्या, म्याने, वगैरे तयार झाले. वाजंत्रीवाले येऊन ते तयार होऊं लागले. मशाली, हिलाल, व दारूकाम वगैरे सरंजाम अगदीं कडेकोट तयार करून ठेवला. कलावंतणींचे ताफे मंडपांत येऊन त्यांची तयारी होऊं लागली. असें होतां होतां आकरा वाजून गेले. बाबासाहेब मंडळीस निघण्याविषयीं घाई करूं लागले. हिलाल प्रकाशित झाले. वाद्यांचा गजर सुरू झाला. चौघडा झडूं लागला. स्त्रिया अलंकार घालून वस्त्रें नेसून तयार झाल्या. पुरुषमंडळी पोषाख करून सिद्ध झाली. गांवांतील मंडळी जमूं लागली. रस्त्यावरील रोषनाई अगदीं पूर्ण तेजानें प्रकाशूं लागली. गाड्यांचे घोडे खिंकाळूं लागले. स्त्रिया आपल्या बालकांस झोंपेंतून उठवून त्यांस जागे करून कडेवर घेऊन निघण्यास सिद्ध झाल्या. अशी सर्व तयारी झाल्यावर स्त्रिपुरुषांचा जमाव मोठ्या थाटानें पुणेकरांच्या मंडपीं जाऊन ठेपला.

तेथें गेल्यावर पुरुष मंडळी मंडपांत बसली व स्त्रिया घरांत गेल्यानंतर बहुल्यावर चौपाट काढून चौरंग मांडिला. त्यावर नवऱ्या मुलीस बसविलें. मुलाच्या आईनें तिची वेणी घालून अंगावर सर्व अलंकार घातले. नंतर नवी पैठणी नेसवून, अंगावर शालजोडी देऊन, मोत्यांची मुंडावळ बांधिली-आणि हळदकुंकूं देऊन तिची ओटी भरिली. हें कृत्य आटोपल्यावर मुलीच्या आईनें मुलीच्या सासूस, जाऊस व नणंदेस बहुल्यावर चौरंग मांडून त्यांवर बसविलें. त्यांस हळदकुंकूं देऊन त्यांच्या नारळांनीं ओटया भरिल्या. आणि प्रत्येकीस एकेक

१ वधूवरपक्षांकडील मानकरणींस देण्याची कुमारी वगैरे.

घार्येन [illegible]. त्या नंतर मुलीच्या [illegible] [illegible] [illegible] [illegible] तिच्या सासूच्या चौकीवर तिच्या आईनें बसविलें. सासूनें तिच्या ओटींत [illegible] घातली.

वरील कृत्य आटोपल्यावर वधूचीं मातापितरें स्नान करून रेशमी वस्त्रें परिधान करून मंडपांत आलीं. नंतर उपाध्यांनीं त्यांजकडून ऐरिणीची पूजा करविली. आणि तें ऐरणीदान वरमातेस दिलें.

हें दान देण्याचा उद्देश वंशवृद्धि व्हावी हा आहे. हें खालच्या श्लोकावरून दिसून येतें.

मुलीचा बाप दान देतांना ह्मणतो.—

उमामहेश्वरप्रीतिद्वारा कन्यादानसंपूर्णतायै वंशाभिवृद्धये ऐरणीपूजनं वरमातृ ऐरिणीप्रदानंच करिष्ये.

हें दान देऊन वरमातेस दक्षिणा[3] दिली. नंतर ती ह्माळ मुलीच्या बापानें प्रथम मुलाच्या बापाच्या डोक्यावर देऊन मुलीस मांडीवर बसविलें. यावेळेस उपाध्येबुवा खालीं लिहिलेला श्लोक ह्मणतात तोः——

सप्त वर्षा भवेत् कन्या पुत्रवत् पालिता मया ॥
इदानीं तव पुत्राय दत्ता स्नेहेन पाल्यताम् ॥ ५॥

---

१ या दिवशीं वायनें वेगवेगळीं असतात, तीं येणेंप्रमाणें:—

१ मुलीच्या सासूस द्यावयाचें वायन:—हें दुरडीचें असतें. त्यांत तांदूळ, नारळ, गूळ व एक दुरडी पानदान असतें; त्यांत एक रुपया असतो. ह्या वायनास "सासूवाण" ह्मणतात.

२ मुलीच्या जावेस द्यावयाचें वायन.—हें सुपाचें असतें. त्यांत नारळ, गूळ व एक दुरडी पानदान असून त्यांत एक रुपया असतो. ह्यास "जाऊवाण" ह्मणतात.

३ मुलीच्या नणंदेस द्यावयाचें वायन.—हें टोपलीचें असतें. यांत गहूं, साखर, नारळ व एक पानदान असतें. त्यांत एक रुपया असतो. ह्यास "नणंदवाण" ह्मणतात.

या प्रत्येकांत रुपयाच पाहिजे असें नाहीं. सामर्थ्याप्रमाणें चार आणे अथवा दोन आणे घालावे. मात्र तें चांदीचें नाणें असावें.

२ मुलीची आई मुलीस लुगड्यांत गुंडाळून सासूच्या मांडीवर देते त्यावेळीं मांडीच्या खालीं तांब्याचें पातेलें असतें. त्यांत गहूं, गूळ व कांहीं नाणें असें घालतात. ह्या पातेल्यास "मांडी-घेणें" ह्मणतात. हें सामर्थ्याप्रमाणें लहान मोठें असावें.

मुलीची आई मुलीस लुगड्यांत गुंडाळून देते त्याचा हेतु हाच असावा कीं, आजी ही जन्मापासून पालनपोषण केलेली मुलगी मी आपल्या (मुलीच्या सासूच्या) स्वाधीन करितें तिचा आपण आपल्या मुलीप्रमाणें सांभाळ करावा. हें कृत्य झाल्यावर लगेच मुलाक पाहून, [illegible] आंब्याची [illegible] काढून तिजवर कुंकवाचें पाणी शिंपडतात व तेंच पाणी वधूवरें [illegible] भागावर [illegible]. ह्याला "[illegible]" असें ह्मणतात. [illegible] नाहीं.

३ ही दक्षिणा आपल्या सामर्थ्याप्रमाणें असावी.

या वाक्यांतील हेतु हाच कीं, आजपर्यंत इचें मीं पालणपोषण केलें, आतां तुमच्या मुलाकरितां ही मुलगी देतों; तिचा पुत्रवत् सांभाळ करावा.

याप्रमाणें वैदिक कर्म आटोपल्यानंतर वहुल्याजवळ छपरी पलंग घालून त्यावर गाद्या, गिरद्या, चादरी वगैरे घालून शेज तयार करितात. त्यावर वधुवरांस समोरासमोर बसवून त्यांच्या सभोंवतीं कच्चें सूत सोळा वेळां गुंडाळितात. नंतर ते सर्व पदर एकत्र करून त्याची वातें करितात. ( या कृत्यास शेजबाज ह्मणतात. )

हीं सर्व कृत्यें आटोपल्यावर वरास नवें पागोटें व शालजोडी दिली. नंतर वधुवरें घरांत जाऊन देवकास नमस्कार करून ( या वेळेस वर आपल्या सासूस व घरांतील स्त्रियांस नमस्कार करितो. ) बाहेर आल्यावर सर्व मंडळीस पानसुपारी अत्तरगुलाब दिलें. अशी सर्व तयारी झाल्यावर वधुवरांस पालखींत बसविलें. तर्हीच मुलें व कांहीं स्त्रिया म्यान्यांत व गाड्यांत बसल्या; वाद्यांचा घोष सुरू झाला व सर्व मंडळी चालूं लागली.

मध्यान्हरात्र उलटून गेली होती. हिलालांचा प्रकाश चोहोंकडे एक सारखा पडला होता. वधुवरें पालखींत बसलीं होतीं. त्यांजवर कोणी चौरी फिरवित होते. मधून मधून तऱ्हेतऱ्हेचें दारूकाम लावीत होते, व गुलाल उधळीत होते.

अशा थाटानें मंडळी त्या वेळच्या देखाव्याचा आनंदमय घुटका घेत मंडपांत येऊन पोंचली.

नंतर मंडपाच्या दारापासून घरांत देवकाजवळ पायघड्यांवरून जाण्याचा प्रकार वधुप्रवेशांत सांगितला आहे त्याप्रमाणें केला.

देवकाजवळ गेल्यावर त्यांस चौरंगावर बसविलें. नंतर उपाध्यांनीं पुण्याहवाचन व लक्ष्मीपूजन करविलें आणि मुलीचें नांव राधाबाई ठेविलें. त्यानंतर भाणुस उतरण्याचा प्रकार झाला. ( वधुप्रवेश पहा. )

वैदिक कर्म आटोपल्यावर मंडपांत मंडळीस त्यांजकडून सोखर वांटिली.

---

१ असें बोलून मुलाकडील सर्व मानकरी यांच्या मांडीवर मुलीस बसवून हात ठेवल्यावर देतात. व ते मुलीच्या मुखांत साखर घालतात.

२ ही चाल सर्वत्र नाहीं. ही वात मंगळागौरीच्या पूजनसमयीं लागते, करितां ती जपून ठेवावी.

३ मुलीची आई वराच्या हातावर दही व साखर देते ती तो खातो.

४ वोग वराच्या हातानें गालावर सोन्याचें आंगठीनें लिहवितात.

५ साखर वांटण्याचा प्रकार—वरानें चांदीची वाटी साखरेनें भरून वधूच्या हातीं द्यावी व तिनें पानावर ओतावी, याप्रमाणें वधुवरें परस्पर नांवें घेतात. ही चाल सर्वत्र नाहीं.

नंतर पानसुपारी, अत्तरगुलाब व हातावरे घालून नारळ दिले, व गुलाल उधळला.

साखर वाटतांना मुलीनें नांव घेतलें तें.—" दारीं होता, बाग त्यांत होती तुळस, तिला घाली नित्य मोत्या पोंवळ्याचें पाणी, मनोहर होतें आईबापांची तान्ही, आतां झाल्ये आत्मारामरावांची राणी."

इकडे घरांत सर्व स्त्रियांस हळदकुंकूं, पानसुपारी, अत्तरगुलाब वाटून साखर दिली. आणि नारळांनीं ओटया भरिल्या. नंतर पुणेकरांकडील सर्व मानकरणींस लुगडीं नेसावयास दिलीं. त्यानंतर सर्वांच्या ओटया नारळ व साखरेनें भरिल्या. (वरपक्षाकडील नेसविणी वरातीच्या दिवशीं करण्याची रुढि आहे.)

याप्रमाणें सर्व आटोपल्यावर पुरुष मंडळी व स्त्रिया वकीलांच्या मंडपीं वरातीस गेल्या. येथें दुसरा पोटभाग पुरा झाला. आतां या ठिकाणीं थोडीशी विश्रांति घेऊन मग पुढील लहानशा भागास आरंभ करूं.

---

# पोट भाग ३ रा.

## ज्ञातिभोजन.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें वधुप्रवेशाचा समारंभ आटोपल्यावर बाबासाहेब, शिवरामभाऊ, वगैरे मंडळी मंडपांत बसली असतां, भोजन समारंभ कधीं करावा याचा विचार होऊं लागला. एकंदर तीन समारंभ व्हावयाचे होते, ह्मणून प्रथम कोणी करावा याचा सर्वांस मोठा विचारच पडला होता. आणि असे दोन तीन समारंभ असले ह्मणजे प्रथमचा समारंभ करण्यास कोणी पुढें होत नाहीं. कारण प्रत्येकास आपल्याकडील समारंभ सर्वांत चांगला व्हावा अशी स्वाभाविक ईर्षा असतेच. ह्मणून प्रत्येक जण दुसऱ्याच्या समारंभांतील व्यवस्था पाहून, त्यांतील न्यून पक्षें लक्षांत ठेवून आपल्या स्वतःकडील समारंभांत चांगली व्यवस्था ठेवण्याचा प्रयत्न करण्याकडे व लोकांकडून वाहवा ह्मणून घेण्याकडे विशेष लक्ष देतो. असा

---

१ वधूचें भाऊस जें लुगडें देतात त्यास 'बोळवणें' ह्मणतात. व मुलाच्या किंवा मुलीच्या भाऊस जें देतात, त्यास "भाऊबीज" ह्मणतात.

जरी स्वाभाविक मानवी स्वभाव व रीति आहे, तरी आमच्या बाबासाहेबांनीं हें काम प्रथम करण्याचें, आपल्या माथीं घेण्याचा विचार करून, त्यांहीं, बापूजी देशपांडे, मल्हारराव कुळकर्णी, मोरोपंत व नारायणराव सोलापुरकर वगैरे गांवांतील मुख्य मंडळीचा सल्ला घेऊन, तो दुसऱ्या दिवशींच करण्याचा निश्चय केला. आणि त्याप्रमाणें सितारामअण्णा वकील व पुणेंकर यांस कळविलें.

लग्नसमारंभांतील सर्व कृत्यें परस्पर उभयपक्षांत व्हावयाचीं असतात. परंतु गांवसमारंभ हें कृत्य तसें नाहीं. तें गांवांतील सर्व लोकांच्या सवडीप्रमाणें व त्यांच्या पसंतीप्रमाणें कार्य करणाऱ्या यजमानाकडून घडलें पाहिजे. इतर कृत्यें, काय! उभय यजमानांच्या विचारावर अवलंबून असतात. परंतु हें कृत्य कसें झालें तरी गांवांतील मंडळीच्या विचारानें व्हावयाचें असतें. तसेंच या कृत्यास त्या मंडळीची साह्यताही अवश्य आहे. तशांत परगांवीं हें प्रयोजन करावयाचें असलें, तर त्या यजमानांस सर्वस्वी गांवांतील मंडळीवर अवलंबून राहिलें पाहिजे. म्हणून गांवांत मंडळीस विचारून त्यांचा रुकार घेऊन हें कार्य करण्याचा निश्चय करावा.

याप्रमाणें बाबासाहेबांनीं, जरी ते स्वतः त्यांच्या गांवांतील प्रमुख मंडळीपैकीं होते तरी, मंडळीचा रुकार घेतल्यावांचून, या कामास हात घातला नाहीं. असो. मंडळीचा रुकार घेतल्यावर त्यांच्या साह्यानें ते या कृत्याच्या तयारीस लागले.

इकडे उपाध्ये स्नान करून, गंध लाऊन, हातांत पळी पंचपात्री घेऊन मंडपांत आले. नंतर मंडपोत्थापनेचें वैदिक कर्म होऊं लागलें. ( याची माहिती साहित्यपत्रकांत पहावी. )

लग्नसमारंभांतील सर्व कृत्यांत हा समारंभ फार मानगडीचा व खटपटीचा असतो. तशांत बाबासाहेबांचें गांव लहान सहान नव्हतें! आणि त्यांत बाबासाहेब कसे झाले तरी श्रीमंत व कुलीन घराण्यांतील गृहस्थ व एकदोन गांवचे इनामदार! या सर्व मानानें पाहतां त्यांजकडे फार नाहीं तरी हजार पानांचा भोजनसमारंभ व्हावयाचा होता. असो. समारंभाचा विचार ठरला मात्र, तों गांवांतील मंडळी बाबासाहेबांकडे येऊन आम्हांस कांहीं काम सांगा, असें म्हणूं लागली तेव्हां काय विचारावें! बाबासाहेबांनीं निरनिराळीं कामें

१ हें कृत्य शास्त्रविहित कार्य करते यजमान परास्त घेत नाहींत, म्हणून हें आटोपल्या वर भोजनसमारंभ करावा.

काढलीं आणि प्रत्येक कामास पांच पांच, सहा सहा असे इसम नेमिले. प्रथम त्यांनीं कोणतीं पक्वान्नें करावीं याचा विचार गांवांतील मंडळीच्या संमतीनें ठरविला. त्यांत त्यांनीं पंचपक्वान्नें करावयाचें ठरविलें. याप्रमाणें ठरल्यावर त्यांनीं हजार पानांस प्रत्येक पक्वान्न किती लागेल व त्यास निरनिराळे जिन्नस किती लागतात याची यादि काढून याप्रमाणें सर्व जिन्नस तयार करण्याकडे कांहीं मंडळी नेमली. तसेच भाज्या व केळीचीं पानें मिळवून आणावयास कांहीं मंडळीस पाठविलें. कित्येकांकडे आचाऱ्यास पक्वान्नें करावयाचें जिन्नस मोजून देण्याचें व पक्वान्नांबद्दल सर्व प्रकारची व्यवस्था करण्याचें काम सोंपलें.

याप्रमाणें समारंभाची तयारी चालली आहे; असे होतां होतां दोन वाजण्याचा सुमार झाला. तेव्हां बापूजी देशपांडे गांवांत भोजनाचें आमंत्रण करावयास जाण्याची तयारी करूं लागले. इकडे शिवरामभाऊंनीं घरांत जाऊन बाईसाहेबांस सांगितलें कीं, बाबासाहेब आमंत्रणास निघाले तुम्ही निघण्याची तयारी करा. नंतर बाबासाहेबांनीं सर्व कामाची व्यवस्था कशी लागली आहे, तें पाहून व राहिलेलीं कामें चांगलीं करण्याविषयीं ताकीद देऊन, बापूजी देशपांडे व नारायणराव यांस सर्व कामाची देखरेख ठेवण्यास सांगून आपण दुसऱ्या मंडळीसह गाडींत बसून वाजतगाजत आमंत्रणास निघाले. याचप्रमाणें बाईसाहेब, काशीबाई, सीताबाई याही गाडींत बसून त्यांच्या समागमें चालल्या.

सूर्यक्षितिजावर येऊन त्याचा येवढा मोठा दिसूं लागला. धंदेवाल्यांनीं आपापलें दिवसाचें काम पुरें करून धंदे आटोपून घरोघर जाऊं लागले. आपापलीं कामें आटोपून, खांद्यावर कुदळी व कमरेस कोयता अडकवून शेतकरी गांवांत येऊं लागले. गुरांचे कळप पुच्छें उभारून, उड्या मारित मारित गोठ्यांत येऊं लागले. चोहोंकडे दीप लागले. थंडी वाजूं लागली. भाज्यांच्या राशी पडल्या. दुधानीं भांडीं भरलीं. गवळी आणखी दूध घेऊन येत होते. मागील मंडपांत आचारि मोतीचुराची कळी पाडीत होते, कोणी पाक करीत होते; व कोणी कळ्या मधून लाडू बांधित होते.

इकडे घरांत स्त्रिया भाज्या निवडीत, कोणी वटाटे सोलून ते चिरीत, कोणी केळीं सोलीत व कोणी फणस कापीत बसल्या होत्या. कोणी आमटीचे व कोणी

---

१ ही यादि पुस्तकाचे शेवटीं दिली आहे. २ भाज्या निरनिराळ्या [illegible] असाव्यात.
३ आसपासच्या गांवीं आपली स्वतःची मालकी असल्यास तिकडेही प्रयोजनार्थ [illegible] पाठवीं.

भाज्यांचे मसाले तयार करित, कोणी नारळ खीणीत, कोणी खोबरें किसीत आणि कोणी इकडून तिकडे व तिकडून दुसरीकडे फिरत होत्या. मंडपांत पुरुषमंडळी काहीं भाज्या चिरीत आहे, कोणी पानसुपारी खात आहेत कोणी गुडगुडी ओढीत आहे, कोणी एकमेकांची थट्टामस्करी करीत आहे, कोणी त्रयोदशगुणी विडे करून ते तबकांत भरीत आहे व कोणी बापूजीस मस्करीनें ह्मणत आहेत कीं, बापूजी तुह्मास काय सांगावें? अहो, या तबकांत पानें तर मुळींच नाहींत! तीं चांगलीं कळीदार आणा पाहूं! त्यांत तंबाखूही अगदींच नाहीं, तो चांगला जर्दा घेऊन या! ही गुलाबदानी कशास पाहिजे! धंडी का वाजत नाहीं! त्याबद्दल अत्तरदानी आणा! ह्मणजे तें अत्तर तरी आंगास लावूं? हे लखलखीत तांबे पाण्यानीं भरले आहेत; त्या बद्दल कॉफी अथवा चहा करवा! मंडळीस जाग्रण होईल.

इकडे माडीवरील दिवाणखान्यांत पक्कान्नां करितां सामान यादीप्रमाणें मोजून ठेवीत होते. कोणी बदाम फोडीत, कोणी वेलदोडे सोलून त्यांची पूड करीत, कोणी साखर निवडीत, कोणी बेदाणा निवडून तो साफ धुऊन ताटांत भरीत, व कोणी केशराची पूड करीत, अशा निरानिराळ्या कामांत बहुतेक मंडळी गुंतली होतीं. मागील चौकांत केळीच्या पानांचे भारे पडले होते. तेथें कांहीं मंडळी पानें कापीत होती, कोणी तीं पुसून त्यांचे पुडके बांधीत, व कोणी द्रोणाचे तक्के कापून द्रोण करीत होते. त्याचप्रमाणें हौदावर गडी शीसवि व सायली लाकडाचे पाट साफ धुऊन कोणी ते पुसून चौकांत निट रचून ठेवित होते. या प्रमाणें पुरुष मंडळी, स्त्रिया व गडी माणसें निरनिराळ्या कामांत गुंतलीं होतीं. बळवंतराव व शिवरामभाऊ हे आचारी पक्कान्नें करीत होते तेथें जाऊन त्यांचीं कामें कोठ पर्यंत आलीं हें पहात होते.

**बळवंत०**—कां अप्पा, कोठपर्यंत आलें. आठ वाजून गेले. अद्याप तुमचें काय काय व्हावयाचें आहे?

**अप्पा०**—महाराज मोतीचूर, बुंदी, केशरी करंज्या व अनरसे हीं पक्कान्नें तयार झालीं. फक्त या बुंदीच्या कळ्यांचे लाडू वळावयाचे आहेत. तेवढे वळले ह्मणजे आह्मी स्वस्थ झोंपीं जाणार. पहाटेस चार वाजतां उठून, चुली पेटवून प्रथम स्वयंपाक करून नंतर जिलब्या व केशरीभात करावयास लागूं. आपण आठ वाजतां पानें मांडा. मजकडून अगदीं खोटी होणार नाहीं. मंडळी मात्र आली पाहिजे.

**शिवराम०**—वाहवा! नरसिंग भट, शाबास. तुह्मी फार मेहनती व चपल

आहां. ईश्वरकृपेनें सर्व पक्वान्नें कशीं आटोपलीं !! असो. तुमच्या मेहनती प्रमाणें तुमची बिदागी होईल.

नरसिंब०—महाराज, तुह्मीच पहा. आमचें काम धगीजवळचें ! सर्व शरीर तप्त होऊन जातें. त्यांत जरासा का कामांत आळस केला, तर पदार्थांचा नाश होऊन आपलें नुकसान होणार, मग आमचा काय उपयोग? ह्याकारितां फार संभाळून काम करावें लागतें. त्यांत हजार पानांचा समारंभ ह्मणजे फारच मेहनतीचें काम! आपण यजमान समर्थ आहां. आपल्यास सर्व कळत आहेच.

बळवं०—तुह्मास आह्मी खुष करूं. हें काम तसेंच पुरें करून मनासारखा बेत उतरून द्या !

आप्पा०—त्याबद्दल आपण कांहीं काळजी करूं नये.

या प्रमाणें तपास करित होते, इतक्यांत बाबासाहेब आमंत्रण करून परत आले.

पूर्व रात्र निघून गेली. थंडी आंगास झोंबूं लागली. सर्व कामें आटोपून सर्व विश्रांति घेण्यां कारितां जेथें बसले होते तेथेंच झोंपीं गेले. बाबासाहेब पोषाख उतरून सर्व व्यवस्थेचा तपास करूं लागले. त्यांनीं प्रत्येक काम किती आटोपलें हें पाहून राहिलेलें काम करण्यास ताकीद केली. याप्रमाणें सर्व कामांचा तपास केल्यावर थोडीशी विश्रांति घेण्यास तेही झोंपीं गेले.

पहिला कोंबडा आरवला तोंच आचारी धडपडत उठले आणि हौदावर स्नान करण्यास गेले. तों इकडे बाबासाहेब यांची स्वारी नुकतीच उठून प्रातःस्मरण करीत करीत व बापूजी वगैरे मंडळीस उठवीत मागील चौकांत गेली. तेथें जाऊन पाहतात तों आचाऱ्यांनीं चुलींत पेटवणें घातलीं होतीं. तिकडे हौदावर पाणी तापून तयार होतें. कांहीं स्त्रिया स्नान करीत होत्या. इकडे मंडपांत गडी सडासारवण करण्यांत गुंतले होते. याप्रमाणें होतां होतां सौफ उजाडलें. बाबासाहेब स्नान करून पूजा वगैरे आटोपल्यावर मंडपांत येतात तों कणा रांगोळी काढण्यास नेमिलेली मंडळी येऊन त्यांनीं त्या कामास सुरवात केली होती. नंतर कांहीं वेळानें गांवांत पहिलें आमंत्रण गेलें. इकडे आचारी यांचा बहुतेक स्वयंपाक आटपत आला, व बापूजी देशपांडये वाढण्यास लागणारीं लहान मोठीं भांडीं आपल्या वेळेस अडचण न पडावी ह्मणून जमवून तीं स्वच्छ धुवून ठेवीत होते.

१ समोरा समोर दोन पंगती कराव्या. प्रत्येक पंगतीला कण्यासुद्धा जागा ३॥ फुट पाहिजे व त्याशिवाय त्यामधील जागा ३ फुट पाहिजे. एकंदर दोन पंगतीस जागा १० फूट रुंदीची असल्यास दाटी होत नाहीं.

कांहीं मंडळी केशरी गंध तयार करण्याकडे लागली होती. याप्रमाणें चोहोंकडे अगदीं धामधूम उडून राहिली होती.

असें इकडे चाललें आहे तों बाबासाहेब बाईसाहेबांसह उभय व्याह्यां कडे जाऊन त्यांस व त्यांजकडील मानकऱ्यांस आमंत्रण देऊन परत आले.

आठ वाजण्याचे सुमारास कुणा रांगोळी काढून कोणी केळीचीं पानें व द्रोण मांडूं लागले. कोणी उदबत्त्यांचीं झाडें व सोंगट्या ठेवूं लागले. मंडळीस दुसरें आमंत्रण पाठविलें. थोडी मंडळीही जमूं लागली. इकडे आच्याऱ्यांनीं जिलबी करण्यास सुरुवात केली, व केशरीभात चुलीवर चढविला.

असें होतां होतां नऊ वाजून गेले. बहुतेक मंडळी जमली. कांहीं मंडळी कोणी लाल, कोणी पिवळ्या व कोणी जांभळ्या रंगाचे पितांबर नेसून कासा मारून, गळ्यास रुमाल गुंडाळून वाढण्याकरितां तयार झाली.

इकडे माडीवरील दिवाणखान्यांत मंडळी अगदीं भरून गेली. बहुतेक मंडळी जमली असें पाहतांच व्याह्यांकडे शिवरामभाऊ बाबासाहेब त्यांस आणावयास गेले. चौकांत मंडळीस पाय धुण्याकरितां पाण्यानीं भरलेलीं गंगाळें ठेऊन तेथें पाट मांडिले होते. मंडळी पादप्रक्षालन करून सोंवळी होऊन मंडपांत येऊं लागली. त्यांस प्रत्येकाच्या योग्यतेनुरूप बाबासाहेब बसवीत होते. सर्व बसल्यानंतर त्यांस केशरीगंध लावण्याची सुरुवात झाली. व्याह्यांकडील मंडळी वाजत गाजत मोठ्या समारंभानें वाड्यांत येऊन दाखल झाली.

मंडळीनें[3] मंडप व चौक भरून गेले. भाताच्या मुदा ठोकल्या. वरण वगैरे वाढून झालें उदबत्त्या पेटवून लाऊं लागले. व्याही व त्यांजकडील मानकरी पितांबर नेसून मंडपांत आले. त्यांस बाबासाहेबांनीं पानांवर बसविलें.

गंध लावण्याचें कोणी राहिलें नाहीं व सर्व मंडळी पात्रांवर बसली असें पाहून "हर! हर! हर! महादेव!!!" असा जयजयकार होतांच सर्व मंडळी चित्राहुति घालून व प्राणाहुति घेऊन जेवूं लागली.

---

१ व्याह्यास समारंभाचें दिवशीच आमंत्रण देण्याचा परिपाठ फार दिसोन येतो यास्तव येथें लिहिला आहे.

२ बहुतेक मंडळी जमल्यावर भात करावा. अगोदर केल्यास तो निवून जातो.

३ मंडळी मंडपांत जमूं लागल्या वर यादीवरून कोण कोण आले हें पहावें, व जे आले नसतील त्यांस बोलावणीं पाठवावीं. मंडळी बसेपर्यंत ते न आल्यास दुसऱ्या पंक्तीचे यादींत त्यांचीं नांवें लिहावीं. मंडळीचे यादींत प्रत्येक घरांतील यजमानाचें नांव असावें. अशा यादि प्रत्येक गांवांतील गृहस्थांनीं करून ठेविल्यास फार चांगलें आहे.

अहाहा ! ! काय त्या स्थळाचें त्या वेळचें वर्णन करावें ! हें [illegible] ज्याच्या अस्तोदयानें समजतें तो गोलाकार, लाल, तेजःपुंज जगच्चक्षु पीतनाभ-ध्येत येत आहे. मंडपाचें छताच्या लहान छिद्रांतून लहान लहान गोला-कार किरणें लाल भडक गुलालावर शुभ्र रांगोळीनें काढिलेल्या मोर वगैरे चित्रांवर पडून तीं चकाकत आहेत. केळ्युक्त मेहरपीमध्यें पक्वान्नांनीं भरलेलीं हि-रवीं चार केळीचीं पानें विराजमान दिसताहेत. उदबत्त्यांनीं भरलेलीं झाडें ठिकठिकाणीं ठेविलीं होतीं, त्यांचा घमघमाट सुटला आहे. ज्यांच्या मुखश्रीवर वृद्धदशेचीं चिन्हें दिसत आहेत, ज्यांच्यावर तारुण्याचा पूर्ण अमल बसला आहे, व ज्यांचे मुखकमलांवर तारुण्याची लकेर मारित आहे, अशा त्रिवेणी संगम झालेल्या मंडळींनीं तो मंडप शोभायमान दिसत आहे. वरण भात संपून मं-डळीचे हात पक्वान्नांकडे जात आहेत. वाढणारी मंडळी कोणी ताटांत, लाडू, कोणी, केशरी भात, कोणी जिलब्या, कोणी मठ्ठा व कोणी तुपाच्या तपेल्या घेऊन वाढीत आहे. बाबासाहेब व बळवंतराव हातांत चांदीचे प्याले घेऊन इकडून तिकडे मंडळीची प्रार्थना करित फिरत आहेत. कोणी संस्कृत श्लोक, आर्या व कोणी प्राकृत श्लोक, दिंड्या पदें ह्मणत आहेत. तसेंच आऊगुजें; आणि सनया, पांवून कर्णास आनंददायक सुस्वर निघत आहेत. वधुवरें, एकत्र वहुल्यावर बसलीं आहेत. त्यांस एकमेकांस भरवा ह्मणून मंडळी सांगत आहे. व तीं भरवीत आहेत.

इकडे मागील चौकांत स्त्रियांचीं पानें मांडिलीं होतीं. स्त्रियांस आमंत्रणें जाऊन त्या जमूं लागल्या होत्या. त्यांस बैठकीस माडीवरील दुसऱ्या दिवाण-खान्यांत बैठक घातली होती. स्त्रिया जमूं लागल्या, असें पहातांच वाढण्यास सुरु-वात झाली, व विहिणींस आणण्यास सीताबाई बाबांसहित गेली.

इकडे मंडपांत श्लोकांची फारच धामधूम चालली. मंडळी एकमेकांवर भंडी लावूं लागले. इतक्यांत भात आणण्याची सूचना झाली त्याबरोबर भात व मठ्ठा वाढण्यास आला; व नंतरपाणी वाढूं लागले. सर्वांचें आटो पलें, असें पाहतांच आरंभाप्रमाणें जयजयकार होऊन सर्व मंडळी उठली. मंडपाचें दारांत साखर व लवंगा वगैरे सामान घेऊन मंडळी उभी होती, तें

---

१ मठ्ठा—पहिले दिवशीं दूध विरजणी घालून गोड दहीं करावें. नंतर त्यांत साखर (गोडपणा येण्यास.) व केशर घालून तो तयार करतात आणि तो [illegible] वाढल्यावर [illegible]. ह्मणजे त्याचें [illegible] मिष्ट पदार्थ खाण्यास कंटाळा लौकर येत नाहीं. ( ही [illegible] [illegible] आहे. व [illegible] कोंकण लोकांस हा पदार्थ काय आहे हें माहितच नाहीं असें दिसून येतें. )

घेऊन मंडळी आंचवावयास गेली. आतां आपण स्त्रीमंडळीकडे वळूं.

विहिणी वाजत गाजत आल्यावर दिवाणखान्यांत बसल्यानंतर सोप्यांत चौरंग मांडून, त्यावर त्यांस बसविलें आणि त्यांचे पाय विहिणीनें बजरीनें व खोबऱ्याचें वाटीनें घांसून, उष्णोदकानें धुतले. सर्व स्त्रिया पादप्रक्षालन करून रेश- मीं वस्त्रें परिधान करून पात्रांवर बसल्या. कोणी यावयाचें राहिलें नाहीं असें पाहून बाईसाहेबानीं "बसा" असें सांगतांच जेवूं लागल्या.

इकडे पुरुष मंडळी दिवाणखान्यांत जमल्यावर त्यांस विडे दिले. नंतर पानसुपारी, अत्तरगुलाब, हारगजरे वाटल्यावर मंडळी उठून आपापले घरीं गेली. उभय व्याह्यांस वाजत गाजत घरीं पोंचविलें.

स्त्रियांचें भोजन आटोपल्यावर त्यांस विडे दिले. नंतर सर्वांस पान- सुपारी, अत्तरगुलाब दिल्यावर त्या घरीं गेल्या व विहिणीस वाजत गाजत घरीं पोंचविलें.

याप्रमाणें स्त्रीपुरुषांचीं भोजनें झाल्यावर वाढणारी मंडळी, व पहिल्या पंक्तीला न आलेले, त्यांची पंगत बसली. त्याच प्रमाणें वकील व पुणे यांजकडील शिपाई, दास दासी, पाणके आचारी, वाजंत्री व चौघडेवाले यांस बोलावून सर्वांचीं भोजनें झालीं.

येथें पोट भाग ३ रा पुरा झाला. आतां यापुढील फारच मनोवेधक प्रकार पुढील भागीं सांगूं.

---

१ यावेळेस परस्पराकडील ( वधुवराकडील ) करवल्या वगैरे एकमेकींस उखाणे घालतात. हा कुळाचार आहे.

# पोट भाग ८ था.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें भोजनसमारंभ उभयपक्षीं मोठ्या समारंभानें झाल्यावर रासनहाण व तोंडधुणें हा लहानसापण टुमदार प्रकार होण्याचा राहिला. हा प्रकार वधुपक्षाकडून वरमातेस व्हावयाचा असतो. तेव्हां असे दोन प्रकार, एक बाबासाहेब यांजकडे व दुसरा पुणेकर यांजकडे, व्हावयाचे होते. उभयपक्षीं भोजनसमारंभ आटोपल्यानंतर, एके दिवशीं, बाबासाहेब यांजकडे, तो दुसऱ्या दिवशीं करण्याचा विचार ठरून, त्याची तयारी होऊं लागली.

लग्नसमारंभाच्या थाटांतील, हें कृत्य खेरीज करून बाकीच्या सर्व कृत्यांत वधुवरें, करवल्या, व्याहि व विहिणी या सर्वांच्या मानापमानाचा संबंध असतो. परंतु या कृत्यांत वरमाता व तिच्या मानकरिणी यांचाच मान राखावा लागतो. आणि एकंदरीनें पाहतां सर्व लग्नसमारंभांत वरपक्षाकडील मंडळीचें नाक वरतीच असतें. तशांत या कृत्यांत तर विहिण व तिच्या मानकरिणी या जशा पट्टराण्या बनून जातात. व त्यांनां त्यांच्या मर्जीप्रमाणें संस्कार घडावे अशी केवढी मोठी उमेद असते! त्यानां किती मान येतो! तो त्यांचा मान संभाळतां संभाळतां त्या बिचाऱ्या मुलीच्या आईला व तिच्या मानकरिणींला मोठी पंचाईत पडते. असो.

हा थाटमाटाचा समारंभ व्हावयाचा होता, म्हणून वकीलांच्या घरापासून बाबासाहेबांचे वाड्यापर्यंत ठिकठिकाणीं दारूकामाचीं झाडें वगैरे लाविलीं. व थेट वाड्यापर्यंत रस्त्याचे दुतर्फा ग्लासांच्या कमानी व झाडें उभी केलीं. बांगड्या भरणारा कासार यास रात्रौ चांगला उत्तम माल घेऊन येण्याची ताकीद दिली. व त्याच प्रमाणें परीट यास पायघड्या घालण्याकरितां पांढरे शुभ्र चादरी घेऊन येण्यास सूचना करविली. इकडे मागील हौदावर स्नानमंडपांत एक छानदार मखर घालण्याचें व तेथें रोषनाई करण्याचें काम चाललें. तसेंच माडीवरील दिवाणखाण्यांत बैठक घालून तेथेंहि उत्तम प्रकारची रोषनाई करीत होते. इकडे गांवांतील स्वज्ञातीच्या स्त्रियांस रासनहाणाचें आमंत्रण करण्यास बाईसाहेब यांही सिताबाईस व एका दासीस पाठविलें. याप्रमाणें तयारी चालली आहे, तों इकडे बाईसाहेब तोंडधुण्याचें सामान तयार करीत होत्या तें सामान येणें प्रमाणें:—

## तोंडधुण्याचें सामान.

### विहिणीला देण्याचें.

**सोन्याचें:**– हातांतील बांगड्या. (जोड दोन.). डोकींतील फूल.

**हळदीकुंकवाचा सरंजाम:**–तबक, वाट्या दोन ( हळदीस व तेलास. ) करंडे दोन (कुंकवास व मेणास), दांतवण ठेवण्यास आंबा, कळी व लवकडी, पश्री, जीभ ओकी, खुंटा, आरशी, फराळाचें सामान ठेवण्यास ताटें. तबकें, वाट्या, तांब्या, जांब.

**पितळेची व तांब्याचीं भांडीं:**–घागर, तस्त, तांब्या, घंगाळ, पिकदाणी.

**इतर सामान.**–चौरंग, चवरी, छत्री, अबदागिरी, फणि ( हस्तीदंती. ) हात पुसण्यास रुमाल, पांच प्रकारचे लाडू, फराळाचे पदार्थ ( फळफळावळ व मिठाई पक्वान्नें. वगैरे )

**इतर उपयोगी सरंजाम.**–स्त्रियांस वाढण्यास पांच प्रकारचे लाडू व फराळाचे पदार्थ, डोक्यांत घालण्याच्या सुवासिक फुलांच्या वेण्या, सुगंधिक तेल, हळदी कुंकवाचें साहित्य, ओट्यांचा संरजाम ( पुष्कळ पाहिजे. ), हारतुरे वगैरे, पानसुपारी, तांदुळ, विडे ( केलेले, ) गुलाल व केशराची उटी.

याप्रमाणें सर्व सरंजाम तयार करीत आहेत तों इकडे मागील मंडपांत कांहीं स्त्रिया खोबऱ्याचीं दुधें काढीत व कोणी नारळ फोडून ते खोंणीत होत्या. कोणी दूध कढवून ठेवित होत्या. सुगंधिक उटणीं, मोगरेल वगैरे सुवासिक तेलांत कालवून ठेविलीं होतीं, त्यांचा घमघमाट सुटला होता. कोणी सुवासिक उदाची भुकणी करून ठेवित होत्या. अशा त्या सुगंधिक वासानें तो सर्व वाडा दणाणून गेला होता.

नऊ वाजून गेले. धोबी पायघड्यांचें कापड घेऊन आला. चौघडा गाडीवर चढविला. ताशांचे व वाजंत्र्यांचे जोड आले. वाद्यें वाजूं लागलीं. स्त्रिया अलंकार घालून, वस्त्रें परिधान करून सिद्ध झाल्या. अशी सर्व तयारी झाल्यावर मशाली पेटविल्या. बरोबर न्यावयाचें सामान गड्यांच्या डोक्यांवर दिलें. छत्री, अबदागीरी, चवऱ्या व नक्षत्रमाळा बरोबर घेतल्या. नंतर सर्व स्त्रिया त्या सरंजामासह वकीलांच्या मंडपीं गेल्या.

तेथें गेल्यावर मुलीकडची स्त्री मांडवघराच्या दारात उभी होती, तिनें विहि-णीस हात धरून बैठकीवर नेलें. परस्परांचे नमस्कार झाल्यावर सर्व स्त्रिया खालीं बसल्या. नंतर तेथें मध्यस्थानीं टाकून ठेवलेला चौरंग मांडून त्यावर मुलाच्या आईस बसविलें. मुलीच्या आईनें तिची वेणी घालून सोन्याचें फूल व सुवासिक फुलांचे गजरे घातले. नंतर विहिणीस तोंड धुण्यास तबकडींत दातवण दिलें. तिनें दांत घासल्यावर जिभ ओकण्याकरितां जिभशोंकी दिली. त्याप्रमाणें विहिणीनें तोंड धुतल्यावर तिचे व मानकरिणींचे पाय मुलीच्या आईनें धुतले. सर्वांचे पाय धुतल्यावर हळदकुंकू देऊन केशरी गंधाच्या उट्या लाविल्या, व ओट्या भरल्या. नंतर विहिणीस व तिच्या मानकरिणींस फराळाचे पदार्थ वाढून पात्रें तयार केलीं व त्यांस फराळ घातला. फराळ आटोपल्यावर त्यांस विडे दिले.

फराळ आटोपल्यावर सर्व स्त्रिया पोतनिसांचे वाड्यांत पायपास निघाल्या. ओसरीच्या पायऱ्यांपासून परीट पायघड्या घालीत चालला. त्यांजवरून मुलाची आई सर्वांच्या पुढें चालूं लागली. तिच्याबरोबरीनें तिच्या तरुण लेकी व त्यांच्या समवयस्क मैत्रिणी चालत होत्या; व त्यांच्या मागून इतर सर्व मानकरिणी वगैरे व बाईसाहेब वगैरे वधुपक्षाकडील स्त्रिया चालत होत्या. वरमातेवर अबदागिरी व छत्री धरीली होती. कित्येक दासी तिच्यावर चवऱ्या वारीत होत्या. ती ठिकठिकाणीं चौरंगावर बसे. तिला वधूची आई हळदकुंकू देवून तिची नारळ व तांदूळ यांनीं ओटी[1] भरी. नंतर ती पुनः चालूं लागे. या वेळीं त्या युवतिसमूहास जें सौंदर्य आलें होतें व तो कसा दिसत होता याचें वर्णन जितकें करावें तितकें थोडेंच. परंतु त्या वेळेस तारुण्यबहरानें रसरसलेली प्रत्येक तरुणी पुढील वर्णनाप्रमाणें हृदयंगम दिसत होती:—

## साकया.

॥ मूद, राखडी, केतक शोभे चंद्रकोर नग भांग ॥ बुचड्याभोंतीं गजरा शोभे झाकि फुलांचा भाग ॥१॥ मौक्तिकजाळी बिंदि बिजवरा, चंद्रसूर्य मधिं नाग ॥ सिंदुरविलसित सुंदर दिसतो रेषेपरि तो भांग ॥२॥ बुगड्या, बाळ्या, कर्णफुलेंही मोरांचे ते काप ॥ कितिक दागिने शुभ्र हिऱ्यांचे पाहतां देती ताप ॥३॥ चंपक—कलिका सरल—नासिकेमार्गी नथ सरज्याची ॥ हिरेजडित त्या टिक्का कोंदणें चमकत होतीं जियेच्यीं ॥४॥ अधर बिंबवत, कज्जल भृकुटी कनक वर्ण ती काय॥ सौंदर्योदधि मथून

१ या ओटीची वरमातेच्या मानकरिणींस ही भरण्याची चाल आहे. या सर्व ओट्या वरदी-णीस देण्याची रूढी आहे. म्हणजे वरमातेनें ओटी घेतली कीं ती वधूदेणीला देतात.

मुखेंदू विधी काढि कीं काय ॥५॥ अथवा सौंदर्याब्धिच वाटे नग नग मोत्यें ज्यांत ॥ ळज्जित चंचळ लोचन फिरती मीनचि अणूं कीं त्यांत ॥ ६ ॥ माळा कंठीं चंपककलिका, मोहुरा, पुतळ्या सांचीं ॥ ठुशी, गरसळी, पोत, तन्मणी, मौक्तिकपेटी साचीं ॥ ७ ॥ हातीं तोडे गोठ पाटल्या कंकण रुणझुण वाजे ॥ वांकी दंडावरती, सुंदर चोळि भर्जरी साजे ॥ ८ ॥ कनकलतेच्या उरस्थळीं ते सुंदर दिसती झेले ॥ पाहुनि सौंदर्याते तोहि हार अचेतन होले ॥९॥ बुट्ट्यांचा कामळी शालु त्या स्तनयुग्मावर साजे ॥ घोळ निऱ्यांचा पायांमधुनी कडकत बहुत विराजे ॥१०॥ गौर पोटऱ्या सरळ कर्दळीस्तंभापरि . ऊरूही ॥ जिच्या कटीतें पाहुनि होई सिंहागाची लाही ॥११॥ सुरेख नखरें नक्षत्रें कीं शोभति मृदु चरणांचीं ॥ कुलपी तोडे मासोळ्याही गेंद फुलें हौसेचीं ॥ १२ ॥

रात्रीनें आपला पती चंद्र हा क्षीण तेज झाला असें पाहून ती आपलें वर्चस्व प्रगट करीत चालली. अशावेळीं वाऱ्याची गार व झुळूक सुटली होती; वाद्यांचे स्वर मधून निघत होते; चोहोंकडे मशालींचा प्रकाश पडला होता; मधून मधून दारुकाम सुटत होतें; नळे उंच उंच उडत असून त्यांतून लहान मोठीं फुलें पडत होतीं; ठिकठिकाणीं दारूचीं झाडें लाविल, त्यांतून कांहीं फिरत, व कांहींकांतून चमत्कारिक रंगाचे गोळे बाहेर पडत, आणि मोठमोठे आवाज होत. रंगीत हक्यांचा प्रकाश डोळ्यांस दिपवित असे. त्यांत चोहोंकडे गुलाल उधळीत, त्यामुळें कांहींच दिसत नसे. वर मातेवर चवऱ्या ढळत होत्या, नक्षत्रमाळा चकाकत होत्या. वाचकहो, त्यावेळीं त्या स्त्रीमंडळीची स्थीति लक्षांत आणिली ह्मणजे कविमुकुटमणि कालीदास याच्या मेघदूत नामक काव्याचे पद्यरत्नावळी नामक भाषांतरांतील खालीं लिहिलेल्या वाक्यांचें स्मरण होतें:—

चरणीं वाजति मंजुळ पैंजण त्या करितां नृत्यातें, ॥
करीं धरूनी चातुर्ये त्या डोलविती चवऱ्यांतें ॥१॥
नानापरिचीं रत्नभूषणें झळकति बहुत तयांचीं ॥
श्रमें होउनी लाल शोभती सुंदर वदनें साचीं ॥ २ ॥
ठायीं ठायीं फुलें सुटोनी माळांतुनि पडलेलीं, ॥
कोठें कोठें गुलाबपुष्पें वेण्यांतुनि गळलेलीं ॥ ३ ॥

अशी त्यांची स्थिति व त्यावेळचा रमणीय आनंददायक देखावा तोंडानें कितीही सांगितला, लेखणीनें कितीही लिहिला, तरी पुरा होणार नाहीं.

असो. हा ( तोंडधुणें व रासनहाण ) समारंभ कन्येचे पक्षाकडून वरमातेस व तिच्या मानकरिणींस होतो, परस्परांस होत नाहीं. याचें कारण व यांत हा एवढा मान वरमातेस देण्याचा हेतु काय आहे, हें बहुतेकांस माहित असावें असें वाटतें. सर्व लग्नसमारंभांत वरमातेचा मान मोठा असतो, तरी पण हा समारंभ फार मान्यतेचा मानिला आहे. शोध करितां याचें कारण असें आढळून येतें कीं, पुत्रप्राप्तीच्या वेळीं प्रसूतसमयीं व गर्भावस्थेंत तिला ( वरमातेला ) जें दुःख सहन करावें लागतें तें निवारण्याकरितां तिला हा मान देणें आहे. यावेळेस हा मान मिळाल्याच्या योगानें तिला त्या सर्व दुःखाचें विस्मरण होतें. याबद्दल मयूर कवि म्हणतात:—

संस्कृतिदुःख विसरवी सत्संगति मतिस जेवि काय घडी॥
वरमायेसि विसरवी चवरी चवरंग गुलाल पायघडी ॥१॥

अर्थ:— सज्जन संगतीनें जसे कुविचार नाहींसे होतात, त्याप्रमाणें मुलाच्या मातेस प्रसूत काळच्या झालेल्या दुःखाचा परिहार चौरी, चौरंग, गुलाल व पायघड्या वगैरेनीं होतो.

असो. हा स्त्रीमंडळाचा जमाव अशा थाटानें वाड्यांत येऊन दाखल झाल्या नंतर सर्व स्त्रिया दिवाणखान्यांत गेल्या. तेथें गांवांतील स्त्रिया जमल्या होत्या. प्रथम विहिणीकडील मानकरिणी स्त्रियांस बांगड्या भरण्याचें काम सुरू झालें. दुसरीकडे गांवांतील स्त्रियांस बांगड्या भरित होते. जवळ बाईसाहेब बसल्या होत्या. त्या प्रत्येकीच्या आवडी प्रमाणें बांगड्या भरवीत होत्या. बांगड्या भरल्यावर नहाण होत असें. सर्व मानकरिणी स्त्रियांस बांगड्या भरल्यानंतर विहिणीस चौरंगावर बसविलें. बाईसाहेब जवळ बसून त्यांनीं उंची बगांड्या भरविल्या. राजवर्खी वगैरे उंची बांगड्या भरल्या नंतर सोन्याच्या बांगड्या भरिल्या.

बांगड्या भरल्यावर, विहिणीस मागील चौकांत जेथें कित्येकांच्या अंगांस दासी उटणीं लावित होत्या, कोणी केंसास दूध लावित, कोणी नहाण घालित व कोणी केंस उदवीत होत्या, तेथे नेलें. नंतर चौपाट काढून, चौरंग मांडून त्यावर विहिणीस बसविलें. दासी अंगांस सुगंधिक उटणीं व सुवासिक तेलें लाऊं लागल्या, कोणी केसास मसालेदार दूध लावित होत्या. अंगांस लावण्याचें पुरें झाल्यावर विहिणीस नहाण्यास हौदावरील मंडपांत नेलें.

मंडपांत केळीचें मखर घालून आरास केली होती, व मोठा हिंदोळा बा-

---

१ हा आपल्या सामर्थ्याप्रमाणें असाव्यात.

घून उष्णोदकाची घंगाळें ठेविलीं होतीं. येथें विहिणीस हिंदोळ्यावर बसविलें. दासी अंगावर पाणी ओतूं लागल्या[1], कोणी अंग चोळूं लागल्या व कोणी केस विंचरूं लागल्या.

तो पहाटेचा समय असून वारा झुळूझुळू वहात होता. चोहोंकडे दिव्यांचा लखलखाट पडला होता. उंच उंच केळीचे स्तंभ उभे करून सभोंवतीं आशोक पल्लवाच्या झालरी लाविल्या होत्या. मधून मधून गुलाब, जाईजुई वगैरे फुलांचे हार लटकत होते. त्यांचा घंम् घंम् सुवास सुटला होता. विहिणींचें स्नान चाललें होतें म्हणून वाद्यें वाजत होतीं. आलगुजाचे स्वर फार मंजुळ निघत होते. उटण्यांचा व अत्तरांचा घमघमाट सुटला होता. आणि मधून मधून हंड्यांचा पांढरा शुभ्र, लालभडक व हिरवा गार प्रकाश पडत होता. अशा वेळीं हा आनंदमय देखावा पाहून कोणाच्या दुःखाचा परिहार होणार नाहीं!

असो. विहिणींचें नहाण झाल्यावर त्यांस नवे लुगडे नेसावयास दिले. लुगडे नेसल्यावर सुवासिक उदानें केस सुकविले. नंतर सर्वांची नहाणें झाल्यावर गावांतील स्त्रियांच्या हातावर साखर दिली. आणि विहिणी व मानकरिणी स्त्रियांस फराळास बसविलें.

त्यावेळीं फराळाचा थाट चांगला केला होता. एकच गोष्ट वारंवार लिहिणें त्रासदायक होईल म्हणून त्याचें वर्णन देऊन वाचकांस त्रास देणें ठीक नाहीं. असो. फराळ झाल्यावर वरपक्षाकडील सर्वस्त्रियांस नेसवण्या होऊं लागल्या. प्रथम मुलाच्या आईस पैठणी आणि जरीचा खण देऊन दुसऱ्या मानकरिणींस यथानुक्रमें मानानें कोणास पैठणी, शेलारी, शालू व लुगडीं देऊन कांहीं लुगड्यांचा बस्ता बांधून दिला. नंतर पानसुपारी, अत्तरगुलाब देऊन ओट्या भरून सर्व स्त्रियांस वाजतगाजत घरीं पोंहचविल्या.

याठिकाणीं तोंडधुणें व रासनहाण पुरें झालें. आतां या लग्नसमारंभातील सरतेशेवटचा कथाभाग पुढील भागीं निवेदन करूं.

---

१ हिंदोळ्यावर बसऊन झेपा घालीत नहाण घालितात. अंबर घालून मखर बांधलेलें असतें परंतु त्या मंडपावर कारळ्याचा ताणा असला पाहिजे असा परिपाठ आहे. याचें कारणही शोधून काढिलां असें कळून आलें आहे कीं, पुत्रवती स्त्रियेस श्रावण महिन्यांत कारळाचे मंडपाखालून जाण्याची बंदी असते, करितां त्याचेकरितां हा बदला फेडावयाचा प्रघात आहे. याचप्रमाणें तांदुळाचें धुवणी रनान्याच्या जागेवर टाकून वरमाता त्यावरून ओलांडून जाते, याचें कारणही तेंच आहे.

# पोट भाग ५ वा.

## मांडव परतणें.

---

मागील भागीं सांगितल्याप्रमाणें पुणेकरप्यांजकडे तोंडधुणे रासनह्मण हा समारंभ मोठ्या थाटाचा झाला. आतां बहुतेक कार्य उरकलें आणि आमचे कर्ते यजमान व वन्हाडी हेही थकून गेले असतील व त्यांजबरोबर येथपर्यंत येऊन थबकलेले आमचे वाचक हे ही जरासें त्रासले असतील ह्मणून आतां थोडक्यातच आटपून घेऊन पुढील लहानसें भाग वाचण्यास विश्रांति देऊं.

पुणेकरांकडील तोंडधुणे रासनह्मण याचा समारंभ आटोपल्यावर बाबासाहेब यांहीं आप्तसगे, सोयरे, मित्रमंडळी वगैरे जें वन्हाड जमलें होतें त्या सर्वांस मानपानानें गौरवून त्यांची बोळवणी करण्याचा विचार केला. त्याचप्रमाणें आह्मीं आमच्या वाचकांची या भागापासून बोळवणी लवकरच करूं.

याप्रमाणें त्यांचा विचार ठरल्या नंतर कोणतीं कोणतीं पक्वान्नें करावयाचीं याबद्दलचा निश्चय करून त्यांचें सामान तयार करूं लागले. ( याबद्दलची सर्व माहिती पोट भाग २ रा यांत पहावी.)याप्रमाणें तयारीस लागल्या नंतर गांवातील आप्तसगे, सोयरे, धायरे मित्रमंडळी व कार्यांत ज्यांनीं मदत दिली त्या सर्व मंडळीस, भोजनाचें आमंत्रण देण्यास बाबासाहेब स्वत गेले. नंतर रात्री वकीलांकडे व पुणेकरांकडे जाऊन त्यांजकडील सर्व मंडळीस आमंत्रण दिलें. याजप्रमाणें बाईसाहेब स्वतः स्त्रियांस भोजनाचें आमंत्रण देऊन आल्या.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं स्वयंपाक तयार होत असता. मंडळीस आमंत्रण गेलें. बाबासाहेबांनीं प्रत्येकाचे पोषाख तयार करून ठेविले. मंडपांत कणा रांगोळ्या काढून पानें मांडिलीं. नंतर व्याह्यास आणावयास शिवराम भाऊ स्वतः गेले आणि वाजतगाजत त्यांजकडील सर्व मंडळीस घेऊन आले.

सर्व मंडळी जमल्यावर भोजन झालें. ( त्याचें वर्णन भाग ३ न्यांतील पोटभाग १ ला यांत पहा. )

भोजन आटोपल्यावर सर्व मंडळी दिवाणखान्यांत जमली. सर्वांस तांबूल देऊन पानसुपारी, अत्तरगुलाब व हारगजरे दिले. नंतर प्रथम दोन्हीं व्याह्यांस पोषाख दिले. जांवयाच्या गळ्यांत मोत्यांची कंठी घालून पोषाख दिला. त्यानंतर

सर्व मंडळीस ( त्यांजकडील मानकरी, आपले आप्तसंबंधी व मित्रमंडळी वगैरेस ) पोषाख दिले.

नंतर स्त्रियांचे भोजन झाल्यावर त्यांस कोणांस लुगडीं, खण व कोणास नुसतेच खण दिले.

याप्रमाणें व्याही व विहिणी यांची बोळवणी झाल्यावर त्यांजकडील व घरचे कारकून शिपाई, गडी, दासदासी वगैरे सेवक जनांस भोजन घालून पोषाख देऊन संतुष्ट केलें.

याप्रमाणें उभयपक्षकडील मांडवपरतणें वगैरे कर्में झाल्यावर लग्न समारंभ पुरे झाले असें समजावें.

परगांवाहून आलेल्या वऱ्हाडास जानोस्यास जें घर देतात त्या घराची यजमानांनी पूजा करावी, असा परिपाठ आहे. त्याचा प्रकार——लग्न कार्यांत जें सामान लागतें तें सर्व आपल्या सामर्थ्या प्रमाणें कम जास्त घेऊन त्यानें शिपतरें, ओटल्या भराव्या, व यजमानास पोषाख पागोटें शालजोडी, व त्यांच्या स्त्रिस लुगडें व खण आपल्या शक्तिनुसारें त्या सामानावर ठेऊन तो सर्व शिधा त्या घरांत देवाजवळ ठेवावा. ( यास जानोस घर पूजन ह्मणतात. )

दुसऱ्या दिवशीं बाबासाहेबांकडून पुणेकरांकडे मूळसाडा गेला त्याचा प्रकार:— ( याला " गोड भेट " असेंही ह्मणतात. )

मुलाची आई व दुसऱ्या कांहीं स्त्रिया वाजतगाजत पुणेकरांच्या मंडपीं गेल्या. तेथें गेल्यावर दोन चौरंग मांडून त्यांजवर मुलीस व तिच्या आईस बसविलें नंतर दोघींस हळदकुंकू देऊन लुगडीं व खण दिले. व ओटया भरून हातावर साखर व गूळ दिला. नंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकू देऊन ओटया भरल्या.

याचप्रमाणें वकीलांकडून बाबासाहेबांकडे " गोडभेट " आली.

याप्रमाणें लग्नसमारंभ निर्विघ्नपणें शेवटास गेले. व आमच्या बाबासाहेबांचा वाडा आजपर्यंत जो गजबजलेला दिसत होता. तो आतां सुना दिसूं लागला. त्याची ती मंगलदायक शोभा जाऊन तो आतां जरासा उदास भासूं लागला. चौघडा, वाजंत्री व वाद्यें यांचें तें वाजणें व त्यांतच घरांतील मुलाबाळांचा गोंगाट वगैरे सर्व आवाज बंद होऊन चोहोंकडून शांतमयवृत्ति दिसूं लागली. असें जरी होतें, तरी पण एकादा परकीय गृहस्थ सहज वाड्यावरून गेला तर त्यास येथें नुकतेंच मोठ्या थाटमाटाचें लग्न झालें असावें, असें वाटल्यावांचून रहात नसे. याचप्रमाणें घरांतील माणसें जीं आजपर्यंत इकडून तिकडे हिंडत असतांना दिसत होतीं तीं आतां बसलेलीं दिसत असत. ज्यांहीं उंची पोषाक केला आहे अशीं स्त्रीपुरुषें आतां रोजच्या साधाच पोषाख करून त्या लग्नसंबंधाच्याच गोष्टी

बोलत बसलेले दिसत असत, व त्यांच्या मुखकमलावर पूर्वीची आनंदमयवृत्ति दिसून येत होती त्यावर आतां जरा थकवा आला असला, असें वाटत असे. असो. याप्रमाणें आपल्या या सर्व मंडळीस "थकवा" आला होता. कोणतेंही कृत्य करण्याचें हातीं घेतलें ह्मणजे तें इच्छिल्याप्रमाणें निर्विघ्न रीतीनें शेवटास जाईपर्यंत तें करणाऱ्याच्या मनांत मोठी काळजी असते. आणि तें बऱ्या रीतीनें शेवटास गेलें, ह्मणजे त्याला फार समाधान व कृतकृत्यता वाटून ज्या जगन्नियंत्यानें त्याला मदत दिली त्याचे तो आभार मानितो. याप्रमाणें आपल्या बाबासाहेबांनीं परमेश्वराचे आभार मानून ते विश्रांति घेण्याकरितां अगदीं स्वस्थ बसले. आतां आह्मी पण आमच्या वाचकांस येथें विश्रांति देऊन हा लांबलचक भाग पुरा करून पुढील वृत्तांत सांगण्यास पुढील भागीं आरंभ करूं.

---

# भाग ४ था.

# वर्षांतील कृत्यें.

---

या ग्रन्थाचा कथानायक आत्माराम ह्याच्या जन्मकाळचा आनंदोत्सव पाहण्यास, लहानपणांतील इतर सोहळ्यांची मजा अवलोकन करण्यास, त्याचे ते बोबडे बोल ऐकण्यास, ज्याच्या व्रतबंधाचे कांपोव मिष्टान्नावर हात मारण्यास व त्यांतील मंगलकार्यांची मंगलमय शोभा पाहण्यास, त्याच्या लग्नसमारंभांतील संपूर्ण थाटाचा आनन्दमय घुटका घेण्यास वगैरे कार्यांस ज्या आमच्या वाचकांनीं निमंत्रित वेळीं मोठ्या उत्सुकतेनें येऊन कार्यसिद्धि केली, त्यानांच त्याचे पुढील सोहळे पाहण्यास आम्हीं निमंत्रण करितों, तें स्वीकारून पुढील होणाऱ्या कृत्यांत ते मदत देतील अशी आशा आहे.

( या भागांत लग्नझाल्यापासून एकावर्षाचे आंत जीं जीं कृत्यें करावीं लागतात तीं सर्व सांगितलीं आहेत. हीं सर्व कृत्यें फार भानगडीचीं नसल्यात ह्मणून थोडक्यांतच करून दाखविलीं आहेत. )

## पोवण.

माघमासीं लग्नकृत्यास आरंभ झाला तो सर्व बखेडा आटपतां आटपतां फाल्गुन महिना निघून गेला. इतक्या अवकाशांत आज एक महिनाभर थकलेल्या मंडळीस चांगली विश्रांतिही मिळाली. इकडे पुणेकरांचें सर्व वऱ्हाड पुण्यास जाऊन तेथील सर्व व्यवस्था लावण्यांत व विश्रांति घेण्यांत त्यांचाही फाल्गुन महिना गेला.

चैत्र महिना ह्मणजे अगदीं वसंत ऋतुचा बहार! जिकडे तिकडे झाडांना नूतन पालवी फुटून त्यांचीं तीं कोंवळीं पानें तांबुस व हिरवीं चार अशीं दिसतात. जाई, जुई, मोगरा, वगैरे फुलांचे ताटवे अगदीं नेहमीं गन्ध भरलेले दिसतात. आणि त्यावरून मंदगतीनें वहात असलेला तो सायंकाळचा शीत वायु सर्व दिवसभर उष्णतेनें तप्त झालेल्या शरीरास फार शांत करतो. परंतु वियोगानें विरहित झालेल्या विरहिणीस अथवा मदनानें व्यथीत झाला आहे व ज्याचे नेत्रपट

---

१ हा " वधूप्रवेशाचा " प्रकार आहे. लग्न कार्यांत जो वधूप्रवेश होत असतो, तसाच " वर " ज्या गांवीं रहात असेल त्या गांवीं " वधूस " तिच्या गांवाहून नेऊन तेथें हें कृत्य मुहूर्तावर करितात.

नेहमीं जणूं काय मीन आहेत, असें वाटावयाचे ते क्षीणतेज झाले आहेत, अशा विरही पुरुषाच्या अंगची तप्तता शांत न करतां जास्तच प्रज्वलित करतो. अशा या फुलांनीं गच्च भरलेल्या रुपेरी वेलीकडे जरा टक लावून अवलोकन केलें म्हणजे असें वाटतें, कीं जणूं वसंत राजाची स्वारी यावयाची आहे, म्हणून त्या मोत्यांचेंच सर्व अलंकार परिधान करून बसल्या आहेत. इकडे जरासें वर पहावें तर उंच उंच आम्रवृक्ष फलभारानें अगदीं वांकले आहेत. त्यांवरील तीं शेंदरी रंग आला आहे, व कांहीं पोंवळीं झालीं आहेत अशीं फळें पाहून असें वाटतें, कीं वृक्ष राजानें वसंत महाराजाची स्वारी थकून भागून येईल म्हणून त्यास उपहारा करितां सुंदर फळें तयार ठेविलीं आहेत. इकडे झाडांवर बसलेली कोकिळा त्याचे श्रम परिहार करावया करितां मधूर गायन करित आहे. या प्रमाणें जिकडे पहावें तिकडे महाराजाच्या सन्मानार्थ सर्व तयारी चालली आहे ती दिसून येते. अशी ही मजा अवलोकन करीत बाबासाहेबांच्या वाड्या समोरील त्यांच्याच बागेंत दोन गृहस्थ उभे होते. कडक उन्हाळा असल्यामुळें त्यांनीं अंगात एक पातळ व शुभ्र पेहरण घालून त्यावर अगदीं झिरझिरित कापडाचा अंगरखा चढविला होता. त्यांचीं धोतरें पांढरीं शुभ्र व पातळ असून त्यांवर गुलाबी रंगाची झांक मारित होती. पण तीं साधीं होतीं. त्यांचे डोक्यांत पांढरे शुभ्र जरीचे पटके होते. व हातात बारीकशा काळ्या रंगाच्या व ज्यांला तांबडे गोंडे लाविले आहेत, अशा काठ्या होत्या. त्या उभयतांचें वय वीस वर्षांहून जास्त तर नव्हतेच. त्यांचा वर्ण शुभ्र असून तोंडावर लाली दिसत होती. त्यांच्या शरीराचा बांधा ही फार नामी होता. त्यांपैकीं एक जरा गर्विष्ट असावा, असें त्याची मुद्रा दाखवीत होती. बाकी त्यांचे स्वभाव सारखेच असावेत असें वाटे. ते हातांत हात घालून उभे होते व त्या बागेंतील शोभा अवलोकन करीत एकमेकांशी हळूहळू बोलत होते. त्यांचे तें बोलणें व एकमेकांकडे प्रेमभरित मुद्रेनें पाहणें, हें पाहून मनांत असें वाटत असे, कीं ते उभयतां जिवलग मित्र असावेत. कांहीं वेळानें त्यांचें लक्ष बाबासाहेब यांच्या वाड्याकडे गेलें. तों तेथें मोठी गडबड चालली होती! माडीवरील दिवाणखान्यांत व पुढील चौकांत आरास करण्याचें काम ज्यारीनें चाललें होतें. ठिकठिकाणीं बैठकी घालीत होते व दररोजचे पेक्षां मनुष्यांची हालचालही जास्तच दिसत होती. अशी ही गडबड पाहून त्या दोघांचें लक्ष तिकडे ज्यास्तच वेधलें. त्यांच्या मनांत वेगवेगळ्या अनेक कल्पना येऊं लागल्या. परंतु हा थाट कोणत्या कृत्याच्या संबंधानें केला असावा असा त्यांचा निश्चय होईना. ही वेळ सुमारे सातवाजण्याची होती. आतां पोतनिसांचे वाड्यांत जास्तच गडबड दिसूं

लागली. कांहीं मंडळी जरा भपकेदार पोषाक करून वाड्यांतून बाहेर जात येत होती. व त्यांच्या त्या त्वरित जाण्यायेण्यावरून आमच्या वरील प्रेक्षकास आज वाड्यांत कांहीं निमित्यानें लहानसा समारंभ असावा, असें खास वाटल्या वांचून राहिलें नाहीं. मग त्यांहीं निश्चय केला कीं, थोडावेळ येथें बसून काय होतें तें पहावें.

आठ वाजून जाऊन सवा आठाचा सुमार झाला न झाला इतक्यांत आमच्या प्रेक्षकास ब्यांड, ताशे, वाजंत्री वगैरे वाद्यांचें मधुर वाजणें जरा अंतरावरून ऐकूं येऊं लागलें. तों त्यांना वाटूं लागलें कीं, जे कांहीं वाजत गाजत येत आहे तें याच वाड्यांत येत असावें. तरी पण आमच्या बाबासाहेबांचें शहर मोठें होतें ह्मणून त्यांची खातरी होईना. असें कांहीं वेळ ते घोटाळ्यांत पडले आहेत, तों त्या जाण्याचा रोख इकडेसच असावा, असें त्यांस खास वाटलें; व खरोखरच दहा मिनिटांचे अवकाशानें मशालींचा प्रकाश आमच्या प्रेक्षकास दिसूं लागला. फार वेळ गेला नाहीं तोंच ज्याला दोन दोन घोडे जुंपले आहेत, अशा दोन बगीच्या गाड्या, एक सुंदर लहानसा म्याना व दुसऱ्या गाड्या आणि कांहीं स्त्रीपुरुषांचा जमाव वाजत गाजत मोठ्या थाटानें पोतनिसांचे वाड्यांत येऊन ठेपला.

हा समारंभ दुसरा कांहीं नव्हता, परंतु राधाबाई ह्मणजे आत्मारामाची बायको इथें पावण आलेलें होतें. फाल्गुन महिना संपण्याचें सुमारास बाबासाहेबांकडून आगाऊ सूचना गेल्या प्रमाणें बापूजी कारकून यांस पुण्यास पाठविण्यांत आलें. तिकडे सूचनेप्रमाणें सर्व तयारी होतीच, त्याप्रमाणें पुणेकरांकडून राधाबाई, तिची आई, रामभाऊ व त्यांची स्त्री, एक गडी व एक त्यांची ठकू मोलकरीण इतकी मंडळी चैत्र शुद्ध प्रतिपदेचा वार्षिकसण करून दुसरे दिवशीं पुण्याहून निघाली. हाच दिवस त्यांच्या येण्याचा मुकर होता; ह्मणून बाबासाहेब यांजकडे सर्व तयारी झाली होती. पुण्याहून जी मंडळी निघाली ती त्याच दिवशीं सुमारे चार वाजतां बाबासाहेबांचे गांवीं येऊन दाखल झाली. त्यांस आणण्यास गाड्या व मंडळी गेली होती. वधूप्रवेशाचा मुहूर्त रात्रौ आठ वाजण्याच्या उपरांतचा होता ह्मणून त्या सर्व मंडळीस बापूजी देशपांडे[१] यांजकडे ठेवण्यांत आलें होतें. त्यांजकडेही सर्व व्यवस्था फार उत्तम ठेविली होती; व रात्रौ बाबासाहेबांकडील सर्व स्त्रिया व पुरुष मंडळी वाजत गाजत आत्मारामासह देशपांडे यांजकडे गेली. तेथेंही थाटास करून बैठकी टाकल्या होत्या. व गांवांत आमंत्रण गेल्याप्रमाणें मंडळीही जमूं लागली होती. स्त्रिया घरांत गेल्यावर परस्परांचे नमस्कार झाल्यावर सर्व

---

१. आपासाहेब यांचा मुलगा.

खालीं बसल्या. नंतर राधाबाईची वेणीफणी घालून सर्व अलंकार घातले व तिला काळा शालू नेसविला. तिच्या आंगावर भरगच्ची शालजोडी देऊन मोत्यांच्या मुंडावळी बांधिल्या. याप्रमाणें तिला तयार केल्यावर सर्व स्त्रियांसह जमलेली मंडळी जावयास निघाली. आत्मारामास व राधाबाईस पालखींत बसवून व त्याच्याकडील स्त्रियांस गाड्यांत बसवून, मोठ्या समारंभानें वाजत गाजत सर्व मंडळी बाबासाहेबांचें वाड्याकडे यावयास निघाली व तोच जमाव आमच्या त्या उभय मित्रांस दिसला होता. असो. आतां आपण बाबासाहेबांचे वाड्याकडे वळूं.

सर्व मंडळी वाड्यांत पोंहचतांच पालखी खाली ठेविली. त्यांतून उभयतांस खाली उतरविलें. स्त्रिया घरांत निघून गेल्या. मंडळी चौकांतील बैठकीवर बसली. नंतर आत्मारामाचे पुढ्यांत राधाबाईस उभी करून त्या उभयतांस पायघड्यांवरून चालत माजघरांत नेलें.

तेथें गेल्यावर उपाध्यांनीं लक्ष्मीपूजन करविलें. नंतर माणूस उतरविली. ( यासर्व प्रकारांची माहिती भाग २ रा यांतील पोटभाग २ रा यांत " वधू-प्रवेश " ह्या भागांत पहा. )

घरांतील हें सर्व कृत्य आटोपल्यावर मंडळीस पानसुपारी, अत्तरगुलाब, हारगजरे वांटून साखर व नारळ वाटली. याच प्रमाणें स्त्रियांस हळदिकुंकूं, अत्तरगुलाब, हारतुरे देऊन त्यांच्या नारळांनीं ओटया भरिल्या व साखर वांटली. नंतर सर्व मंडळी घरोघरीं चालती झाली.

एक दोन दिवसानंतर बाबासाहेबांनीं आपले आप्तसगे, सोयरेधायरे, मित्रस्नेही वगैरे मंडळीस व कांहीं स्त्रियांस पावणानिमित्य भोजनास बोलाविलें. त्या दिवशीं त्यांच्या वैभवाप्रमाणें सर्व बेत फारच उत्तम केला होता. हा लहानसा भोजनसमारंभ आटोपल्यावर कांहीं दिवसांनीं पुणेकर यांजकडूनही असा एक समारंभ झाला.

जांवयास दिवाळीचे सणास आणितात त्या वेळेस त्याचा व त्याच्या आईचा व इतर मनुष्यांचा जसा मानपान राखण्यांत येतो, तसाच या वेळेस वधूच्या आई च व तिच्या मानकरणींचा ठेवावा लागतो. असा सर्व मानपान बाबासाहेबांकडून पुणेकरांकडील मंडळीचा ठेवण्यांत आला. कांहीं दिवस बाबासाहेबांचे गांवीं राहिल्यावर ती सर्व मंडळी पुण्यास परत गेली.

---

या भागांतील बाकी राहिलेलीं सर्व कृत्यें प्रत्येक महिन्यांत निरनिराळीं व्हावयाचीं असतात. तीं कोणतीं व कशीं करावयाचीं हें महिन्यांच्या अनुक्रमानें सांगतों.

## चैत्र.

### २ वर्षप्रतिपदा.

वर्षप्रतिपदेच्या सण मोठ्या महत्वाचा मानिला आहे, म्हणून नव्या जावयास जरी तो परगांवीं असला तरी त्यास आपल्या घरीं मोठ्या थाटामाटानें आणावें. नंतर त्यास मंगलस्नान घालून पंचपक्वान्नें भोजनास करून कांहीं मित्रमंडळीसह भोजन करावें. नंतर जावयास सामर्थ्यानुरूप पोषाख देऊन गौरवावें. ( असा प्रकार अप्पुण्या बाबासाहेबांकडे मोठ्या थाटानें झाला. )

शुद्ध तृतियेस ( ज्या दिवशीं गौरी बसवात त्या दिवशीं ) नव्या नवरे मुलीस माहेरून आपलें घरीं आणून गौरीची स्थापना करून मुलीजवळून पेढे व बतासे यांचीं वायनें वाजत गाजत वाटवावीं. हा प्रकार वैशाख शुद्ध तृतिया-अक्षतृतिया-या दिवशींही करितात.

---

## जेष्ठ.

### ३ वटपौर्णिमेचें वायन.

( हें वायन मुलीनें माहेरीं राहून वाटण्याची चाल आहे. )

याचें सामान-बुरडी परड्या२५. लांकडी फण्या २५. लांकडी करंडे२५. बिलोरी बांगड्या ( हिरव्या ) २५. पोत काळी. नारळ २५. सुपाऱ्या २५. हळकुंडें २५. खारका २५. बदाम २५. अक्रोड २५.

मुलीस साडी; खण. मुलीच्या आईस लुगडें व खण.

मुलीकडील सर्व मंडळीस पुरे इतका शिधा पक्वान्नासुद्धां.

हें सर्व सामान मुलीच्या राहत्या गांवीं पाठवावें. व तसें करण्यास शक्य नसेल तर त्याच्या किमती प्रमाणें रुपये पाठवून त्यांस तेथें तयार करण्यास सांगावें. ही तजवीज ज्यानें त्यानें आपल्या सवडीप्रमाणें करावी.

पौर्णिमेचे दिवशीं मुलीस मंगलस्नान घालून तिजकडून रेशमी वस्त्र परिधान करवून वर सांगितलेल्या सामानानीं पंचवीस वायनें तयार करावी. नंतर उपाध्यासह वटसावित्रीस जाऊन तेथें पूजा करून त्यांतील पांच वायनें तेथेंच जमलेल्या स्त्रियांस वाटावीं आणि बाकीचीं गांवांत वाजत गाजत वाटावीं.

---

# आषाढ.

## ४ आखाडपाटी.

जेष्ठ महिन्यांत आखाडपाटीचा सर्व सरंजाम तयार करविण्याची व्यवस्था बाबासाहेबांकडून झाली होती. तो महिना संपून एक दोन दिवस लोटले नाहींत तोंच थोडें थोडें सामान येऊं लागलें. जें सामान झालें न- व्हतें तें लवकर करण्याविषयीं तगादा लाविला. आषाढाचे पंधरा दिवस गेले नाहींत तोंच सर्व सरंजाम तयार झाला तो येणें प्रमाणें:—

### आखाडपाटीचा सरंजाम.

विटी सोन्याची. दांडु रुप्याचा. चेंडू सोन्याचा, कापडी. गोट्या ५ सोन्याच्या अथवा रुप्याच्या. चक्र सोन्याचें अथवा रुप्याचें व रबरी.

( वर सांगितलेला सर्व खेळ लांकडी रंगीत वगैरे )

दशावतारी गंजिफा. चनकांचनेच्या गंजिफा. सोंगट्या हस्तिदंती अथवा लांकडी रंगित. फांसे चांदीचें अथवा हस्तीदंती. बुदबळें हस्तीदंती, अथवा लांकडी रंगीत. पट २ किनखापी अथवा गजनीचे.

### बैठकीचा सरंजाम.

जाजमें गालिचे, गाद्या, तक्के, रुजामे, खुर्च्या, टेबलें, वगैरे.

### इतर सरंजाम.

तंबू, राहुट्या, घोडा, गाडी, कलमदानें, व लिहिण्याचा सरंजाम. छत्री चवरी, आबदागिरी. मुलास पोषाखः— पागोटें अथवा मंदिल. दुपेटा व अलं- कार.

मुलाच्या आईस—शालू, खण वगैरे.

शिधा[2] त्यांजकडील मंडळीस पुरे इतका पक्वान्नासुद्धां. फळफळावळ मिठाई वगैरे.

या प्रमाणें सर्व सरंजाम, तयार झाल्यावर आखाडपाटी कधीं न्यावी याचा विचार होऊं लागला. एके दिवशीं बाबासाहेब वकीलसाहेबांकडे जाऊन याजबद्दल त्यांचाही विचार घेतला. नंतर एक शुभ दिवस पाहून त्याप्रमाणें त्यांजकडे सूचना केली. वकील साहेबांकडे सूचना गेल्याप्रमाणें त्यांहीं ठाण्यास

---

१ मुलीकडून मुलाला खेळ वगैरे सरंजाम जातो तो. हा प्रकार आषाढ महिन्यांत होतो म्हणून यास हें नांव पडलें आहे.

२ जर वरपक्षीयांच्या गांवीं राहत असला तर शिधा न पाठवितां त्यांजकडील सर्वांस घरीं भोजनास बोलवावें.

आपल्या वडील बंधूस व दुसऱ्या कांहीं मंडळीस त्या दिवशीं येण्याविषयीं फार आग्रहानें लिहून पाठविलें. अशींच आमच्या बाबासाहेबांकडूनही आमंत्रणें गेलीं.

कालमानाच्या क्रमाप्रमाणें नेमिलेला दिवस एक दोन दिवसांवर येऊन ठेपला. आमंत्रणाप्रमाणें सवडीनुसार कोणी आले व कोणांकडून न येण्याबद्दल पत्रें आलीं. इकडे उभयपक्षीं त्यांची थोड थोडी तयारीही झाली. नेमिलेल्या दिवसाच्या अदले दिवशीं उभयतांकडून गांवांतील मंडळीस पानसुपारीचीं व स्त्रियांस हळदी-कुंकवाचीं आमंत्रणें गेलीं.

सायंकाळ होतांच दिवाणखान्यांत बैठक घालून हांड्या, झुंबरें, लाविलीं व मंडळी जमत चालली. अशी तयारी झाल्यावर स्त्रिया अलंकार घालून वस्त्रें परिधान करून सिद्ध झाल्या. नंतर सर्व सरंजाम गड्यांजवळ देऊन सर्व मंडळी बाबांसहित वकिलांच्या घरीं गेली. तेथें गेल्यावर दिवाणखान्यांत सर्व सरमजाम व्यवस्थेनें ठेविला. सर्व मंडळी जमल्यावर चौरंग मांडून त्यावर मुलास बसविलें. नंतर त्याचे पादप्रक्षालन करून वामनरावांनीं त्याची पूजा करून, तो सर्व सरंजाम त्यास दिला व पोषाख देऊन अलंकार घातला. सर्व मंडळींनीं तो सरंजाम अवलोकन केल्यावर सर्वांस पानसुपारी, अत्तरगुलाब व हारगजरे देऊन नारळ वांटले.

इकडे माजघरांत बैठक घातली होती. तेथें स्त्रिया जमल्यावर चौरंग मांडून मुलाच्या आईस बसविलें. तिला हळदकुंकूं देऊन ओटी भरून लुगडें व खण दिला. नंतर सर्व स्त्रियांस हळदकुंकूं, वगैरे देऊन ओट्या भरिल्या. नंतर सर्व स्त्रीपुरुषें वाजत गाजत घरीं गेलीं.

एक दोन दिवसानंतर बाबासाहेबांनीं या कृत्यानिमित्य वकिलांकडील सर्व मंडळीस व कांहीं इतर मंडळीस भोजनास बोलाऊन पंचपक्वान्नें करून भोजनाचा थाट त्यांच्या वैभवाप्रमाणें केला.

याच प्रमाणें आत्मारामासही पुणेंकराकडून आखाडपाटी आली.

## श्रावण.

### ५ श्रावणपाटी.

वर सांगितल्याप्रमाणें उभयतांकडून हौसेचे व श्रीमंतीचे समारंभ होण्यांत आषाढ महिना निघून गेला. तों इकडे वकीलसाहेब यांजकडे श्रावण-पाटीची तयारी बहुतेक होत आली. त्याचा सरंजाम जो करावयास दिला होता

[1] मुलाकडून मुलीला जो खेळाचा वगैरे सरंजाम पाठवितात ( हा श्रावण महिन्यांत पाठविण्याचा प्रघात आहे ) त्यास "श्रावणपाटी" म्हणतात. हा प्रकार व मागें सांगितलेला ४ था प्रकार, असे दोन प्रकार श्रीमंत लोकांचे आहेत व ते मागें परंच दृष्टीस पडत असत. परंतु हल्लीं कांहीं हे फारच क्वचित् दिसोन येतात.

तो पसंती प्रमाणें आणून बाकीचा लवकर करण्याविषयीं ताकीद केली. कांहीं दिवसांनीं सर्व सरंजाम तयार झाला तो:—

### श्रावणपाटीचा सरंजाम.

मुलीचे सर्व प्रकारचे खेळ. स्वयंपाकाचीं भांडीं, तांब्यापितळेचीं—पराती, ताटें, वाट्या, पातेलीं, तपेल्या घागरी, हंडे, गंगाळ्यें, पोहरे, चूल, तवा पळ्या. हीं भांडीं लहान असावीं.

( ह्याच प्रमाणें लांकडी रंगित सरंजाम. )

### बाहुल्या व त्यांचा सरंजाम.

निरनिराळ्या प्रकारच्या बाहुल्या. पलंग, पाळणा, गाद्या, लोडें, वगैरे, सरंजाम. सोंगट्या हस्तिदंती अथवा लांकडी. फांसे चांदीचे अथवा हस्तिदंती. पट किनखापी. विटी सोन्याची व लांकडी रंगित. दांडू चांदीचा व लांकडी रंगित. इतर सरंजाम:—तंबू, राहुट्या, जाजमें, गालिचे, तक्के, खुर्च्या, वगैरे. मेणा, पालखी. मुलीस साडी, खण, व कांहीं अलंकार. मुलीच्या आईस लुगडें, खण. शिध्याचें सामान आषाढपाटीप्रमाणें.

याप्रमाणें सर्व सामान तयार झाल्यावर, त्यांनीं बाबासाहेबांचा रुकार घेऊन, त्याप्रमाणें एक शुभ दिवस पाहून, त्या दिवशीं श्रावणपाटी नेण्याचा निश्चय केला. नंतर निश्चित दिवशीं श्रावणपाटी नेली. ( हा सर्व प्रकार आषाढपाटीचा प्रकार वर सांगितला आहे, त्या प्रमाणें केला व भोजनसमारंभही तसाच झाला. )

याच प्रमाणें कांहीं दिवसांनीं बाबासाहेब यांनीं श्रावणपाटीचा सर्व सरंजाम करवून रघो बापूजी कारकून व सखाराम यांचे बरोबर व्याह्यांकडे पाठविला व ते तेथें जाऊन वर सांगितल्याप्रमाणें सर्व समारंभ करून परत आले.

---

### ६ मंगळागौरीव्रत.

( हें व्रत श्रावण महिन्यांतील प्रत्येक मंगळवारीं करावें. )

### यास लागणारें सामान:—

सोळा प्रकारचीं धान्यें. सोळा प्रकारच्या पत्र्या. सोळा प्रकारचीं फुलें.

---

१ हें व्रत सर्व कुटुंबांत करण्याची रूढी नसते. व ती असल्यास लग्न झाल्यापासून पांच वर्षें हें व्रत करितात. प्रथम वर्षीं पहिली पूजा रमयता ओवाळण्यानें मोठ्या थाटमाटानें करितात. कोठें कोठें मुलगी तिचें स्नान झाल्यापासून पूजा होऊन जेवण होईपर्यंत बोलत नाहीं, मुकी असते; व तिचें जेवण आळणी असून ते सर्व पदार्थ तांदुळाच्या पिठाचे असतात.

२ जाई, जुई, कण्हेर, बिल्व, केतकी, कोरली, मोगरा, चंपक, दाळिंब, दूर्वा, शमी, अगस्त, मालती, बाभूळ, अच्युत ( कळंब ), तालपत्र.

बदाम १६. खारका १६. सुपाऱ्या १६. जायफळें १६. वेलदोडे १६. लवंगा १६. कांकणाच्या हिरव्या रंगाच्या १६. काळे मणी पोतीचे १६.

या प्रमाणें सामान तयार करावें. नंतर मंगळवारच्या प्रातःकाळीं मुलीस मंगलस्नान घालून रेशमी वस्त्र परिधान करवावें. नंतर मेखर बांधलेलें असल्यास त्यांत चौरंग मांडून त्यावर वर लिहिलेलें सर्व सामान मांडावें. नंतर वाजत गाजत उपाध्यानें मुलीकडून पूजा करवावी.

या प्रमाणें चंद्राबाईची पहिली पूजा बाबासाहेबांकडे जोडवानें मोठ्या समारंभानें झाली.

---

### ७ चतुर्थीची पूजा.

श्रावण शुद्ध चतुर्थीचें दिवशीं गणपतीची पूजा करितात त्याचा प्रकार.

#### याचें सामान.

चांदीची तबकडी. सोन्याचा गणपति. मुलास पोषाखः—पागोटें, शालजोडी अथवा शेला. मुलाकडील सर्व मनुष्यांचा शिधा पकान्नांसुद्धा. हें सामान मुलीकडून मुलाकडे पाठवावें. व त्यानें त्याची पूजा करावी. ( या प्रकाराचा ऱ्हास होत चालला आहे. सांप्रत कोणीही करित नाहीं. व याची माहितीही कोणास नाहीं. गरिबांनीं आपल्या सामर्थ्यानरूप करावें. )

---

### ८ नाग पंचमीचें वायन

याचें सामानः—चांदिची तबकडी. सोन्याचा नाग. मुलीस साडी, व खण. मुलीकडील सर्व मनुष्यांचा भोजनाचा शिधा पकान्नासुद्धा.

मुलीस वायनें वाटावयास पेढे व बत्तासे. हें सामान मुलीकडे पाठवावें. मुलीनें नागाची पूजा करून पांच घरीं वाजत गाजत वायनें वाटावीं.

मुलगी परगांवीं असल्यास पैसे पाठवावे. ( ह्या कृत्याचाही ऱ्हास झाला आहे. गरिबांनीं सामर्थ्याप्रमाणें करावें. )

---

१ प्रथम वर्ष असतें म्हणजे होळीनें पाळितात नाहीं तर पाळण्याची जरूर नाहीं.

२ कोठें कोठें मातुल्याचें पीठ शिजवून त्याचे दिवे, सांज वगैरे पदार्थ करून ते दिवे चौरंगाच्या चार कोपऱ्यांत ठेवितात व त्यांत तेल वात घालून ते लावितात, व ते सांज वगैरे पदार्थ ठिकठिकाणीं मांडितात.

# भाद्रपद.

## ९ आवरणें.

हरतालिकेच्या अदले दिवशीं आवरणें करण्याचा प्रकार.

उभयपक्ष एकाच गांवांत असल्यास परस्परांस परस्परांनीं आवरणें करावें. परंतु परगांवीं असल्यास त्यास लागणारें सामान अथवा रुपये पाठवावे, सामान सामर्थ्या प्रमाणें व मर्जीनुरूप असावें. विहीणीस लुगडें व खण पाठवावा.

---

## १० गौरीचें वायन.

२५ सुपें, २५ नारळ, २५ करंडे, २५ फण्या, २५ बांगड्या बिलोरी, २५ बदाम, २५ खारका, २५ सुपाऱ्या, २५ हळकुंडें, २५ खण ( रेशीमकाठी ) २५ केळीं.

मुलीस साडी खण व कांहीं अलंकार. मुलीच्या आईस लुगडें, व खण.

या प्रमाणें सामान मुलीकडे पाठवावें. मुलीनें गौरीची पूजा करून वाजत वाजत प्रत्येक घरीं एक वायन वांटावें. अशीं पंचवीस वायनें वाटावीं.

---

# अश्विन.

अश्विन महिना निघून चोहोंकडे अंबिकेची स्थापना झाली आहे. घरोघरीं प्रातःकाळीं अंबिकेची पूजा होऊन आरत्यांचा घमघोष चाललेला दिसून येत आहे. शहरांत ठिकठिकाणीं देवालयांत अंबिकेची षोडशोपचारें पूजाकरून पाठघोष चाललेला ऐकूं येत आहे. चोहोंकडे फुलें, पुष्पें, तुळसी व कर्पुरादि सुगंधी द्रव्यांचा घमघमाट सुटला आहे. कित्येक देवालयांत अंबिकेचे निस्सीम भक्त कोणी गळ्यांत ढोलकी, कोणी हातांत तंबुरी व टाळ घेऊन, कोणी पायांस घुंगुर बांधून प्रेमभरांत नाचतांना व भजन करतांना आढळत आहेत. इकडे जरा-वस्थेचीं चिन्हें ज्यांच्यावर पडून शुभ्रध्वजा फडकूं लागली आहे अशा व कांहीं-कांचा बाल्यभर नुकताच पुरा झालेला भासत आहे, व कांहीं तारुण्य-बहरानें रसरसलेल्या व कांहीं उपवर वधू अशा स्त्रियांचे लहान मोठे जमाव देवालयांत येत जात आहेत. त्या अंबिकेस हळदकुंकूं वाहून परस्परांस देऊन एकमेकींच्या वेणींत फुलांचे गजरे घालीत आहेत. शहरांत जिकडे जावें तिकडे मंगलदायक वृत्ति दिसोन येत आहे. जरा शहरा बाहेर अवलोकन केलें म्हणजे जणूं अंबिकेच्या आगमनानें सृष्टीनें आपलें पूर्ण सौंदर्य धारण केलें आहे, असें दिसू-

न जमीन हिरवीगार चकाकत आहे. फुललेल्या मावाच्या लोंबी खालीं मान घालून डोलत आहेत. कित्येक शेतांतील बांधावर भरगच्चीचे लालभडक पिवळे धमक असे गोंडे वाऱ्यानें झुलत आहेत. करडईच्या शेतांत तीं गोजिरवाणीं पिवळीं फुलें वाऱ्याच्या झुळुकेनें हालत आहेत. नागली वऱ्यांचीं कणसें आपलीं डोकीं वर काढून जणूं पहात आहेत. असा देखावा चोहोंकडे दृष्टीस पडतो.

रात्रौ ठिकठिकाणीं देवालयांत रसभरित गोड कीर्तनें चाललीं आहेत. श्रोतृसमाज मोठ्या प्रेमानें माना डोलवीत आहेत. असा प्रकार दररोज होतां होतां विजय दशमीचा दिवस येऊन ठेपला.

## ११ विजयादशमी.

विजया दशमीचा सण सर्व सणांत बऱ्याच महत्वाचा मानिला आहे. त्या दिवशीं आमच्या बाबासाहेबांकडे जरा विशेष धामधूम होती. प्रातःकाळीं वाद्यें वगैरे वाजूं लागलीं. नंतर कांहीं वेळानें थोडीशी मंडळी नेहमीपेक्षां जरा उंची पोषाख करून, बरोबर एक म्याना घेऊन, वाजत गाजत सितारामअण्णा वकील यांजकडे जाऊन, चंद्राबाईच्या नवऱ्यास म्यान्यांत बसवून घेऊन आली. शिष्टसांप्रदाया प्रमाणें त्यादिवसाची सर्व कृत्यें पूजा वगैरे आटोपल्यानंतर जावयाचें मंगळस्नान झाल्यावर मोठ्या समारंभानें पंचपक्वान्न भोजन झालें. नंतर बाबासाहेबांनीं आपल्या योग्यतेनुरूप जावयास पोषाख व अलंकार देऊन गौरविलें.

## १२ दिवाळी.

सर्व वार्षिक सणांत या सणासारखा मोठ्या वैभवाचा व उत्साहिक सण दुसरा नाहीं, असें म्हटलें तरी चालेल. या सणांत जो तो आपल्या शक्त्यनुसार आपल्या आवडत्या गोजिरवाण्या मुलांबाळांसह व प्रियकर भार्येसह[१] उत्साह करून, या भार्यावर्तांत आज हजारों वर्षांपासून चालत आलेला सण साजरा करून आनंद मानितो. गोरगरिबसुद्धां आपली लहानशी पर्णकुटिका नीटनेटकी करून पुढील आंगण साफ करून सुशोभित दिसण्या करितां खटपट करतांना दृष्टीस पडतात.

शेट सावकार, तसेंच श्रीमान लोक व लहान मोठे दुकानदार, आपापलीं लहान मोठीं दुकानें, चौसोपी वाडे, दुमजली तिमजली हवेल्यांस रंग देऊन सुशोभित करण्याकडे गुंतलेले आढळून येतात. या प्रकारची व्यवस्था प्रत्येक वर्षीं आमच्या बाबासाहेबांकडे व्हावयाचीच. परंतु यंदा त्यांच्या लाडक्या चंद्राबाईच्या नवऱ्यास दिवाळसणास आणावयाचें होतें, म्हणून या कामांत जरा विशेष ठाकठिकी दिसोन येत होती. रंग वगैरे देण्याचें काम मोठ्या सफाईनें चाललें होतें. बैठकीचा

१ या सणास जरी परमार्थ असला तरी त्यास आणून वर लिहिल्याप्रमाणें शक्त्यनुरूप करण्याचा प्रघात आहे.

सरंजाम थोडासा नवा तयार केलेला दिसत होता, आरास करण्याची व्यवस्था कांहीं नवीनच केलेली पाहण्याचा बेत होता. ही सर्व तयारी दसरा होतांच थोड्या दिवसांनीं पुरी झाली.

आपल्या घरांत कोणत्याही प्रकारची अडचण नाहीं व वकील साहेबांचा-ही रुकार मिळाल्ला, तेव्हां बाबासाहेबांनीं दिवाळसणास जांवयास आणण्याचा बेत केला होता. त्याप्रमाणें सर्व व्यवस्था मोठ्या ठाकठिकीनें होऊं लागली. या सणांत साधारण गरीब लोकांकडे पांच दहा रुपयांचा खर्च व्हावयाचाच. मग आमच्या बाबासाहेबांसारख्यांकडे त्यांच्या वैभवाप्रमाणें सहज शेंकड्यावर धूम जावयाची. ही रक्कम बाबासाहेबांकडे प्रत्येक वर्षी या सणानिमित्त खर्ची पडावयाची. परंतु या वर्षी काय विचारितां ! गरीब कुटुंबांतील एका कन्येच्या विवाहासारखें मोठें कृत्य होण्यासही रक्कम लागत नाहीं, ती बाबासाहेबांनीं या सणास पुरेल कीं नाहीं याची शंकाच ! ! ! असो. बाबासाहेबांसारख्या इनामदारांस त्यांच्या वैभवाप्रमाणें केलेंच पाहिजे. परंतु त्यांजकडून त्यांच्या योग्यतेपेक्षां जास्त खर्च व्हावयाचा नाहीं, ही त्यांस एक चांगली हातोटी साधली होती.

वर दर्शित झालेंच आहे कीं, हा सण ह्मणजे एक लहानसा लग्नसमारंभच व्हावयाचा असतो. ह्मणजे खर्चाचें मानानेंच हें समजावयाचें आहे. या मा-नानें या कृत्यास सामानसुमानही त्याच थाटाचें लागतें. तें येणें प्रमाणें:—

दिवाळसणास लागणारें सामान.

वधुपक्षाकडील सिद्धता.

शृंगारिक व भक्षणीय पदार्थ:—हे सर्व पदार्थ भाग तिसरा यांतील मोट भाग१ यांत " उभयपक्षाकडे लागणारें सामान " या सदराखालीं दिलेल्या यादी प्रमाणें असावें.

कापड.

**जांवयास:**—पोषाख:—पागोटें, शालजोड्या, नेसावयाचीं धोतरें व उप-रणीं रेशीमकाठी. अंग पुसावयास शेला.

**विहिणीस:**—लुगडीं, पैठणी, खण, शालजोडी वगैरे. इतर मंडळी ह्मणजे जावयाचे मानकरी वगैरे बरोबर आलेल्या मंडळीस पोषाख:—पागोटीं—शेले वगैरे तसेंच विहिणीच्या मानकरणी स्त्रियांस:—लुगडीं, खण. दास, दासी, गडी, शिपाई वगैरे लोकांस पोषाख:—पागोटीं, शेले.

अलंकार.

जांवयास:—गोफ, कंठी, गोठवीं, आंगठ्या, वगैरे. विहिणीस:—बांगड्या, गोठ वरपक्षाकडील शिट्ट्या.

मुलीस:—शाल, पैठणी, व लुगडें आणि खण वगैरे. अलंकार ( जो लग्नांत घातला नसेल तो. ) इतर दुसऱ्या स्त्रिया ओंवाळणीस येतील त्यांस ओंवाळणीस घालावयास अलंकार वगैरे.

याप्रमाणें बाबासाहेबांनीं सर्व सामान तयार करविलें. नंतर दिपवाळीचा सण सुरू होण्यास कांहीं दिवसांचा अवकाश आहे, तोंच ठिकठिकाणीं आपले सोयऱ्यांसारखे, इष्टमित्र वगैरेस दिवाळसणास येण्याविषयीं फार आग्रहाचीं पत्रें पाठविलीं. नव्या व्याह्यांस म्हणजे पुणेकरांस त्यांजकडील सर्व मंडळींसह येण्यास फारच आग्रहाचें पत्र गेलें. याप्रमाणें आमंत्रणें झाल्यावर कांहीं दिवसांनीं मंडळी जमूं लागली. व आश्विन वद्य दशमी रोजीं चांगला मुहूर्त पाहून चंद्राबाईच्या नवऱ्यास व त्याच्या आईस व इतर मानकरी मंडळीस मोठ्या थाटानें आपल्या घरीं आणिलें. याप्रमाणें जांवई, विहिणी, त्यांचे मानकरी व मानकरिणी आल्यावर त्यांचे मानपान ठेवण्यांत बाबासाहेबांकडील मंडळीस बरीच मेहनत पडली.

दिपवाळीचा सण म्हटला म्हणजे आश्विनशुद्ध द्वादशीपासून सुरू होतो. ह्या दिवस येईपर्यंत बाबासाहेबांकडे बरीच मंडळी जमली, व लग्न समारंभाप्रमाणें त्यांजकडे गडबड दिसों लागली. जांवई आल्यापासून द्वादशीपर्यंत सांगण्यासारखें कृत्य झालें नाहीं. द्वादशीच्या दिवशीं सायंकाळीं वाड्यांत आरास वगैरे होऊन वाद्यें वाजूं लागलीं व फटाकाच्या पेट्या, चंद्रजोती, नळे वगैरे दारूकाम उडूं लागलें. हा सर्व प्रकार पुढील सोप्यांत चालला होता. इकडे मागील सोप्यांत [illegible] दूध व अनेक प्रकारचीं सुगंधिक उटणीं वाटण्याचें काम चाललें होतें. ही सर्व तयारी पांहटेस विहिणी वगैरे स्त्रियांचें नहाण न्हावयाचें होतें त्याची होती. याबद्दलची सर्व तयारी झाल्यावर पांहटेस विहिणी व तिच्या मानकरिणी [illegible] स्त्रियांचें मंगलस्नान झालें.

यावेळचा सर्व थाट २ ऱ्या भागांतील पोटभाग ४ था यांतील " रासनहाण " या प्रकारच्या थाटासारखाच होता, असें म्हटलें तरी चालेल. विहिणीचें व

---

१ यावेळेस मुलाची आई दूध, उटणें व सुवासिक तेल ज्या भांड्यांत असतें त्यांत कांहीं नाणें टाकते. हें नाणें व स्नानाच्या वेळचें लुगडें व चोळी स्नान घालणाऱ्या दासीस मिळतें. याप्रमाणें जांवई मंडळीचें स्नान होतें. तेव्हांही वर लिहिल्या प्रमाणें सामान स्नान घालणाऱ्या हजमास मिळतें.

तिच्या मानकरिणींचें स्नान झाल्यावर त्यांस मानाप्रमाणें नवीं लुगडीं नेसावयास दिलीं. प्रातःकाळीं सर्व मंडळींचीं स्नानें झाल्यावर फराळाचा एक दुबार बेत केला होता. नानाप्रकारचीं पक्वान्नें वगैरे पदार्थ केले होते. जांवईमंडळी, विहिणी व इतर मंडळींचे फराळ झाल्यावर बऱ्याच वेळानें मोठ्या थाटाचें भोजन झालें. असा हा दिवस तर गेलाच. सायंकाळीं रोजच्यापेक्षां आरास वगैरे थाट अरा जास्तच केला होता. रात्रौ मोठ्या समारंभानें "लक्ष्मीपूजन" झाल्यावर सर्वांचा फराळ झाला. नंतर पांहटेस जांवईमंडळी व इतर मंडळींचें मंगलस्नान मोठ्या समारंभानें झालें. त्यावेळेस दारूकाम वगैरे बरेच उडविण्यांत आलें. याप्रमाणें मोठ्या समारंभानें स्नानें झाल्यानंतर सुमारे आठ वाजण्याच्या सुमारास फराळ झाल्यानंतर मंडळी अनेक प्रकारचे खेळ खेळत बसली.

या सणांत मुख्य सोंगट्या खेळण्याचा प्रघात फार आहे. त्याप्रमाणें मंडळीनें तोच खेळ मांडिला होता. बहुतेक वेळ खेळण्यांतच गेला. नंतर भोजन झाल्यावरही खेळ चाललेच होते. पुनः सायंकाळीं दररोजप्रमाणें आरास करून दारूकाम उडविण्यांत कांहीं कमतरता झाली नाहीं. असो. याप्रमाणें कार्तिक शुद्ध २ पर्यंत व त्यापुढेही दोन चार दिवस असेच प्रकार होत गेले. आतां त्या प्रत्येक दिवसाचें वर्णन करणें म्हणजे द्विरुक्ति करण्यासारखें आहे. असो. आतां त्या दोनचार दिवसांत प्रत्येक दिवसाच्या महात्म्याप्रमाणें जे वेगळे प्रकार झाले तेच सांगून हा समारंभ पुरा करावा हें बरें.

दुसऱ्या दिवशीं म्हणजे अमावास्येस विशेष कांहीं रम्य झालें नाहीं. परंतु त्याचे दुसरे दिवशीं म्हणजे कार्तिक शुद्ध प्रतिपदेस प्रातःकाळीं सर्वांचीं स्नानें झाल्यावर "ओंवाळणीचा" प्रकार झाला तो:—

माजघरांत चौंपाट काढून त्यावर चौरंग मांडून वर मखमल टाकिले. नंतर चांदीचे ताटांत नानाप्रकारचीं फळें, मिठाई वगैरे भक्षणीय पदार्थ घालून तें तेथें ठेविलें. जांवयास पोषाख घालून त्यास चवरंगावर बसविलें. नंतर चंद्राबाई पुढें येऊन तिनें आपल्या नवऱ्याच्या कपाळास कुंकू लावून अक्षता लाविल्या व तें ताट हातीं दिलें; आणि चांदीच्या तबकांत ठेवलेला लामण दिवा ओंवाळिला. हा ओंवळतानां जांवयानें त्यांत अलंकार टाकिला. याप्रमाणें चंद्राबाईनें ओंवाळिल्या नंतर जांवयास सासूनें ओंवाळिलें. यावेळेस सासूसही एक अलंकार घातला. ही ओंवाळणी झाल्यानंतर इतर सर्व स्त्रियांनीं ओंवाळिलें. त्या सर्वांस त्यांच्या नात्याच्या संबंधाप्रमाणें कमजास्ती रोकड रुपये ओंवाळणींत मिळाले.

याप्रमाणें ओंवाळणीचा प्रकार आटोपल्यानंतर दररोजप्रमाणें सर्व थाट झालाच. आतां खरें म्हटलें म्हणजे त्याच दिवशीं दिवाळीचा सण पुरा झा

त्या. परंतु जांवयास तुळशीचें लग्न होईपर्यंत ठेवण्याची रूढी आहे, त्याप्रमाणें बाबासाहेबांनीं पण त्या सर्व मंडळीस ठेवून घेतलें. ती सर्व मंडळी तुळशीचें लग्न होईपर्यंत राहिली. या सर्व दिवसांत त्यांचा मानपान वगैरे ठेवण्याची सर्व ठीक व्यवस्था झाली. बाबासाहेबांनीं एके दिवशीं आपले इष्टमित्र, सोयऱ्याधायरे वगैरे मंडळीस एक मोठी मेजवानी केली. दिवाळीच्या चार दिवसांत घरचा सण टाकून आपल्याकडे कोणी जेवण्यास येणार नाहीं, हें जाणून त्यांनीं हें असें केलें. त्यांच्या वैभवाप्रमाणें सर्व कार्यें उत्तम झालीं. याच दिवशीं जांवई मंडळी व विहिणी व त्यांजकडील इतर सर्व मंडळीस पोषाख वांटले, व जांवयास अलंकार दिले. हा समारंभ झाल्यावर तुलशीच्या लग्नाचा समारंभ मोठ्या थाटानें केला. याप्रमाणें दिवाळसणाचे सोहळे पूर्ण आटोपल्यावर जांवई व त्यांची इतर सर्व मंडळी यांची, रवानगी बरोबर बापूजी कारकून यांस देऊन केली.

याप्रमाणें " दिवाळसणाचा " समारंभ येथें पुरा झाला.

---

### मकरसंक्रांति.

या सणांत कोठें कोठें जांवयास घरीं आणून मागें सांगितल्याप्रमाणें त्याचा मानपान ठेवितात. अथवा नाना प्रकारचे तिळगुळ ( हलवे ) करून ते व चांदीचें ताट आणि वाटी व जांवयास पोषाख, आणि जोडवें, आंगठी वगैरे कांहीं अलंकार इतकें सामान मुलाकडे पाठवितात. जरी जांवई घरीं आणला तरी हें सामान देतात. ( हें प्रत्येकानें आपल्या सामर्थ्यानुरूप करावें. )

याप्रमाणें उभयपक्षाकडून परस्परांस सामान पाठवितात.

---

## फाल्गुन.

या महिन्यांत प्रथम मुलीकडून मुलास व नंतर मुलाकडून मुलीस गाठी जावयाची त्याचा प्रकार.

ह्या कार्यास लागणारें सामानः—सात प्रकारच्या गाठ्याः— १ साखरेची २ हलव्याची. ३ लवंगांची. ४ वेलचीची ५ केंशराची ६ बेदाण्याची. ७ खारका खोबऱ्याची. शिवाय पांच पांच लाडू. मुलास पागोटें शेला आणि जोडवें, आंगठी वगैरे अलंकार. मुलाच्या आईस लुगडें, खण. मानकरिणी स्त्रियांस लुगडीं, खण. मुलीस साडी, खण व कांहीं अलंकार. हळदकुंकवाचें सामान. ओटचा भरण्यास तांदूळ व नारळ. पानसुपारीचें सामान. पेढे, मिठाई वगैरे.

याप्रमाणें सामान आणून मुलगा आपल्याच गांवांत असेल तर तिकडे, चार स्त्रिया मिळून साहित्य घेऊन, वाजत गाजत जावें. नंतर चौपाट काढून

२ चौरंग मांडून त्यांवर मुलास व मुलाच्या आईला बसवावें. आईला हळदकुंकूं देऊन, ओटी भरून लुगडें व खण द्यावा. नंतर मुलास कुंकूं लाऊन त्याच्या गळ्यांत माळा घालून पागोटें वगैरे पोषाख देऊन अलंकार घालावे. नंतर लाडवांचें ताट हातीं लावावें. हें आटोपल्यावर मानकरणी स्त्रियांस हळदकुंकूं देऊन ओटया भरून त्यांस लुगडीं व खण द्यावे. नंतर इतर स्त्रियांस हळदकुंकूं देऊन पानसुपारी द्यावी; ओटया भराव्या आणि पेढे वांटावे.

मुलगा दुसऱ्या गांवीं असल्यास वर सांगितलेलें सामान तिकडे पाठवावें.

वर सांगितल्याप्रमाणें बाबासाहेबांकडून वकीलांच्या मुलास व नंतर वकीलांकडून चंद्राबाईस माळा आल्या. त्याचप्रमाणें पुणेकरांकडूनही सामान आलें.

## फुलभेट.

( हा प्रकार वधुपक्षाकडूनच होतो. )

याचें सामानः—चांदीचें ताट. पांच प्रकारचे लाडू. सोन्याची राखडी अथवा डोक्यांत घालण्याचें फूल. नानाप्रकारचीं सुगंधिक पुष्पें. मुलाचे आईस लुगडें, खण, वगैरे हळदीकुंकवाचें व ओटयांचें साहित्य.

येणेंप्रमाणें सामान घेऊन कांहीं स्त्रियांसह वाजतगाजत मुलाकडे जावें. तेथें त्यांजकडे अगोदर सूचना केल्याप्रमाणें तयारी असतेच. नंतर मुलाचे आईस चवरंगावर बसवून तिची वेणी घालून सुवासिक पुष्पें व सोन्याचें फूल किंवा राखडी घालावी. नंतर हळदकुंकू देऊन लाडवांचें ताट हातीं लावून तिला लुगडें, व खण द्यावा. त्यानंतर इतर सर्व स्त्रियांस हळदकुंकूं देऊन फुलांचे गजरे डोक्यांत घालून नारळांनीं ओटया भरून पेढे किंवा बत्तासे वांटावे.

हा प्रकार अमक्याच महिन्यांत केला पाहिजे, असें नाहीं. पाहिजे तेव्हां करावा.

# भाग ५. वा.

## इतर कृत्यें.

( या भागांतील कृत्यें उभयतां वधुवरें प्रौढवयांत आल्यावर त्यांस पुत्ररत्न अथवा कन्यारत्न होईपर्यंत त्या त्या दिवसांप्रमाणें व्हावयाचीं असतात.

### १ नूतन पदर धारण करणें.

उपवनांत सुकुमार आम्रवृक्ष त्याच्या सन्निध असलेल्या इतर वृक्षांच्या छायेखालीं, त्याला वेष्टिलेल्या कशांगी वेलींसह दिवसानुदिवस वाढत जाऊन, अतिरमणीय दिसूं लागतो, तद्वतच संसारांत नववधुवरांचें जोडपें त्यांच्या रक्षण करणारांच्या सुखाश्रयाखालीं उत्तरोत्तर तारुण्य बहारांत येतांना फारच मनोहर दिसतें. सुशील व कुलीन घराण्यांत नीतिमान् व गुणवान् सुपुत्र व सुगुणयुक्त सुंदर वधू यांचें दंपत्य संसाररूपी वन सुगंधमय करून त्याच्या आश्रयदात्यांस आनंद देतें. अशा समयास त्या उभयतांच्या मनांमध्यें अनेक प्रकारचे विकार क्रीडा करूं लागतात. व तें फारच चल होऊन चोहोंकडे धांव मारूं लागतें. तशांत जर कां तीं श्रीमान् कुलांतील असून त्यांस ऐश्वर्यसुखाची चटकच लागलेली असेल, तर तरुण मुलगा अनीतीच्या मार्गास जाण्याचा फार संभव असतो. मनुष्याच्या आयुष्याचे जे तीन भाग आहेत, त्यांतील मधला—तारुण्यावस्था—हा फारच भयंकर आहे, असें मानिलें पाहिजे. या काळांतील जी मध्यावस्था म्हणजे सोळा वर्षांपासून बेवीस वर्षांपर्यंतची, ती फारच मोहक असते. या स्थितींत त्यांस नीतिमान् मनुष्यांचीच संगत व पोक्त मनुष्यांचाच दाब असला पाहिजे. असें नसतां जर या स्थितींत त्यांस मोकळें सोडलें तर त्यांची काय स्थिति होते, हें आपल्या पाहण्यांत वारंवार येतें. असो. येथें इतकेंच सूचनेदाखल लिहिणें आहे कीं, श्रीमान् घराण्यांतील तरुण मुलांस वर नमूद केलेल्या स्थितींत दाबांत न ठेवितां लाड करून त्यांच्या मनाप्रमाणें वागूं दिलें, तर भयंकर परिणाम होतात, हें त्यांच्या हितचिंतकांनीं ध्यानांत ठेवून त्यांस नीतीच्या मार्गास लावण्यास झटावें.

आत्मारामाचें लग्न झाल्यास आज दोन वर्षे पुरीं होत आलीं. तारुण्य बहाराची थोडथोडी लकेर त्याच्या त्या प्रफुल्लित मुखावर मारूं लागली व तो अरा मोहक दिसूं लागला. अशा वेळीं त्याच्या शिक्षणाचा क्रम चांगला असून त्यावर

दावही पाहिजे तसा होता. बाबासाहेब, शिवरामभाऊ वगैरे मंडळीची त्याच्यावर कडक नजर होती. त्याला शिकविण्यास ठेविलेला मास्तरही फारच नीतिमान् व विद्वान् असा होता. त्यास मित्रमंडळीही मोठी सद्गुणी मिळाली होती. एकंदरींत त्याचें मन अनीति-मार्गास जाण्यास कोठेंच जागा नव्हती. असो. या सुमारास राधाबाईस नुकतेंच अकारावें वर्ष लागलें होतें व तीहि आपल्या वयांत येऊं लागली होती. याप्रमाणें ह्या उभयतांचें जोडपें दिवसानुदिवस तारुण्य अवस्थेत येत चाललें होतें. कार्तिकमासीं एके दिवशीं बाबासाहेब, शिवरामभाऊ, वगैरे मंडळी एकत्र बसलीं असतां, त्यानीं राधाबाईस "पदर" घालण्याचा निश्चय ठरविला व मार्गशीर्षमासीं सुमुहूर्त पाहून त्या दिवशीं तें कृत्य करण्याचें ठरविलें.

याप्रमाणें ठरल्यावर ज्योतिषाकडून या कृत्यास एक शुभ दिवस पाहून त्याची तयारी करूं लागले. प्रथम राधाबाईच्या माहेरीं ह्मणजे पुणेकराकडे लिहून कळविलें. व त्यांजकडील सर्वांस येण्याविषयीं आग्रहानें लिहिलें. पाच प्रमाणें, आप्तसगे, सोयरेधायरे वगैरे मंडळीसही आमंत्रणें पाठविलीं व इकडे तयारी करूं लागले.

### या कृत्यास लागणारें सामान.

( वरपक्षाकडे. )

वधूस:— लुगडें, खण, पैठणी, शालजोडी वगैरे. ( लुगडें हिरव्या रंगाचें असावें. ) कांहीं अलंकार. इतर कापड:—उपाध्यास:— पोषाख. विहिणीस व तिच्या मानकरिणीस लुगडीं, खण वगैरे. ( वैदिक कर्मास लागणारें साहित्य पत्रकांत दिल्याप्रमाणें तयार ठेवावें. )

( वधुपक्षाकडे )

जांवयास:— पागोटें शालजोडी वगैरे. फराळास नाना प्रकारचे लाडू, मेवे, बरफी, फळफळावळ वगैरे पदार्थ.

विहिणीस व तिच्या मानकरिणीस:— लुगडीं, खण, वगैरे.

आपल्या मुलीस:— लुगडें, खण, पैठणी वगैरे.

नियमित मुहूर्तदिवसास एक दोन दिवसांची अवधि आहे तों पुण्याकडून राधाबाईची आई, तिचा भाऊ व त्यांची स्त्री व कांहीं चाकर माणसें, अशी मंडळी येऊन ठेपली. तशीच दुसरीकडीलही कांहीं मंडळी आली होती.

निश्चित दिवशीं प्रातःकाळीं सर्व वाड्यांत सडासारवण पडून रांगोळी घातलें व आम्रपल्लव बांधिले. ताशे, चौघडे वगैरे वाद्यें वाजूं लागलीं. व चो-

होंकडे मंगलमय दिसूं लागलें. सूर्यबिंब वरंच वर आल्यावर उपाध्ये हातांत पळी-पंचपात्री, दर्भ वगैरे घेऊन तेथें आले. नंतर आत्माराम व त्याची स्त्री या उभयतांचें मंगल स्नान होऊं लागलें. इकडे पुढील चौकांत मंडपांत रांगोळे काढून दोन चौरंग जवळ जवळ मांडून त्यावर मखरु घातले होते. समोर एक चौरंग वसाच ठेविला होता. व वैदिक कृत्यास लागणारें सर्व साहित्य तयार होतें. उभयतांचें स्नान झाल्यावर रेशमी वस्त्रें परिधान करून अंगावर शालजोड्या घेऊन सिद्ध झाल्यावर कुलदेवतेस व वडील माणसांस उभयतां जोडयानें नमस्कार केल्यावर तीं मंडपात पाटांवर येऊन बसलीं. नंतर वैदिक कृत्यास आरंभ झाला. वैदिक कृत्य आटोपल्यावर राधाबाईस नवें लुगडें ( हिरव्या रंगाचें ) नेसावयास दिलें. तें नेसल्यावर आत्मारामाकडून त्या लुगड्याचा पदर तिच्या डोक्यावर देवविला. नंतर तिची ओटी घरांतील एका स्त्रीनें भरली. हें कृत्य आटोपल्यावर बाबासाहेबांकडून उपाध्येबोवांस अहेर झाला. नंतर आत्मारामास प्रथम घरचा अहेर झाल्यावर सासुरवाडचा व दुसऱ्यांकडील अहेर झाले.

हीं सर्व कृत्यें आटोपल्यानंतर बोलाविलेल्या मंडळीसह पक्वान्न युक्त भोजन झालें.

सायंकाळीं माडीवरील दिवाणखान्यांत व सर्व घरांतही रोजच्यापेक्षां आरास वगैरे जास्त केली होती. रात्रीं आठ वाजण्याचे सुमारास माजघरांत एक चौरंग मांडून त्यावर मखरु घालून सभोंवती आरास वगैरे केली होती. तेथें पुणेकरांकडील आलेलें सर्व सामान ठेविलें होतें. नंतर त्या चवरंगावर आत्मारामास बसविलें. राधाबाईकडून त्याचें पाय ऊन्ह पाण्यानें धुववून रुमालानें पुसले. नंतर अंगास केशरी उटी लावून गळ्यात फुलांचें हार घालविले. नंतर फराळाचीं पानें तयार झाल्यावर जांवयाच्या समवयस्क मित्र वगैरे मंडळीस त्यांच्या पंगतीस बसविलें. राधाबाईस आत्मारामाचे पुढें बसविलें. नंतर फराळ होऊं लागला. मधून मधून स्त्रियांच्या आग्रहानें तीं उभयतां एकमेकांस भरवीतही होतीं. हा फराळाचा समारंभ मोठ्या थाटामाटाचा झाला.

हा समारंभ झाल्यावर बाबासाहेबांनीं गांवांतील मंडळीस एके दिवशीं भोजनास बोलाविलें. त्या दिवशीं नाहीं तरी पन्नास एक पान झालें होतें. सर्व

---

१ लग्न झाल्यापासून आजपर्यंत वधु पदर काढून नेसत नाहीं. म्हणून सुमुहूर्तानें हा विधि करतांना "पदर" पतीकडून देवविण्याचा प्रघात आहे. २ ओटीचें सामान—गहूं, नारळ, बदाम, खारीक, आक्रोड. ३ हा सर्व फराळाचा बेत वधुपक्षाकडील असतो.

थाटबेत फार उत्तम केला होता. याप्रमाणें हा समारंभ आटोपल्यावर पुणेकरां-कडील सर्व मंडळीस त्यांच्या मानपानाप्रमाणें आहेर करून त्यांची बोळवणी केली.

( हा प्रकार करणें मुलीच्या वयावर अवलंबून असतें. त्याप्रमाणें योग्य दिसेल तेव्हां शुभ मुहूर्तावर करून घ्यावा. )

---

न्हाणवली.

मानवी आयुष्यांत तारुण्यकाल हेंच अनंत सुखोपभोगाचें माहेरघर आहे. त्या कालांतील ती सुंदर मुखश्री, त्यावरील तो गुलाबी रंग, त्या विशाळ कपा-ळावरील तीं प्रौढतेच्या छायेचीं नुकतींच दिसूं लागलेलीं चिन्हें, त्या नेत्रांचें तें चंचलपाणी, व ते प्रीतीचें दिग्दर्शनकरणारे कटाक्ष, ती नीतीनें बद्ध झालेली मनोवृत्ति, ते विचारांनीं भरलेले परंतु कमी अनुभवाचे असे मनांतील अनेक विचार, ती कामकाज करण्याची अंतःकरणापासून उल्हासवृत्ति व चंचलता, ते विद्यादि सद्गुणांचें मुखावर तेज, तो चालण्यांत बोलण्यांत सभ्यपणा व त्यांत जरा तरुण-पणानें आलेली ती ऐट, ते संसारसुखांतील अनेक सुखांचा उपभोग घेण्याचे मनांतील अनेक तरंग, भविष्य कालांत मोठेपणा मिळण्याकरितां खटपटीचे ते गहन विचार, ती मातापितरांस त्यांच्या वृद्धापकालीं आनंद देण्याची महत्वकांक्षा, ती आप्त-सगे, स्नेहमित्र वगैरे मंडळीस मदत करण्याची उत्कट इच्छा, तो देशबांधवांची सेवा करण्याचा विलक्षण हुरूप, आणि ती वृद्धापकालीं सुखानें राहण्याचें साधन करून ठेवण्याबद्दल नेहमी मनांत वोवत असलेली दुर्धर काळजी, या अनेक प्रका-रांच्या मनोवृत्ति व विचार तारुण्य बहारांत आलेल्या अठरा वीस वर्षांच्या, विद्या-लयांतून पदवी मिळवून नुकत्याच बाहेर पडलेल्या तरुणाच्या मुखावर दिसूं लागतात. त्याची ती सहधर्मचारिणी भार्या, जिनें आपलें बाल्यत्व मातापितरांच्या अनुगमांत घालविलें आहे, जिला तिच्या सद्गुणी आईनें वारंवार योग्य उपदेश करून " पत्नि " हें नांव शोभण्यास योग्य केलें आहे, जी आपलें लग्न झाल्यापासून सासूसासऱ्यांच्या व आईबापांच्या शिक्षणानें शिकलेली आहे व जिनें पुढें संसाररूपी महासागर तरण्याचें ज्ञान मिळविलें आहे, जी जसजसी वयांत येत गेली तसतशी आपल्या मैत्रीणींच्या सहवासानें आपल्या पतीची प्रीति व घरांतील वडील माणसांची मर्जी संपादण्यास शिकली आहे, जिला आपल्या संसारापेक्षां दुसऱ्या कोणत्याही गोष्टींत आनंद दिसत नाहीं, जी पतिसेवेंत तत्पर होण्यास शिकत चालली आहे, जी आपलें कर्तव्यकर्म जाणूं लागली आहे, जिच्या मनांत पति हाच आपला सर्वस्वी सहचारी आहे, व तोच आपलें मुख्य दैवत आहे असा पूज्यभाव येत चालला आहे,

जी तारुण्य बहारांत येत चालल्यानें मोहक दिसत आहे, जिला पतिसमागमाच्या सुखाचा अनुभव नाहीं पण वयपरत्वें जिची इच्छा दिवसानुदिवस बलवत्तर होत आहे, जिचें मन भीत भीत तरी पतीचें मुख पाहण्यांत आनंद मानूं लागलें आहे, जिला तिच्या मैत्रीणींच्या सहवासानें संसारांतील सुखांचें महत्व समजूं लागलें आहे, व जिच्या मनांत उत्तरोत्तर प्रतिप्रीति जास्त शिरकाव करित चालली आहे, आणि त्यामुळेंच म्हणा किंवा वयपरत्वें म्हणा जिला पतिसमागमीं चंचलता उत्पन्न झाली आहे, जी सद्गुणांनीं बद्ध झालेली आहे व जिच्या शरीरावर तारुण्यरूपी अरुणोदयाच्या अत्यंत मनमोहक प्रभा फांकत चालल्या आहेत, अशा प्रकारें ती मोठी ऱ्हदयंगम दिसूं लागते.

अशा ह्या तरुणीतरुणांचा समागमकाल कीं, ज्याची सीमा आपल्या पूर्वज्यांहीं शास्त्रद्वारें मोठ्या दूरदृष्टीनें स्थापित केलेली आज शेंकडो वर्षे चालत आली आहे, व तीच आज नाहीं पण यापुढेंही हजारों वर्षे चालली तरी योग्य व समंजसपणाचीच आहे असें ठरल्यावांचून कधींही राहणार नाहीं. असें असतां अलीकडे त्या सीमेचें उल्लंघनानें दिवसानुदिवस सामाजिक स्थितीला जो एक प्रकारच्या धक्का पोंहोचत आहे तो लहान सहान आहे असें नाहीं. याचा प्रतिबंध करणें प्रत्येक कुटुंबांतील पोक्त व थोर मनुष्यांचें कर्तव्य कर्म आहे; व तें बजावण्याची काळजी ते घेतील तर बऱ्याच अंशीं नुकसानी कमी होण्याचा संभव आहे. इकडे त्यांनीं लक्ष देणें फार जरूरीचें आहे, इतकेंच त्यांना सूचनेदाखल लिहिणें बस्स आहे. असो; आतां आपण आपल्या गोष्टीकडे वळूं.

आपला ग्रन्थनायक आतां नुकताच कॉलेजांतून पदवी मिळवून आलेला आहे, त्याचें वयास हें नुकतेंच विसावें वर्ष लागलें आहे, परंतु परीक्षेच्या तयारी करितां गहन विषयांचा अभ्यास केल्यानें शरीरावर जरा अशक्तता प्राप्त झाली आहे. तो आतां श्रमपरीहारार्थ घरीं राहून विश्रांति घ्यावी याच हेतूनें अभ्यासाचा नाद एकीकडे ठेवून, सुखोपभोगाचा अनुभव घेत बसला आहे. व यावेळची त्याची स्थिति विचारपूर्वक अवलोकन करतां आरंभीं लिहिल्याप्रमाणेंच झाली होती, असें वाटल्यावांचून राहणार नाहीं.

इकडे असा हा तारुण्य बहारांत आलेला आम्रवृक्ष नुकताच अभ्यासादि बावटळींशीं झगडून यशस्वी होऊन वृद्धि पावत आहे तोंच त्याला आलिंगित असलेली ती कशांगि लता, जिचें तें मनमोहक रूप " रसभरिता आम्रकळी "

प्रमाणें बनून गेलें असल्यानें जी अगदीं चित्तवेधक झाली आहे, जिचें मन चंचल होऊन त्यांतील सर्व भाव त्या मीनवत् चक्षूंच्या कटाक्षांनीं व्यक्त होत आहेत, ती योग्य समयीं यौवनावस्थेंत येऊन पतिसुखाचें अनुपम सौख्य भोगण्यास योग्य होऊन तें अनुभवती झाली. याप्रमाणें आपला ग्रन्थनायक व नायिकाहीं उभयतां स्त्रीपुरुषसमागमसौख्य योग्य कालीं भोगूं लागलीं, असें कोण नाहीं म्हणणार ?

सामाजिक रीतिभातींतील पूर्वापार चालत आलेले कांहीं रूढीमार्ग देशकालवर्तमानाप्रमाणें, सांप्रतच्या विचारी लोकांस आवडत नाहींत, हें स्थित्यंतराच्या नियमांस अनुसरूनच आहे. आतां समाजांतील सर्वच व्यक्ती भिन्न भिन्न विचारांच्या व मतांच्या असल्यामुळें ते रूढीमार्ग बंद करणें किंवा त्यांत कांहीं कमजास्त करणें हें काम फार अवघड आहे; आणि म्हणूनच आज याबद्दल जागोजागीं खटपटी सुरू असतां इच्छित हेतू कोठेंच पार पडण्यांत आला नाहीं. असें असतां ज्यांस ते रूढीमार्ग सामाजिक स्थितीस लज्जास्पद, हानिकारक, अडाणीपणा दाखविणारे, अविचाराचे वगैरे प्रकारांनीं अयोग्य वाटतील त्यांनीं ते अगदीं धिक्कारिले पाहिजेत, इतकेंच नाहीं, तर आपल्या कुटुंबांतून तरी ते बंद केले पाहिजेत. यारीतीनें प्रत्येक कुटुंब सुधारलें म्हणजे समाज सुधारलाच म्हणावयाचा.

याप्रमाणें नावडत्या रूढीमार्गां पैकीं नववधूस प्रथमऋतुप्राप्तसमारंभ हा एक होय. आतां हा रूढीमार्ग कोणत्या प्रकारें अयोग्य आहे, हें यापुस्तकांत सिद्ध करणें अप्रशस्त आहे; परंतु मला इतकेंच लिहिलें पाहिजे कीं, हा रूढीमार्ग सामाजिक स्थितीस जितका लज्जास्पद आहे, तितकाच अडाणी व अविचारीपणाचा आहे. " केसरी " पत्र जे नेहमी वाचित असतील त्यांना त्याच पत्रांत या विषयावर आलेले निबंध आठवत असल्यास त्यांस जास्त लिहिणें नकोच. परंतु ज्यांस हें समजण्याची इच्छा असेल त्यांनीं त्या पत्राच्या दोन चार वर्षांच्या फायली शोधिल्या असतां ते निबंध मिळतील. असो; या प्रकारें हा रूढीमार्ग सांप्रतच्या विचारी लोकांस नावडता झाला आहे म्हणूनच ज्यांस तो आवडत असेल त्यांच्याकडे लक्ष न देतां, मीं येथें, त्यांतील गोष्टींचें वर्णन न करितां तो तसाच सोडितो. या बद्दल त्यांनीं क्षमा करावी. आतां यांतील सर्वच प्रकार वाईट आहेत असें नाहीं; परंतु दोनचार प्रकारांनीं हा सर्वच प्रकार घाणेरडा दिसतो खरा.

या प्रकारचा समारंभ बाबासाहेबांकडे झाला किंवा नाहीं, याचा विचार न करतां आपण त्याच्या पुढील समारंभ पाहण्यास जावें, हें बरें.

---

## २ गर्भाधान.

( ऋतु प्राप्त झाल्यापासून सोळाव्या दिवशीं हा प्रकार करण्याची चाल आहे. )

या चालीप्रमाणें त्या दिवशीं हा सामारंभ होण्याची तयारी आमच्या बाबासाहेबांच्या वाड्यांत चालली होती. पुण्यास या बद्दलचें पत्र ऋतु प्राप्त होतांच गेलें होतें. त्याप्रमाणें त्यांजकडेही तयारी चालली होती. नियमित दिवसास एक दोन दिवसांची अवधि असतां तिकडून आत्मारामाची सासू तिची मुलगी, सून, गडी वगैरे मंडळी येऊन ठेपली. त्याचप्रमाणें दुसरीकडीलही मंडळी आली होती.

### या कृत्यास लागणारें सामान.

**वरपक्ष:**—वधूस नवीं वस्त्रें, पैठणी, लुगडें, शुभ्र पातळ रेशीम काठीं, खण, शालजोडी. मुलीच्या आईस व तिच्या मानकारिणी यांस लुगडीं, खण वगैरे.

**वधुपक्ष:**—जांवयास पोशाख:—पागोटें, शेला, धोतरें वगैरे. इतर सरंजाम:—छपरपलंग, मच्छरदानी, गादा, दुलया, गिरद्या, पलंगपोस, चादरी, रुजामे वगैरे.

**पानसुपारीचा सरंजाम:**—तबक, चौफुला, पानदान, चुनाळे, आडकित्ता वगैरे तऱ्हे तऱ्हेचीं भांडीं.

**इतर सरंजाम:**—चवरंग, समया दोन, तस्ते, पिकदानी, रुमाल, आरसे पंखे, नाना प्रकारचीं सुगंधिक द्रव्यें, फराळास फळफळावळ, मिठाई वगैरे अनेक पदार्थ. तांबुलाचें सर्व साहित्य, सुवासिक फुलांचे हार, तुरे गजरे वगैरे.

**मुलीस:**—शेलारी, लुगडी, खण अलंकार वगैरे.

इतर कापड व्याही विहिणी वगैरेंस देण्यास—पागोटीं, लुगडीं वगैरे.

नियमित दिवशीं प्रातःकाळीं मंगलदायक वाद्यें वाजूं लागलीं व वाड्यांत जरा गडबडही जास्तच होऊं लागली. आजचें वैदिक कर्म जरा मोठेंच होतें म्हणून दोन उपाध्ये लवकरच येऊन त्याच्या तयारीस लागले; आणि नंतर आत्माराम व त्याची स्त्री या उभयतांचें मंगळस्नान झाल्यावर थोड्याच वेळानें वैदिक कर्मास सुरुवात झाली. ( या कृत्यास लागणारें साहित्य पत्रकांत पहावें. )

---

१ हा सरंजाम सामर्थ्याप्रमाणें थोडा बहुत असतो.

२ हें सामान कमजास्त चांदीचें अथवा पितळी असतें.

वैदिक कृत्य आटोपल्यावर होम वगैरे विधि झाले. नंतर वधूची ओटी[1] भरिली. याप्रमाणें सर्व कृत्यें आटोपल्यावर ब्राह्मणभोजन झालें. नंतर बोलाविले-ल्या मंडळीसह पंचपक्वान्नी भोजन झालें.

सायंकाळीं माडीवरील दिवाणखान्यांतील उजव्या बाजूकडील खोलींत पुण्याहून आलेला छप्परपलंग घालून उत्तम प्रकारची शय्या करण्यांत आली. तेथें हंड्या, झुंबरें, वालशिटें वगैरे लावून आरास केली होती. पलंगाखालीं बैठक घालून तेथें एक लहानसें टेबल् व दोन खुर्च्या ठेविल्या होत्या. त्या टेबलावर पानसुपारी-चा सर्व सरंजाम व सुगंधिक तेलें, अरगजे आणि फुलांचे हार, तुरे व नानाप्र-कारची मिठाई, फळें, वगैरे ठेविलीं होतीं. केशराची व चंदनाची उटी ठेविली होती. तेथेंच वाळ्याचें छानदार पंखे ठेविले होते.

दोन घटका रात्र होत आहे, तोंच इकडे फराळाची तयारी चालली. जांवयाच्या मित्र वगैरे समवयस्क मंडळीसही आमंत्रण केलें होतें. फराळाचा थाट फार उत्तम होता. चौरंगावर आत्माराम यास बसविलें होतें. या सम-यास राधाबाईला अनेक प्रकारचे अलंकार घालून व उत्तम प्रकारचा काळा शालू नेसविला होता. ते सर्व अलंकार त्या तिच्या गौर वर्णास फारच खुलून दिसत होते. एकंदरींत ती अतिशय मनमोहक दिसत होती. असो; मोठ्या थाटमाटानें फराळ झाल्यावर तांबूल, अत्तरगुलाब, हारगजरे वाटल्या-वर सर्व मंडळी गेली.

या वेळीं राधाबाईच्या समवयस्क स्नेहिणी व इतर बऱ्याच स्त्रिया फराळा-स बोलाविल्या होत्या. त्यांचे फराळ झाल्यावर त्या प्रसंगानुसार शृंगारयुक्त भाष-णें व थोडीशी थटामस्करीही झाली. असो; आतां आपल्या प्रियासंगमोत्कंठित ग्रन्थनायकास व त्याच्या पेक्षांही अधिक उत्कंठित त्याच्या प्रियेस वेगवेगळ्या ठिकाणीं न ठेवितां त्यांस दिवाणखान्यांतील तयार केलेल्या रंगमहालांत तेथील विलासयुक्त आनंदसुखाचा अनुभव घेण्यास सोडून द्यावें, हें बरें.

पुढें कांहीं दिवस पुण्याहून आलेल्या मंडळीस राहून घेतलें. त्या अवधींत बाबासाहेबांकडे एक लहानसा भोजनसमारंभ याच कल्याणनिमित्य करण्यांत आला. नंतर पुण्याच्या मंडळीस योग्यतेप्रमाणें आहेर वगैरे करून त्यांची बोळवणी केली.

---

१ ओटीचें सामान. गहूं, बदाम, खारीक, नारळ, व महाळुंग—महाळुंग हें अवश्य आणलेंच पाहिजे—या ओटींतील नारळ अर्भकांत जावतात.

## १ ओटीभरण. ( पुंसवन )

सुंदर उपवनातील पुष्पवाटिकेकडे अवलोकन केलें तर लहान लहान झाडांस नुकत्याच बाहेर आलेल्या सुंदर कलिका दिसूं लागतात. त्यांच्या जवळील मोठ्या झाडांस मोठीं गुच्छदार पुष्पें येऊन ते वाऱ्यानें डुलत असतात व त्यांनीं तीं झाडें कीति मनोहर दिसतात बरें ! ! या मनमोहक देखाव्याकडून जरा वर अवलोकन केलें तर काहीं वृक्ष, ज्यांवर नुकताच मोहरफुलांचा बहार आलेला आहे, असे दृष्टीस पडतात ! ! अहाहा ! ! या सुंदर उपवनांतील ती आम्रवृक्षाला आलिंगित असलेली कशांगी लता पहा कशी पुष्पगुच्छांच्या कलिकांनीं अगदीं गच्च भरून गेल्यानें कीति मनमोहक दिसत आहे ! तिला फुलांचा बहार लवकरच येणार म्हणून तिची कशी जतन चालली आहे ! ती विकसित फुलांनीं गच्च भरल्यावर त्या आम्रवृक्षास व त्या उपवनास कीति बरें शोभा देईल ! !

आमच्या वाचकांस यावरून कळलेंच असेल कीं ती लता व तो आम्रवृक्ष या ग्रन्थाची नायिका व नायक हीं होत. या वेळीं आपली नायिका गर्भवती होती व तिला नुकताच तिसरा महिना लागला होता. बाबासाहेबां सारख्या गर्भश्रीमान् घराण्यांत कोणत्याही गोष्टीची हेळसांड व्हावयाची नाहीं; आणि त्यांत आतां बाबासाहेबांना वृद्धापकाळीं पणतू पाहण्याची इच्छा वास्तवीकच झालेली; तेव्हां या नूतन गर्भवतीची जी व्यवस्था ठेवण्यांत आली होती ती शास्त्रसांप्रदायाप्रमाणें अगदीं योग्य होती. असो. तिसरा महिना लागल्यावर शुभ योजून त्या दिवशीं " ओटीभरण " हा समारंभ करण्याचें योजून त्याची तयारी चालली. या कृत्याची विशेष खटपट व महत्वही नसतें सबब त्यांत विशेष कांहीं झालें नाहीं. त्या दिवशीं प्रातःकाळीं वाड्यांत मंगलदायक वाद्यें वगैरे वाजूं लागलीं. उभयतां दंपत्याचें मंगलस्नान झाल्यावर उपाध्यांनीं वैदिक कर्मास आरंभ केला. शास्त्रोक्त रीतीनें होम वगैरे शांति झाल्यावर वधूस नवें वस्त्र परिधान करावयास देऊन तिची ओटी भरली. नंतर शांतिप्रित्यर्थ दान वगैरे झाल्यावर निमंत्रित मंडळीसह पंचपक्वान्नी भोजन झालें.

---

१ ओटीचें सामान:—नारळ, फळें, गहू, बदाम, वगैरे, ही ओटी नवऱ्यानें भरावी. या वेळेस वधूपक्षाकडून जांवयास पोषाख वगैरे मिळतो.

## डोहाळजेवण.

### ( सीमंन्तोन्नयन. )

आतां आपल्या नायिकेस गर्भवती होऊन पांचवा महिना सरून नुकताच सहावा लागला होता. या स्थितींत गर्भवतीला अमुक पदार्थ खावे किंवा अमुक गोष्टी कराव्या अशा अनेक व निरनिराळ्या इच्छा उत्पन्न होतात. व त्या इच्छांच्या अनुरोधानें पुढें होणाऱ्या बालकाच्या स्वभावादि गुणांचें प्रमाण बांधण्याचें मत कोठें कोठें दिसून येतें. तें सिद्ध करणें येथें प्रशस्त नाहीं. परंतु इतकेंच दर्शविण्याचें आहे कीं, त्या गर्भवतीच्या इच्छा पुऱ्या पाडाव्या हें आजपर्यंत चालत आलेल्या रुढीमार्गांपैकीं एक कृत्य आहे. असो. या रूढीस अनुसरून बाबासाहेबांनीं हें कृत्य करण्याकरितां एक शुभ दिवस योजिला. नंतर त्या प्रमाणें पुण्यास सूचना करण्यांत आली. त्या प्रमाणें तिकडूनही कांहीं मंडळी आली. योजिल्या दिवशीं प्रातःकाळीं मंगलदायक वाद्यें वगैरेंचा घोष सुरू झाला. राधाबाईला मंगलस्नान घातलें. नंतर उभयतांचीं स्नानें झाल्यावर उपाध्येबुवांनीं वैदिक कृत्यास आरंभ केला. शास्त्रप्रणित कर्में वगैरे शांतिदायक कृत्यें झाल्यावर दानविधि झाला. नंतर कांहीं मंडळीसह भोजन झालें. तें आटोपल्यावर स्त्रियांच्या भोजनाची तयारी झाली. कणारांगोळी काढून पानें मांडिलीं राधाबाईकरितां एक मोठा पाट मांडून आडणीवर चांदीचें ताट ठेविलें. चौकणा मोठा सुंदर काढिला होता. नानातऱ्हेचीं सर्व पक्वान्नें व केलेले पदार्थ वाढिले. व नानाप्रकारच्या खिरींच्या वाट्या गुरवळणींनीं झांकून तिच्या ताटा पुढें मांडिल्या. ह्या संबंधानें असा एक प्रचार चालत आला आहे कीं, डोहाळतुलीनें सदर वाट्यांपैकीं वाटेल ती वाटी जेवावयास बसण्यापूर्वीं उघडावी. व त्यांत ज्या लिंगाची खीर निघेल त्या प्रमाणें गरभारशीला मुलगा किंवा मुलगी होईल असें अनुमान करण्याची वहिवाट आहे. या अनुमानांत विशेषसा अर्थ नसतो. परंतु हा प्रकार बायका आपल्या समाधाना करितां करीत असतात. असो. यथासांग सर्व पानें सिद्ध झाल्यावर डोहाळतुलीला तिच्या समवयस्क मैत्रिणींसह भोजनास बसविलें. दुसऱ्या कांहीं बोलाविलेल्या स्त्रियाही भोजनास बसल्या होत्या. राधाबाईला जो जो पदार्थ आवडत असे तोच मोठ्या आग्रहानें वाढीत असत. या प्रमाणें मोठ्या थाटानें भोजन झालें.

पुण्याहून आलेल्या मंडळी कडूनही एकेदिवशीं असाच समारंभ झाला.

---

१ या प्रसंगीं राधाबाईनें गव्हल्याच्या खिरीची वाटी उघडली, त्याबरोबर " मुलगा, मुलगा " अशी बायकांमध्यें एकच आनंदाची आरोळी झाली.

त्यावेळीं राधाबाईला एक उत्तम प्रकारचा शालू, पांढरें शुभ्र पातळ व एक शेला आणि चोळ्या अशीं वस्त्रें मिळालीं. हीं तिच्या माहेरकरांनीं मोठ्या हौसेनें आणिलीं होतीं. हा समारंभ झाल्यावर ती मंडळी पुण्यास गेली.

---

### ३ विष्णुबली.

( हें कृत्य आठव्या महिन्यांत करावयाचा रूढाचार आहे. )

आपल्या नायिकेस आठवा महिना लागल्यावर एक शुभ दिवस पाहून त्या दिवशीं हें कृत्य करण्याचा विचार ठरविला. त्या दिवशीं मंगलसूचक वाद्यें वगैरे वाजूं लागलीं. कांहीं वेळानें उभयतां दंपत्यांचीं मंगलस्नानें झाल्यावर वैदिक कर्मास आरंभ झाला. तीं सर्व आटोपल्यावर शांतिहोम झाला व नंतर दानें झालीं. नंतर चार मंडळीसह पंचपक्वान्नीं भोजन झालें.

हा समारंभ झाल्यावर गर्भवतीच्या बद्दलचे सर्व समारंभ आटोपले. आतां प्रसुति-कालापर्यंत कोणतेंही कृत्य व्हावयाचें राहिलें नाहीं.

अहो, देशबंधूनो व भगिनींनो! जो सर्व शक्तिमान् प्रभु या अवाढव्य जगताचें सूत्र आपल्या हातीं धरून, त्यांतील प्राण्यांस केवळ नाटकांतील पात्रां प्रमाणें या रंगभूमीवर नाचवीत आहे, त्याची लीला कीति अगाध आहे. अहाहा! त्या जगन्नियंत्या विश्वंभराचा हा मजवर केवढा उपकार ह्मणावयाचा कीं, त्यानें अल्पमति जो मी त्या मजकडून माझ्या देशबंधू व भगिनींची अल्पसेवा कर- ण्याकरितां इच्छिलेलें कृत्य शेवटास नेवविलें! प्रथम त्या महाप्रभूस अभिवंदन क रून माझ्या देशबंधूंस व भगिनींस प्रार्थना करितों कीं, हा ग्रन्थ करण्याचा कर्त्याचा जो मूळ हेतू तो अंशतः तरी त्यांजकडून सिद्धीस जाईल; व तसें झाले लें त्याच्या पहाण्यांत आलें ह्मणजे तो आपल्या श्रमांचें सार्थक मानील. तो सर्वसाक्षी विश्वंभर ही त्याची इच्छा सफल करो आणि त्याच्या देशबंधूंचें व भगिनींचें कल्याण करो.

---

१ गर्भवती स्त्रियेस पांढरें व हिरवें वस्त्र फार खुलून दिसतें म्हणून तें द्यावें.



# औ ष ध सं ग्र ह.

## स्त्रिरोगांवर उपचार.

—○O○—

### १ गर्भधारणोपाय.

१. महाळुंगाची मुळी दुधांत शिजवून सावलींत वाळवून तिचें चूर्ण करून तें ऋतुसमयीं तीन दिवस एक एक तोळा तुपांत खावयास द्यावें.

२. पांढऱ्या जासवनीची मुळी एक तोळा एकवर्ण गाईचे अर्धाशेर दुधांत उगाळून त्यांत ओंव्याचा रस घालून तें ऋतुकालीं खावें.

३. नाकेशर एक तोळा गाईच्या तुपांत कालवून ऋतुकालीं खावें.

४. महाळुंगाचें बीज एक तोळा गाईच्या दुधांत शिजवून ऋतुसमयीं तीन दिवस खावें.

५. निवडुंगाच्या चिकांत वात भिजवून ऋतुकालीं तीन दिवस स्त्रींद्रियांत धरावयास द्यावी.

६. पारव्याच्या नराची विष्टा दररोज १ लेंडी या मानानें गाईच्या तुपांत कालवून ऋतुकालीं तीन दिवस खावी.

७. पुंगळीचें मूळ दीड तोळा गाईचे दुधांत वाटून ऋतुकालचे तीन दिवस गेल्यावर चौथ्या दिवसापासून खावें.

८. पळसाच्या बियांची राख करून ती एक तोळा, पाण्यांत कालवून खावी.

९. घोडाचोळीची मात्रा पाऊण तोळा एकवर्ण गाईचे दुधांत खावी.

### सल वाहण्यास उपाय.

१. पित्तपापडा तोळा १ पाण्यांत उकळून त्याचा काढा करून त्यांत साखर तोळे २ घालून द्यावा. पथ्य—आंबट, तिखट, वातूळ पदार्थ खाऊं नये.

२. देवदार तोळा ॥· गाईचें दुधांत उगाळून खावें.

३. तोंडलीचे मुळाचा रस, + व एकवर्ण गाईचें दुध ॥- एकत्र करून त्यांत देवदार तोळा ॥· जिरे ॥· चिनीसाखर ॥· हे जिन्नस घालून ऋतुकालीं तीन दिवस खावा. पथ्य करावें.

### प्रदर बंद होण्यास.

१. उंबरांच्या लेंड्या तोळा ॥ गाईचे एक शेर दुधांत वाटून प्यावा.

२. शेरणीच्या पाल्याचें चूर्ण करून तें अर्धा तोळा तुपांत घ्यावें; तूनतुक प्रदर बंद होईल.

### रक्तस्रावावर.

१. आंब्याच्या झाडाची साल, जांभळीची साल, बोरीची साल, या वेग वेगळ्या, एक एक तोळा गाईचे तुपांत मध घालून त्यांत उगाळून घ्याव्या. एकत्र करून दिल्यास कांहीं हरकत नाहीं. या पासून रक्तस्राव बंद होईल.

२. पारव्याची विष्टा तोळे २ तांदळाचें धुणांत खावी.

### धुपणीवर.

१. गोपीचंदन गाईचे दुधांत उगाळून दररोज दोन वेळां तीन मासे खावें. पथ्य करावें.

२. पांढऱ्या जासवनीचे कळे तोळा १ गाईचे एक शेर दुधांत वाटून घ्यावे. कळे न मिळाल्यास, पाला अथवा मुळी आणावी.

३. मोंगली बेदाणा तोळा ॥ रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं गोंदासारखा चिकट झाला म्हणजे तो गाईचे दुधांत घालून त्यांत चिनई साखर घालून रोज एकवेळ घ्यावा.

### विटाळबंदीवर.

१. नागकेशर तोळे २, अर्धाशेर गाईचे दुधांत वाटून चार दिवस खावें. पथ्य करावें. चौथे दिवशीं रात्री जेवूं नये. पांचवे दिवशीं तूपभात खावा.

### शीघ्रप्रसूतीस.

१. अघाड्याचें मूळ उशास ठेवावें.

२. अडूळशाचें मूळ कुटून नाभीस लेप करावा.

३. जांभळीची साल पाण्यांत उगाळून उरास लेप करावा.

४. पांढऱ्या खिळखिळ्याचें मूळ कानास बांधावें; लवकर प्रसूत होईल. मात्र प्रसूत होतांच सोडावें. ज्यास्ती वेळ राहिल्यास आंग बाहेर येईल.

५. पांढऱ्या सुपलीचें मूळ व तुळशीचें मूळ वाटून स्त्रीयांस लेप करावा.

### प्रसूत समयीं मूल आडवें आल्यास.

१. हंईच्या झाडावर अक्षदा टाकून त्यावर आपली सावली न पडतां त्या झाडाची चार बोटें लांब मुळी काढून ती उदवून स्त्रीचें मस्तकावर बांधावी. प्रसूत होतांच सोडावी.

२. सोनकाव तोळा १ गाईचें अर्धा शेर दुधांत कालवून द्यावें.

१. उटकाटाऱ्याची रवीमार मुळी पाण्यांत उगाळून द्यावी, आणि तेंच झाड स्त्रीस दाखवावें.

**प्रसूतीनंतर भांडें बाहेर येणें त्यास.**

१. कोळिस्ताबिज वस्त्रगाळ करावें, आणि गाईचें तूप भांड्यास चोळून वर ती पूड टाकावी; आणि भांडें स्वस्थानीं बसवावें. नंतर लंगोटी द्यावी. असें तीन दिवस करावें.

२. झिंजुरड्याच्या मुळ्या शनिवारीं आणून रविवारीं गाईचे गोठणींत गाळून त्यांची वस्त्रगाळ राखाडी करावी आणि ती भांड्यावर टाकून भांडें स्वस्थानीं बसवावें; नंतर लंगोटी द्यावी. असें सात दिवस करावें.

**मरत वांझेस उपाय.**

१. शिवरात्रीचे दिवशीं उभयतां स्त्रीपुरुषांनीं पहांटेस उठून पुरुषानें एक घागर पाणी ताजें आणून त्यांतील दोन तांबे पाणी उंबराचे झाडास घालून बाकी राहिलेल्या पाण्यानें उभयतांनीं स्नान करून जुनीं वस्त्रें सोडून नवीं परिधान करून त्या उंबराची यथासांग पूजा करावी.

**वांझेस उपाय.**

१. डोरलीचें बीज ८८८६ पुरुषाच्या मूत्रांत वाटून त्याची गोळी करून स्त्री बाळंत झाल्यावर तीस तिसऱ्या दिवसांपासून तीन दिवस खावयास द्यावी.

**स्त्रियांस प्रसूतीनंतर देण्याचे काढे.**

१. **दशमुळांचा काढा**—भारंगमूळ २॥, भालमूळ, टेटुमूळ, शिवणीमूळ, ऐरणमूळ, पहाडमूळ, पाडळमूळ, बेलमूळ, गांज्यामूळ, मोतरिंगणीमूळ, हीं दहा मुळें समभाग घेऊन बारीक कुटून सात पुड्या कराव्या. दर तोळ्यास सोळा तोळे पाणी घालून उकळवून शेष दोन तोळे राहिले म्हणजे त्यांत पिंपळीची पूड मासे २ घालून काढा द्यावा. काढानिकाढा द्यावा. दर ऐक पुडी तोळे १॥ प्रमाणें असावी.

२. **लवंगादी काढा.**—( तोळेवार. ) लवंगा १, चवक ॥·, पिंपळी ॥·, रिंगणी ॥·, किराईत ॥·, पिंपळमूळ ॥·, मुस्ता ॥·, मायीमाल ॥·, देवदार ॥·, आडुळसा ॥·, ब्राम्हि ॥·, वावडिंग ॥·, दारूहळद ॥·, कुड्याची साल ॥·, ओवा ॥·, मंजिष्ट ॥·, पटोल ॥·, एरंडमूळ ॥, राष्णा ॥·, वेखंड ॥·, अजमोदा ॥·, मिरे ॥· गाठीहळद ॥·, रक्तचंदन ॥·, गजपिंपळी ॥·, धमासा ॥·, इंद्रजव ॥·, कचोरा ॥·, सुंठ ॥·, बाळंतशोपा ॥·, गोखरू १।·, रिंगणीमूळ ॥·. हीं ३९ औषधें आणि

वरील काढ्या लिहिलेली दशमूळें घेऊन सर्वांचा काढा वर दशमुळांचा काढा लिहिला आहे त्याप्रमाणें करावा.

३. **मंजिष्ठादि काढा.**—( तोळेवार. ) मंजिष्ट १, त्रिफळा ३, हळद १, पहाडमूळ १, कुटकि १, दारूहळद १, धने १, कोष्ट १, पटोल १, बावच्या १, गुळवेल १, चित्रकमूळ १, किराईत १, रक्तचंदन १, पिंपळमूळ १, बाहवामगज १, निमकाडया, १ पिंपळी १, आडुळसा सदरहू १९, औषधें समभाग घेऊन सात पुड्या करून काढा निकाढा घ्यावा.

४. **दारवादि काढा.**—देवदार, वेखंड, कोष्ट, पिंपळी, सुंठ, किराईत, कायफळ, मोथे, कटुकि, धणें, बाळहारतकी, गजपिंपळी, रिंगणी, गोखरू, धमासा, अतिविष, गुळवेल, काकडशिंग, शहाजिरें, हीं औषधें समभाग घेऊन सात पुड्या करून काढा करावाआणि त्यांत सैंधव व हिंग भाजून घालावा आणि काढा निकाढा घ्यावा. हा फार उष्ण आहे. करितां प्रकृतीचें मान व ऋतु पाहून याची योजना करावी. (समभाग ह्मणजे प्रत्येक औषध तोळा १.)

---

## सौभाग्यसुंठ.

सुंठ पक्कापावशेर, तेजफळ ।, शहाजिरें ।, चवक ।, अक्कलकारा जायफळ ।, केशर ।, कमलबीज ।, चारोळी ।, कंकोळ ।, धने ।, नागरमोथा ।, सफेतमुसळी ।, कवचबीज ।, वाळा ।, चंदनपांढरा ।, कृष्णआगरू ।, अक्रोड ।, काळींद्राक्षें कच्चापावशेर ८८।, जायपत्री ।, त्रिफळा ।॥, असकंद ।, वावडिंग ।, जिरें ।, शतावरि ।, गोखरू ।, पिंपळी लोहभस्म ।, दालचिनी ।, वेलची साळामुद्रा ।॥, नागकेशर ।, वडीशेप ।, कोष्ट ।, पिंपळमूळ ।, निशोतर ।, अजमोदा ।, तालिमखाना बदामगोळे अदराव वंशलोचन । लवंगा ।॥, मिरें ।, कडू । पिठीसाखर कच्चे पावणेतीन शेर, तूप गाईचें पक्कापावशेर, दूध गाईचें कच्चे दोन शेर २.

करण्याची रीत.—वरील एकूण ४५ औषधांपैकीं सुंठ पक्कापावशेर घेऊन ती चांगली सोलून गाईच्या दुधांत मंदाग्नीनें शिजत ठेवावी. अर्धे दूध राहिलें म्हणजे सुंठ बाहेर काढून सावलींत वाळवावी, व राहिलेल्या दुधाचा खवा करावा. नंतर सुंठ वाळल्यावर तिचें चूर्ण वस्त्रगाळ करावें. नंतर वर सांगितलेल्या २॥ शेर पिठी साखरेचा पाक करून त्यांत हें सुंठीचें चूर्ण घालावें. आणि तें जरा जाड झालें म्हणजे त्यांत दुधाचा खवा घालावा. नंतर वरील सर्व औषधांचें

चूर्ण वस्त्रगाळ करून त्यांत घालावें. त्या नंतर त्यांत तूप घालून हें सर्व एकत्र मिळून गेलें म्हणजे त्याच्या गोळ्या अथवा वड्या करून चांगल्या काचेच्या भांड्यांत ठेवाव्या. रोज एक एक खावी.

### दुसरा प्रकार.

सुंठ तोळे ३१, तूप ८०, दूध२५६, साखर२००, शोपा ४, शाहाजिरें४, त्रिकटू ( सुंठ, मिरें, पिंपळी ) ४. त्रिसुगंध ( तज, तमालपत्र, वेलची ) ४, ओंवा ४, वाडिशोप ४, चवक ४, चित्रकमूळ४ , मोथे ४. या औषधांचें चूर्ण वेगवेगळें वस्त्रगाळ करावें. नंतर दुधांत सुंठीचें चूर्ण घालून त्याचा खवा करावा; आणि नंतर खडीसाखरेचा पाक उत्तम करून त्यांत वरील खवा मोकळा करून व इतर सर्व औषधांचीं चूर्णें त्यांत टाकून पळीनें घाटून जाड करावा. करपूं देऊं नये व फार पातळही करूंनये. नंतर त्यांत तूप घालून पुन्हा घाटून बोटानें चाटून खाण्यासारखा लेह करावा. तो रोज एक किंवा दोन तोळे खावा. यापासून बाळंतरोग दूर होतो, व वलीपलित, अग्निमांद्य, आमवात हे रोग दूर होतात, आणि बल व कांति हीं उत्तम होतात. यास सुंठीचा अवलेह असें ह्मणतात.

### दुग्धोत्पत्ति.

१. कोष्ट, अरकंद, गजपिंपळी, वेखंड, हीं प्रत्येक तीन मासे पाण्यांत उगाळून स्तनांस लेप करावा.

२. गुळवेलीच्या एक तोळा भर मुळ्यांचा काढा करून त्यांत गाईचें दूध एक शेर घालून तो सात दिवस पोटांत घ्यावा.

३. भुईकोहळ्याचा रस एक तोळा अर्धा शेर दुधांत घ्यावा.

४. शतावरीचे मुळ्यांचा रस एक तोळा शेरभर दुधांत घ्यावा.

स्त्री प्रसूत झाल्यावर तिला चार दिवस कांहीं घरगुती औषधें देतात तीं स्त्रियांस माहित असतात करितां येथें देणें नलगे.

बाळंतिणीस दहा दिवसांत गाईच्या दुधांत केशर खलून देत जावें. त्यापासून मुलाची कांति गौरवर्ण होते. याचा अनुभव प्रत्येकानें घेऊन पहावा.

---

# लहान मुलांच्या अनेक रोगांवर औषधें.

### मुलांस दूध पाजण्याचा प्रकार.

दुग्धदोषामुळें मुलास अनेक प्रकारचे रोग होतात. त्यांजवर तत्काळ उपचार होत नाहींत तेणेंकरून ते विकार जास्ती वाढतात. याकरितां यानें मुलास

दूध पाजावयाचें तें फार खबरदारीनें पाजिलें पाहिजे. दूध एकाच गाईचें असावें. तें एकवेळ खरपुस तापवून चुलीवरून खालीं उतरून कांहींवेळ राहूं द्यावें. त्यावर चांगली साय जमली म्हणजे ती काढून घेऊन पुनः दुध तापवून नंतर फिरोन साय येईल ती काढून घ्यावी. नंतर स्वच्छ व घट्ट फडकें दुहेरी करून त्यानें तें दूध गाळावें आणि पाजित जावें.

मुलाच्या आईनें रात्रीं निजते समयीं विड्यांत थोड्याशा बाळंतशोपा खात जाव्या व सकाळींही खाव्या म्हणजे तिच्या अंगावरील दूध निर्विकार होईल.

कित्येक स्त्रियांचा समज असा असतो कीं, मुलास सायीसकट दूध पाजलें, म्हणजे तें शरीरास हितावह होईल. परंतु तसें न होतां उलटें तें रोगास कारणीभूत होतें. कारण लहानपणीं मुलाचा जठराग्नि लघु आणि पातळ अशाच पदार्थांचा पाक करितो. याकरितां दुधावरचें सायटें न काढिलें तर पोटांत त्याचें पचन न होतां तें आंतड्यांशीं चिकटून राहतें; व रोज अशाच प्रकारचें दूध पाजित असल्यामुळें त्यावर नवीं पुटें बसोन त्यापासून अनेक रोग उत्पन्न होतात. याकरितां वर सांगितल्याप्रमाणें दूध पाजावें. याचप्रमाणें मुलाचे आईचें खाण्यांत वावडे पदार्थ येऊं देऊं नये; कारण तेणेंकरून तर दुध विकारी होऊन त्यापासून मुलास विकृति उत्पन्न होते. मुलास गाढवीचें दूध पाजावें तें फार उपकारी आहे. हें दूध अंगावरच्चें दुधाप्रमाणें पातळ असतें व त्यांत क्षारांश विशेष असतो. त्यामुळें मुलास कोणताही विकार होत नाहीं. या दुधाचे अंगीं शक्ति जास्त आहे. परंतु हें फार उष्ण आहे. मुलास बकरीचेंही दूध पाजावें तेंही उपकारी आहे. बकरी रानांत चरण्यास जात असेल तिचें दूध असावें.

लहान मुलांची प्रकृति कफप्रधान असते आणि वायूहि प्रायः ऊर्ध्वगतिक असतो आणि जठराग्नि तूर वर सांगितल्याप्रमाणें असतो; तेणेंकरून प्रायः कफाश्रयाचे रोग त्यांस विशेष होतात आणि कीमीहि होतात.

---

## मुलांच्या पोटांतले रोग.

१. ससणी (श्वासिनी), २ आकडी, ३ डबा (तीन प्रकारचा), ४ कवळ व ५ साधारण रोग, याप्रमाणें पांच प्रकारचे रोग मुलांस होत असतात.

### १. ससणी.

हा रोग कफ व वायू यांजपासून होतो. याजवर उष्णोपचार केले तर गुण कचित् येतो. परंतु प्रायः अपकार मात्र होतात. उष्णोपचारानें मुलाचें तोंड

भांकून होरपळल्यासारखें होतें, व कंठ शुष्क होतो. मग कांहींही औषध पाजिलें असतां तें ओकतें, तेणेंकरून मूल फार व्याकूल होतें. कंठाचे ठाईं वातवाहिन्या (धमन्या) आहेत त्या सुकून चिकून जातात, छाती सुकते, व कफाच्या आल्याचा पातळपणा कमी होऊन तें घट्ट होतें, त्यामुळें वायूचें ऊर्ध्वगतीस अधिक अवरोध होऊन रोग प्रबळ होतो.

### यावर उपचार.

१. मोठा हिरडा, बेहडा आणि जेष्टमध प्रत्येक तीन मासे हीं चहाचे पाण्यांत अथवा गरमपाण्यांत उगाळून त्यांत सैंधव व मध मासा घालून तें चाटण चाटवित जावें. प्रकृतीचें तारतम्य पाहून त्यांत रेवाचिनीचा एकादा वेढा उगाळावा.

२. हिरडा, बेहडा आणि कोहळ्याची बी, हीं प्रत्येक तीन मासे गरमपाण्यांत उगाळून तें पाणी पाजावें.

३. डिकेमाली, रेवाचिनी, काळाबोळ हीं औषधें प्रत्येक तोळा ॥· पाण्यांत वाटून पोटावर लेप करावा. नाभीस लावूं नाहीं. विडयाचे पिकले पानांस एरंडेल लाऊन गरम करून त्यांनीं पोट शेकित जावें.

४. त्याच मुलाचें मुत्रांत हिरडा, व बेहडा प्रत्येक तीन मासे उगाळून त्यांत थोडें सैंधव घालून तें पाजावें. गुळांत गुजमार पापडखार घालून त्यांत थोडेसें त्या मुलाचें आईचें दूध घालून तें पाजावें. येणेंकरून ओकारी होईल. हें औषध चार महिन्याहून कमी वयाच्या मुलांस देऊं नये.

### ससणीप्रतिबंधक गरळा.

विडयाचीं पानें; सुपारी, कात, चुना, या जिनसा यथायोग्य घेऊन त्यांत चिमटीभर ओंवा, अर्धीमूठ बाळतशोपा आणि रंगारी हिरडा ॥· व थोडें पादेलोण या सर्व जिनसा एकत्र करून चांगलें चावून सर्वांचें एकरूप होऊन रसाळ झाल्या वर तो रस गाळून दोन किंवा तीन गोकर्णें पाजावा. हा गरळा आठ दिवसांनीं पाजित जावा. या पासून कफवातादी विकार होणार नाहींत.

### २ आकडी.

हा रोग उष्णतेपासून वायू क्षुब्ध होऊन एकाएकीं त्या उष्ण प्रकोपासहित मस्तकांत शिरून सवेंच असतां दाटल्या सारिखा होतो. तेणेंकरून हस्तपादादि अवयव थरथर कांपत राहून डोळे वटारले जातात. अशा वेळीं त्यावर उपाय न झाला तर तो वायु स्वस्थानीं येण्यास फार कष्ट पडतात.

या देशांत हा रोग झाला असतां तें मूल पछाडलें. असें झालें म्हणजे फेपरें आलें किंवा बाहेरबाधा झाली असें लोक समजतात.

या रोगावर उपचार फार लवकर केला पाहिजे. कारण हा पुढें साध्य होत नाहीं.

हा रोग झाला असें समजतांच त्या मुलाचे डोळे उघडे न ठेवितां हळूच पापण्या मिटून ठेवाव्या. जसें अंधेरी, किंवा चक्की अथवा भोंवळ आली असतां डोळे मिटून धरले म्हणजे ती दूर होते त्याचप्रमाणें आकडीचा ही जोर या योगानें कमी होतो. प्रथम हा उपचार करावा.

नंतर तत्क्षणीं पांढरा कांदा नखांनीं चिरडून नाकाशीं धरावा. या पासून आंकडी उतरेल.

गुलाबपाणी कापसाच्या बोळ्यानें टाळूशिवाय सर्व मस्तकास, कपाळास, डोळ्यांस व कानांमागें लावावें.

मोठा हिरडा थंडपाण्यांत उगाळून हिरड्यास, जिभेस, व जिभेखालीं लावावा. हे वरील सर्व उपचार एकामागून एक करावे. इतक्यानें कमी न होईल तर हिरडा, अवळकाठी व खडीसाखर ही थंडपाण्यांत उगाळून त्यानें डोळ्यांस अंजन करावें. कांदा वारंवार हुंगवावा. जरी विकृति दूर झाली तरी कांहीं वेळ वरील उपचार सुरू ठेवावे. कारण वायूची विकृति पुनः पुनः उठते. याजकरितां निःशेष होईपर्यंत उपचार चालू असावेत.

ज्या मुलाचे मस्तकांत उष्णता फार असते, त्या मुलास हा रोग होतो. या रोगाचीं मुलें बरीं झालीं नाहींत अशीं पुष्कळ पाहण्यांत येतात. याचें कारण असें असावें कीं, याची खरी परीक्षा न होतां पिशाचबाधा अथवा वायू झाला असें समजून लोक त्यावर भलभलतेच उपचार करितात. परंतु अशा उपचारांपासून रोगाचें शमन होण्याचें एकीकडे राहून वायू जास्त क्षुब्ध होऊन असाध्य होतो. करितां यास वर सांगितलेले शीतोपचार तत्क्षणीं करावे.

## ३ डबा.

हा रोग दुधाचें सायटें किंवा त्यासारखे दुसरे पदार्थ सेवन झाल्यानें पोटांत सायट्या सारिखा किंवा बेडकी सारखा आकार होऊन काळिजास चिकटून राहतो. मग उत्तरोत्तर त्याजवर सायट्यासारखीं पुटें बसून तो वाढत जातो आणि त्याचा आकार डब्यासारखा जमतो. त्यास बाजूस अथवा वर छिद्र असतें तें त्याचें तोंड. ज्याला तें छिद्र वर असतें तो साध्य, बाजूस असतें तो कष्टसाध्य, आणि

खालीं छिद्र असतें तो असाध्य समजावा. हा रोग सहा महिन्याचे उपरांत वयाचे मुलास होतो

हा रोग बाह्यात्कारी दिसून येत नाहीं. म्हणून याची परीक्षा मुलाचे शरीरावरून करावयाची आहे. ती अशीः—पोट मोठें व काळिजाजवळ फुगल्यासारिखें दिसतें. छाती व बरगड्या वगैरे ठिकाणच्या अस्थि दिसूं लागतात. हातपाय बारीक होऊन मुल शुष्क दिसूं लागतें. अंगांत निरंतर ताप असतो. मलशुद्धि होत नाहीं. लहान मुलाची नाडीपरीक्षा होत नाहीं म्हणून या बाह्यचिन्हांवरून या रोगाची परीक्षा करावयाची आहे. यावर पुढील उपचार करावे.

१. कुड्याचे सालीचा काढा करून त्यांत खडीसाखर सुंठ, मध, तूप, पिंपळी हीं एक एक मासा घालून व हेंदीचे पानांचा रस गुंजा २ घालून एकत्र करून पाजावा.

२. हेंदिचे पानांचा रस समभाग तूप घालून द्यावा.

३. मरींव मिरें सात, तांब्याचें भांड्यांत ऊन करून वरील साल काढून आंतील गोळे कुटून बारिक बुकणी करावी. लसूणीचा रस, व कुसरीचे पाल्याचा रस संध्येचे पळीभर एकत्र करून त्यांत वरील बुकणी घालून पाजावा.

४. कडू वृन्दावन म्हसीचे मूत्रांत शिजवून त्या मूत्रासुद्धां खलावें. तें एक वाल घेऊन त्यांत एक गुंज पापडखार अथवा संचळसार याची पुड घालून मधांत कालवून द्यावी.

५. गोमुत्रांत साखर व मीठ समभाग घालून तें पाजावें.

६. काळाबोळ व डिकेमाली एकत्र करून तें औषध पाजावें.

७, खबुतराची किंवा पारव्याची विष्टा मदींत चाटवावी. कडू तोंडल्याचे पानांच्या रसांत, गोरोचन, कस्तुरी, केशर हीं एक गुंज घालून तो द्यावा. पथ्य करावें.

### ४ कवळ.

हा रोग पोटांत डावे बाजूस खापरखुंटी सारखा होत असतो. तो समयीं विशेष चिघळून पसरतो. समयास आत्मस्थितीवर ही असतो. हा ज्वरानें अशक्त झालेल्या मुलास अथवा मोठ्या मनुष्यासही होतो.

#### उपचार.

१. डब्यावर जे उपचार सांगितले आहेत ते यास योजावेत.

२. महाळुंगाच्या गीर तोळे २ घेऊन त्यांत संचळखार तोळा ॥ घालून रोज दोन वेळां देत जावा.

३. रिंगणीचे झाडाचा रस एक कासऊभर द्यावा आणि नंतर बच्चाचे लाह्यांचें पीठ व गूळ एकत्र करून तें रोज एक वेळ पोफळा येवढें सात दिवस द्यावें. लहान मूल असल्यास त्याला थोडें द्यावें.

### ५ इतर रोगांवर.

**मुशीवर**—ससाचें रक्त पाजावें.

**इडतें**—गोरोचन व हळद विड्यांत घालून खावयास द्यावी. विड्याबरोबर कडू जिरें खाऊन त्याचा गरळा हळद घालून पाजावा. सतापाचे पाल्याचा रस व वांबीचा रस एकत्र करून त्यांत मध घालून द्यावा. गोमूत्र गाळून त्यांत हळद घालून पाजावें. रोग जास्त असल्यास त्यांत हिरडा उगाळावा. हे उपचार ससणीसहि करावेत. कारलीचे पानाचा रस हळद घालून पाजावा.

### प्यहास उपचार.

१. अघाड्याचा खार गुळांत कालवून सात दिवस खावयास द्यावा.

२. शेंदेलोण तोळे ४, आंबेहाळद तोळे २, मिरे तोळे २, काळीजिरें तोळे २, यांचें चूर्ण करून गोमूत्रांत कालवून द्यावें.

३. ओवा ||., अजमोदा ||., वेखंड ||., वावडिंग ||., तांदूळ ||., इंद्रजव ||., काडवल ||., हीं औषधें अर्धा अर्धा तोळा शेराचे चिकांत भिजवून सुरणांत भरून त्यास कापडमाती देऊन तो रानशेणींत जाळून काढावा म्हणजे मात्रा सिद्ध होईल. ती मात्रा दररोज सहा मासे मदींत किंवा गाईच्या दुधांत द्यावी.

४. रुईचीं फुलें तिळाचे तेलांत तळून भाकरीबरोबर खावयास द्यावें

५. सज्जिखार व हळद यांचें चूर्ण करून कोरफडीचे रसांत अथवा पाण्यांत पाजावें.

### नालबूद.

दोसीचे पाल्याचा रस पाजावा व त्याचाच पोटास लेप करावा. याचप्रमाणें घोसाळीच्या पाल्याचा रस पाजून लेप करावा. नागलीची भाकरी काकवीबरोबर खावयास द्यावी.

आकाशवेलीचा रस आंगास लावावा. पांढऱ्या आळवाचीं पानें वाटून आंगास लावावीं. लिंबाच्या पानांचा रस पाणी घालून काढावा व त्यांत एक मासा हिंग भाजून घालून पाजावा. यानें सूज उतरेल.

### दमा व खोकला.

१. कोरार गुंज १, स्वागीखार गुंज १, खडीसाखर गुंज १, मध गुंज १,

हीं औषधें एकत्र करून त्यांत अडुळशाचे पानांचा व तुळशीचे पानांचा रस संध्येचे पळीभर घालून तें औषध द्यावें.

२. कुसरीचे पानांचा रस लहान मुलास १॥ मासा व मोठ्यास २ मासे मांत निमे मध घालून द्यावा.

३. आल्याच्या रसांत खडीसाखर घालून विस्तवावर ठेवून जाड झाल्यावर त्यांत रसशेंदूर उगाळून तें चाटण वारंवार चाटवीत जावें.

### पोट फुगत असल्यास.

१. कटुकी १ गुंज आंगावरील दुधांत उगाळून द्यावी. अथवा डाळिंबीचे मुळाची साल, सुरवारी हरडा, भारंगमूळ, लवंग यांचे चूर्ण वस्त्रगाळ करून तें पाण्यांत कालवून पाजावें.

### आंगपेणीवर उपचार.

शमीच्या पाला गाईचे दह्यांत अथवा तांदूळाच्या कण्या दुर्वांचे रसांत वाटून आंगास लेप करावा.

### खोकल्यावर उपचार.

१. नागरमोथा, पिंपळी, अतिविष, काकडशिंग, आडुळसामूळ हीं औषधें गाईच्या अथवा आंगावरील दुधांत उगाळून त्यांत मध घालून तें चाटण चाटवीत जावें. यापासून पांच प्रकारचे खोकले दूर होतील.

२. चहाच्या पाण्यांत खडीसाखर व आडूळशाचे पानाचा रस घालून तें दिवसांतून दोन चार वेळां पाजावें.

### डांग्या खोकल्यास उपचार.

१. माकलीचे पाल्याचा रस लहान मुलास आंगावरील दुधांत व मोठ्यास गाईचे दुधांत पाजावा.

२. कळकीची डांग पाण्यांत उगाळून त्यांत सुंठ उगाळावी आणि तें औषध दोनप्रहरीं पाजावें.

### पानथरीवर उपचार.

१. लोखंडाचे वाटींत लिंबांचा रस काढून त्यांत नवसागराचें चूर्ण १ तोळा घालून दातांस लागूं न देतां सात दिवस पाजावें. यापासून जलोदर व वायगोळा हे रोगही बरे होतील.

### अतिसार.

१. अतिविष, डाळिंबसाल, सुंठ, खारीक, जायफळ, या जिनसा गाईचे

दुधांत उगाळून त्यास केशर लावून तें पाजावें. ज्यास्त असल्यास त्यांत थोडी अफू घालावी.

२. करंजाची साल व आळूची साल यांचा तांदुळाच्या धुणांत रस काढून त्यांत हिंग भाजून घालून तें पाजावें.

३. डिकेमाली, सागरगोट्याचा मगज व सुंठ हीं तुपांत एकत्र करून द्यावीं.

४. औषध पोटांत जात नसल्यास लिंबाच्या रसांत अफू उगाळून नाभीस लेप करावा. अथवा डाळिंबाचे पानांचा रस पोटांत द्यावा.

**जंत व क्रिमी.**

१. सुंठ, संचलखार व चिनई धुवासाखर, या जिनसा निंबाच्या रसांत उगाळून तो संध्येच्या दोन पळ्या पाजावा.

२. सुंठ, पिंपळी, बाळहरतकी, इंद्रजव, खैराची साल यांचा काढा शेळीचे मुत्रांत करून द्यावा. यास शेळीचे मुत्राचा अर्क असें ह्मणतात. साई-तनाची साल द्यावी.

३. वावडिंग, किरमाणी, सुंठ, वेलाचा पाला, सबज्याचा पाला, कपूरमालीचा पाला, कडूगाठ यांचा एकत्र काढा करून त्यांत गुंजभर केशर घालून द्यावा.

४. इन्द्रजव १, सागरगोटे १, किरमाणी १, अजमोदा १, खुरासणी १ ओवा १, वावडिंग २, फुलकिराईत १, सैंधवखार १, संचलखार २, स्वागिखार १ सुंठ २, बाळहरतकी ४, कुलूमगाठ १, निशोत्तर १, हिंग भाजून १॥, दालचिनी १, यांचें चूर्ण वस्त्रगाळ करून द्यावें. वर पाण्याचा घोट द्यावा.

**मुल माती खातें त्यास.**

१. वामळीची साल, निंबाची साल, बोरीची साल, निंबोणीची साल, आंब्याची साल, जांभळीची साल, व आपट्याची साल यांचा काढा करून देत जावा. मूल माती खाणार नाहीं, व त्यापासून आलेला रोगही बरा होईल.

**बाळघुटी.**

अर्धमूठ बडिशोप व चिमूटभर बाळंतशोपा घेऊन त्याचा चहा करून त्यांत सुरवारि हरडा, बेहेडा, अतिविष, नागरमोथा, इंद्रजव, वावडिंगाचे दोन दाणे, अक्कलकारा आणि जेष्टमध हीं औषधें उगाळून त्यांत सैंधव व मध घालून दररोज प्रातःकाळीं बोंडलेंभर पाजीत जावा.

मुलास ताप आला तर या घुटींत थोडेसें काडेचिराईत उगाळावें, आणि रात्रीं बडिशेपांचा काढा करून त्यांत खडीसाखर घालून तो द्यावा. खोकला

